# भारतीय साम्राज्य.

नारायण भवानराव पावगी.

यानें रचिलें असे.

तें

पुणें येथें "इंदिरा" छापखान्यांत छापिलें.

शके १८१८.

दुर्मुखनाम संवत्सरे.

श्री

सद्गुरु चरणारविंदीं

नमन करून

ही

ग्रंथरूपी

यथाशक्ति व यथामति केलेली

अत्यल्प

# देशसेवा

नारायण भवानराव पावगी

यानें

आपल्या दयितआर्यभूमीच्या ठिकाणीं

असलेल्या अत्युत्कट

प्रीत्यर्थ

सकल

आर्यभगिनींस व आर्यबांधवांस

प्रीतिपूर्वक

अत्यादरानें समर्पिली असे.

# भारतीय साम्राज्य.

## पुस्तक सातवें.

### प्रस्तावना.

भक्त्यागुरौ मय्यनुकम्पयाच
प्रीतास्मि ते पुत्र वरं वृणीष्व ।
न केवलानां पयसां प्रसूति
मवेहि मां कामदुघां प्रसन्नाम् ॥

भारतीय साम्राज्याच्या पूर्वार्धांत, एकंदर सहा पुस्तकांची योजना केली असून, त्या प्रत्येकांत प्राक्कालीन भिन्न भिन्न विषयांचें निरूपण झालें. ह्मणजे पहिल्या पुस्तकांत १ देशस्थिति व वर्णन, दुसऱ्या पुस्तकांत २ आर्यलोक व त्यांचें बुद्धिवैभव, तिसऱ्यांत ३ आर्येतिहास व भूगोल. चवथ्यांत ४ आर्यशास्त्र व कला, पांचव्यांत ५ आर्यशासनपद्धति व संस्था, आणि सहाव्यांत ६ आर्यगृहस्थिति, नीति, शौर्य, व उन्नति, या बाबींची अनुक्रमें पृथक् पृथक् अवश्य ती हकीकत देऊन, मी आपल्या परमपूज्य, अतिपवित्र, आणि नितान्त पुराण, अशा दयितआर्यभूमीची अत्यल्प सेवा केली.

तदनंतर, ही सेवा मातृप्रियबांधवांपुढें सादर झाल्यावर, वाचकांनीं आणि मोठमोठ्या विद्वानांनीं देखील मजला सर्व प्रकारें प्रोत्साहन दिलें. इतकेंच नव्हें तर, त्यांनीं केवळ मजवर अनुग्रह करून, ह्या **देशसेवेचा** सर्वतोपरी स्वीकार केला. सबब, त्याबद्दल मी त्यांचा खरोखरच फार आभारी आहे.

असो. अशा प्रकारें लोकमत अनुकूल असल्याकारणानें, ही सेवा तशीच एकसारखी चालू ठेवण्याला मजला अर्थातच ज्यास्त हुरूप येऊन, त्यासरशी विशेष उमेदही वाटली; आणि त्यामुळें, हा **उत्तरार्ध** लिहिण्यास मीं सुरुवात केली. आतां ह्या **उत्तरार्धांत** नाना प्रकारचे, व अत्यंत गहन विषय यावयाचे असून, **पूर्वार्धाचीं** जीं सहा पुस्तकें झालीं, त्या नंतरचाच अनुक्रम **उत्तरार्धांत** सुरू व्हावयाचा आहे. तेव्हां उघडच, **उत्तरार्धाचा** प्रारंभ सातव्या पुस्तकापासून होईल, हें विशेष रीतीनें सांगावयास नको.

हें सातवें पुस्तक ह्मटलें म्हणजे " **भरतखंडांतील मुख्य धर्म,** " या विषयावर असून, त्याचे ( ३९ ) **हिंदूधर्म,** ( ४० ) **झरथुष्ट्र** ( अथवा पार्शी ) **धर्म,** ( ४१ ) **बौद्धधर्म,** ( ४२ ) **ख्रिस्तीधर्म,** ( ४३ ) **इस्लामधर्म,** आणि ( ४४ ) **इतर धर्म व पंथ,** असे सहा भाग केले आहेत.

आतां, ह्या नंतरच्या पुस्तकांत विद्याविषयक, सामा-

जीक, आणि राजकीय विवेचन यावयाचें असून, त्यासंबं-धाची होतां होईल तों इत्थंभूत हकीकत, वाचकांस योग्य त्या वेळीं अगदीं काळजीपूर्वक, परंतु सवडीप्रमाणें, सादर करण्यांत येईल. तथापि, याबद्दलची साद्यंत माहिती देण्या-पूर्वी, हे योजिलेले महत्वाचे विषय तरी कोणकोणते आहेत, याचें सर्वसाधारण दिग्दर्शन होण्याकरितां, ते मी या खालीं थोडक्यांत देतों.

८ ( पुस्तक आठवें ) भरतखंडांतील जातिवैचित्र्य. ९ भरतखंडांतील नानाविध भाषा. १० संस्कृत भाषेचा संक्षिप्त इतिहास. ११ प्राकृत भाषेचा संक्षिप्त इतिहास. १२ भरतखंडांतील संस्कृत कविरत्नें. १३ भरतखंडांतील प्राकृत कविरत्नें, ( हिंदुस्थानी, गुजराथी, तेलंगी, तामिल. इ० ). १४ महाराष्ट्र कविरत्नें. १५ भरतखंडांतील स्त्रीरत्नें. १६ भरतखंडावरील विदेशीयांच्या स्वाऱ्या. १७ हिंदूपदपादशाही. १८ भरतखंडांतील इस्लाम प्रभुत्व. १९ महाराष्ट्र दिग्विजय. २० भरतखंडांतील आंग्लराजसत्ता. २१ भरतखंडांतील जमीनीचे सत्ताप्रकार. आणि २२ सिंहावलोकन.

सदरहू प्रकारचें विषयविवेचन किती महत्वाचें, जोखमीचें, आणि कालावधीचें आहे, हें सूज्ञ वाचकांस मी आपल्याच तोंडानें सांगावयास नलगे. किंबहुना, ती सांग-

ण्याची काहींमात्र देखील अवश्यकताच नाहीं. कारण, वास्तविक विचार केला तर, निव्वळ स्वतंत्र व अहोरात्र परिश्रम करणाऱ्या मनुष्याला सुद्धां, येवढें जडजोखीम; सर्व कार्यभाग आटपून, हातांवेगळें करण्याला; अनेक वर्षे पाहिजेत. मग, मजसारख्या सर्वथैव परतंत्र आणि पराधीन झालेल्या माणसाला, अथवा जो आपल्या वेळेचा क्षणभरही मालक नसून, ज्याला परवशतेमुळें तिळमात्रही फुरसूद मिळत नाहीं अशा इसमाला, हातांत घेतलेलें काम तडीस नेण्यास किती काळ लागण्याचा संभव आहे, याबद्दलचें अनुमान करण्याचें काम मी आपल्या प्रिय वाचकांकडेसच सोंपतों.

तथापि, त्यांतल्या त्यांत सवड करून, माझ्या हातून अवश्य ती होणारी अल्पस्वल्प चाकरी, मी आपल्या प्रिय **देशबांधवां**समोर खचितच रुजू करीन; व तींत मी कधींही अंतर करणार नाहीं. कारण, माझ्या **दयितआर्यभूमी**ची यथाशक्ती अत्यल्प **सेवा** करण्यांतच मी आपलें तन, मन, आणि धन घालविण्याचा निव्वळ मनोभावानेंच संकल्प केला आहे. यासाठीं, माझ्या हातून वेळीं अवेळीं, व कशाबशा झालेल्या नोकरीचा, मत्प्रिय बांधवांनीं केवळ सानुकंप आणि सप्रेम मात्र अंगिकार करावा, येवढेंच माझें त्यांच्याजवळ करद्वय जोडून मागणें आहे.

अस्तु. एतद्विषयक माझे मनोरथ सर्व प्रकारें त्या जगन्नियंत्यानें परिपूर्ण करावेत, आणि माझे अखिल इष्ट हेतु सिद्धीस न्यावेत, ह्मणून मी साष्टांग प्रणिपात करून श्रीमंगलमूर्तीची सदैव प्रार्थना करीत आहे.

आजपर्यंत बाहेर पडलेलीं सहा पुस्तकें लिहिण्यास तोच कारणीभूत झाला असून, ह्यासहित पुढील सोळा पुस्तकें इच्छिल्याप्रमाणें परिपूर्णतेस आणण्यास देखील तोच कारणीभूत होत आहे. सबब, त्याचें आणखी एकवार स्तवन करून ही प्रस्तावना मी पुरी करितों.

मुक्काम ठाणें, विजयादशमी.<br>गुरुवार, आश्विन शु० १०.<br>शके १८१८.

नारायण भवानराव<br>पावगी.

# भारतीय साम्राज्य.

## उत्तरार्ध.

### पुस्तक सातवें.

#### अनुक्रमणिका.

यज्ञ.

इतकेंच नाहीं तर, त्यांच्या ह्या प्रथमावस्थेंत यज्ञाव्यतिरिक्त अन्य कोणताही धर्म त्यांनीं कबूल केला नव्हता, असेंही चांगलें व्यक्त होतें.

आतां, ह्या गोष्टीचें प्रमाण पाहण्यासाठीं आपणांला आपले पुरातन वेदच पाहिले पाहिजेत. त्यांच्या अवलोकनानें असें दिसून येतें कीं, आमचे पुराण **ऋषी** ह्या त्रैलोक्यांतील नानाविध देवतांचें आवाहन करून त्यांस भक्तिपूर्वक हवन देत, व त्यांचें आशीर्वचन मिळण्यासाठीं मनोभावानें प्रार्थना करीत.

ह्या सृष्टींतील यच्चावत् पंचमहाभूतें, किंवा त्यांचीं पृथक् पृथक् आविष्करणें, म्हणजे भूदेवता, आकाश देवता, आणि स्वर्देवता, इत्यादि सर्वांच्या भिन्न भिन्न शक्तिप्रभावानें आमच्या पूर्वजांस कांहीं विलक्षण चमत्कार वाटून, ते त्यांचा प्रेमानें स्तुतिपाठ गात, आणि त्यांच्या तर्पणार्थ मनःपूर्वक **यज्ञ** करीत.

त्याचें प्राचीनत्व.

**आर्यांचा** प्रथमचा **धर्म** कोणता, अथवा **आर्यधर्मा**चा बीजांकूर कोठें दृग्गोचर होतो, यांविषयीं **ऋग्वेदांत** तर प्रत्यक्षच उल्लेख केलेला असल्याचें आढळतें. कारण, एका ऋचेंत असें म्हटलें आहे कीं,

**यज्ञेन यज्ञमयजंतदेवास्तानि धर्माणि प्रथमान्या-**

स्न्। तेहंनाकं महिमानः सचन्त यत्र पूर्वेसाध्याः संतिदेवाः ॥ ५० ॥

( अ. २, अ. ३, व २३, मं. १, अ. २२, सू. १६४. )

ह्या ऋचेचा तात्पर्यार्थ इतकाच कीं, यज्ञाच्या योगानेंच देव यज्ञ करिते झाले असून, **यज्ञ** हाच पहिला **धर्म** होय. यज्ञामुळेंच त्यांस मोठेपणा प्राप्त होऊन ते स्वर्गाप्रत गेले. आणि ह्या स्वर्गांतच पुरातन काळचे **अंगिरा**दिक ऋषी, ज्यांस **साध्यदेव** म्हणतात, ते राहिले आहेत.

तद्विषयक आधार. दुसऱ्या एके ऋचेंतूनही अशाच प्रकारचा श्लेषार्थ निघतो.

**सोमोधेनुं सोमो अर्वन्तमाशुं सोमोवीरं कर्मण्यं 'ददाति । सादन्यं विदथ्यं सभेयं पितृश्रवणं यो ददाशदस्मै ॥ २० ॥ २२ ॥**

ह्यांतील भावार्थ असा आहे कीं, **सोमाला** जो कोणी भजतो त्याला तो गाई, घोडे, इत्यादि पशुसंपत्ति देतो. इतकेंच नव्हे तर, त्याला तो **यज्ञकुशल**, सभ्य, पराक्रमशील, संसारदक्ष, आणि पित्याची कीर्ति वाढविणारा, असा पुत्र देखील देतो.

आतां, ह्या ऋचेंत " **विदथ्यं** " म्हणून जें पद आहे, त्याचा अर्थ " **यज्ञकुशल** " असा होतो. यज्ञकुशल म्हणजे स्वधर्मपरायण होय. तेव्हां अर्थातूच, यज्ञकुशल

( विद्थ्य ) असा पुत्र होणें म्हणजे तत्कालीन लोक मोठेंच भाग्य मानीत. ह्यावरून अति प्राचीनकालीं, यज्ञ करण्यांतच धर्माचें मुख्य पर्यवसान असल्याविषयीं, आमचे पुराण आर्य समजत असत, असें चांगल्या प्रकारें ध्वनित होतें.

तिसऱ्या एके ठिकाणीं ऋग्वेदांत असें म्हटलें आहे कीं,–

**शकमयं धूममारादपश्यं विषूवता पर एनावरेण ।**
**उक्षाणं पृश्निमपचंत निरास्तानि धर्माणि प्रथमान्यासन**
**॥ ४३ ॥**

( अ. २, अ. ३, व २२, मं. १, अ. २२, सू. १६४. )

ह्या ऋचेंत ते प्राचीन ऋषी असें सांगतात कीं, गोंवरीचा धूर आम्हीं दुरून पाहिला. त्यांत अग्नि असून, त्यायोगें एका चित्रविचित्र बैलाला कित्येक शूर पुरुष, शिजवीत असत. तदनंतर त्याचाच हविर्भाग ते देवांस अर्पण करीत; आणि हाच विधी प्रथमावस्थेंतील धर्म होय.

यज्ञ किंवा कर्म, व त्या पासून उद्भवलेली उपासना, व तज्जन्य ज्ञान.

तथापि, ह्या त्यांच्या साध्याशा यज्ञविधीनेंच त्यांच्या मनावर अनेक संस्कार होऊन, त्यांची दिवसानुदिवस उन्नतीच होत गेली. त्यामुळेंच त्यांची श्रद्धा वाढली. तेणें करूनच त्यांस ज्ञानमार्गाची प्राप्ति झाली. आणि त्या कारणानेंच त्यांच्या मनाची प्रफुल्लता होऊन, तो आल्हादित **मानसोदधि** नानाविध आणि उदात्त अशा तर्कचंद्रोदयानें आपोआपच उचंबळला.

कर्म, उपासना, आणि ज्ञान हीं धर्माचीं मुख्यत्वें करून तीन अंगें होत. त्यांपैकीं, यज्ञविधीनें कर्ममार्ग चोखाळला जाऊन, आर्यांच्या हृत्पटिकेंत शनैः शनैः श्रद्धा बाणत चालली. ह्या श्रद्धेमुळें क्रमाक्रमानें उपासनेचा अंकूर फुटला. आणि त्या अंकुराचाच शेवटीं प्रचंड ज्ञानवृक्षही बनला. याप्रमाणें, प्रथमपासूनच आर्यधर्माचें बीजारोपण कसें होत गेलें तें पाहून, त्यापासून झालेल्या विस्तीर्ण वृक्षाचें देखील आपण अवलोकन केलें. आतां, इतर धर्म सुद्धां ह्यापासूनच कसे फैलावले हें वस्तुस्थितीवरून दाखवून, ह्या सर्व धर्मांचा हिंदुधर्मांत म्हणजे आर्यधर्मांत कसा अंतर्भाव होतो, याविषयींचा विचार करूं.

हिंदुधर्माचें श्रेष्ठत्व. सर्व धर्मांचें मूलबीज हिंदुधर्मांतच दृष्टिगोचर होतें. आणि नानाविध पंथांचें आदिकारण

---

1 "I confined myself to the Hindoo Scriptures, and in all cases I stated that I regarded those Scriptures, and the Hindu religion as the origin of all other scriptures, and all other religions. In towns where the population was mixed in faith I used the scriptures of the Pàrsees, Christians, and Mahomedans, and in Ceylon, where the population was Buddhist, I used the Buddhist Scriptures. The enormous majority of my lectures were delivered to almost Hindoo audiences."

( Mrs. Anne Besant, in the Daily Chronicle, of 7th April 1894. )

देखील या धर्मांतच अंतर्धान पावतें. याविषयींचें मुख्य कारण पाहूं गेलें तर असें दिसून येतें कीं, ह्या धर्माचीं मूलतत्वें अगदीं खरीं असून, तीं केवळ शुद्ध पायावर आहेत; त्यांत **असत्याचें** बिलकुल मिश्रण नाहीं; व कोणत्याही प्रकारचा त्यांत लपंडाव दिसून येत नाहीं. यामुळें, इतर पंथानुयायी जनांनीं देखील ह्याच तत्वांचा अंगिकार केला, आणि तणेंकरून त्यांचा फैलाव इतर सर्व धर्मांतही साहजीकच झाला.

त्याचें पौराणत्व.

**हिंदुधर्माचा** पाया फारच खोल असून, त्याचीं पाळें तर अतिशय दूरदूर गेलेलीं दृष्टीस पडतात. ह्या धर्माचें बीजारोपण आमच्या सुप्रसिद्ध व नामांकित अशा पुण्य **ऋषींनीं** केलें; आणि तसें असल्या कारणानेंच, हा धर्म वेदाप्रमाणें व ह्मणूनच सर्व धर्मांत अति पुरातन आहे.

1 * * * "But it is true, as I have already explained that I regard Hinduism as the most ancient of all religions, and as containing more fully than any other the spiritual truths named Theosophy, in modern times. Theosophy is the ancient Brahma Vidyà of India. Of this, Hindooism is the earliest and best exoteric presentment. Exoterically therefore, I am a Hindoo in my religion and in my philosophy." * * * *

"In my own case that religion is Hindooism in its ancient and pure form."

( Mrs. Anne Besant, in the Daily Chronicle of 7th April 1894. )

असें. म्हणण्यासही कांहींच हरकत दिसत नाहीं, किंवा प्रत्यवायही येत नाहीं.

सर्व धर्मांचें अधिष्ठान हिंदुधर्मच असून, इतर सर्व धर्म ह्यापासूनच प्रसवलेले आहेत.

त्याचें जनकत्व.

त्या कारणानें हिंदुधर्माकडेसच यच्चावत् सर्व धर्मांचें जनकत्व येउं पाहतें, आणि तदंतर्गत उदात्ततत्वांनीं व प्रगल्भ विचारांनीं त्या सर्वांचेंच योग्य पोषण होतें.

हा धर्म इतका बलवत्तर आहे कीं, जगांतील सर्व धर्मांत त्याचीच धांव सर्वांपुढें आहे;

त्याचें सामर्थ्य.

व तो एवढा प्रचंड आणि विस्तृत आहे कीं, त्याच्या पुढें अन्य कोणत्याही धर्माची बिलकूल

---

1 " India's key-note was her spiritual philosophy. It was her mighty religion that formed her claim to greatness among the world's people."

( Mrs. Anne Besant on India and its mission. )

" In the history of the world, India lived because India's was the spirit of humanity which could not die, she was the earliest of the Aryan people, the first born of the mightest races, she had for her guides and instructors spiritual sages and rishis and divine kings. It was, therefore, that India's religion and her social system was permanent at its foundation, whatever might appear on the surface."

(Mrs. Anne Besant on India and its mission. )

थापच चालत नाहीं. त्याच्या योग्यतेमुळें त्याला दिवसा-
नुदिवस उत्तम प्रकारचें दाढर्य येत चाललें आहे, आणि

1 "Do you ask, why it is that one speaking in a foreign tongue, should speak of these scriptures,(*i. e.* of the Hindus) with such reverence,—of these ceremonies with such affection, and see in Hinduism the mightiest of the world's religions, and be proud to profess herself Hindu? Oh, why is it?"

"It is because re-incarnation is a truth, because the pilgrim soul must go whither it is sent, in order that it may do its duty, and learn the lessons which shall make it more useful to mankind. If you ask, why I know your scriptures—and some have asked "Why do you know them better than we ourselves" my answer is that the memory of the soul endures from life to life—passes on through death after death, and *the soul that has been Hindu for incarnation after incarnation*, (we italicise the words) cannot forget its own. It is for that reason that I come back to India as my mother-land. It is for that that I feel for you as I feel for no other people, that you are indeed, life of my life, and heart of my heart. Why do you go Westward? Why? That I might learn, what it had to teach me that I might gain a knowledge of Western science and Western philosophy which I could not have gained had my latest birth been on my own Indian soil, and that bringing the Western weapons to my own land, I might turn them against the West here, and come

( पुढें चालू. )

त्याच्यांत परिपक्कता असल्याकारणानें अन्यधर्मीय देखील त्याचा आनंदानें भराभर स्वीकार करीत आहेत. आपला स्वधर्म टाकून परद्वीपस्थ देखील आमच्या हिंदुधर्माचा स्तुतिपाठ गातात. आमचे पवित्र वेद, आणि इतर धर्म-पुस्तकें, या सर्वांचें ते शोधकबुद्धीनें मनन करितात. आमचीं गहन उपनिषदें ते विशेष मन लावून वाचतात. व आमची अत्यंत तत्वान्वेषणपरायणता पाहून ते परम आनंद पावतात.

त्याचें सनातनत्व.

आतां, ह्या भूतलावरील एकंदर सुधारलेलीं ह्मणून जीं राष्ट्रें प्राचीनकाळीं प्रसिद्धीस आलीं, त्यांपैकीं हल्लीं जिवंत असून आज मित्तीस ही वर डोकीं करून किती राहिलीं आहेत, याविषयींचा विचार केला तर असें दिसून येतें कीं, ह्या संबंधानें फक्त हिंदु लोकांकडेसच बोट दाखविल्याशिवाय

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

to India, as I could not have come had it been my happy fate to have been born for this latest earth-life in this India of ours. And if the destiny seems best I would not have it otherwise."

( Mrs. Anne Besant in her Calcutta lectures. )

1 "Rome had passed and left her ruins, and Greece had passed and left her literature; India, older than Greece or Rome—India that was old

( पुढें चालू. )

थापत्र चालत नाहीं. त्याच्या योग्यतेमुळें त्याला दिवसा-
नुदिवस उत्तम प्रकारचें दोढर्च येत चाललें आहे, आणि

---

1 " Do you ask, why it is that one speaking in a foreign tongue, should speak of these scriptures,(*i. e.* of the Hindus ) with such reverence,—of these ceremonies with such affection, and see in Hinduism the mightiest of the world's religions, and be proud to profess herself Hindu ? Oh, why is it ? "

" It is because re-incarnation is a truth, because the pilgrim soul must go whither it is sent, in order that it may do its duty, and learn the lessons which shall make it more useful to mankind. If you ask, why I know your scriptures—and some have asked " Why do you know them better than we ourselves " my answer is that the memory of the soul endures from life to life—passes on through death after death, and *the soul that has been Hindu for incarnation after incarnation*, ( we italicise the words ) cannot forget its own. It is for that reason that I come back to India as my mother-land. It is for that that I feel for you as I feel for no other people, that you are indeed, life of my life, and heart of my heart. Why do you go Westward ? Why ? That I might learn, what it had to teach me that I might gain a knowledge of Western science and Western philosophy wnich I could not have gained had my latest birth been on my own Indian soil, and that bringing the Western weapons to my own land, I might turn them against the West here, and come

( पुढें चालू. )

त्याच्यांत परिपक्वता असल्याकारणानें अन्यधर्मीय देखील त्याचा आनंदानें भराभर स्वीकार करीत आहेत. आपला स्वधर्म टाकून परद्वीपस्थ देखील आमच्या हिंदुधर्माचा स्तुतिपाठ गातात. आमचे पवित्र वेद, आणि इतर धर्म-पुस्तकें, या सर्वांचें ते शोधकबुद्धीनें मनन करितात. आमचीं गहन उपनिषदें ते विशेष मन लावून वाचतात. व आमची अत्यंत तत्वान्वेषणपरायणता पाहून ते परम आनंद पावतात.

त्याचें सनातनत्व.

आतां, ह्या भूतलावरील एकंदर सुधारलेलीं ह्मणून जीं राष्ट्रें प्राचीनकाळीं प्रसिद्धीस आलीं, त्यांपैकीं हलीं जिवंत असून आज मित्तीस ही वर डोकीं करून किती राहिलीं आहेत, याविषयींचा विचार केला तर असें दिसून येतें कीं, ह्या संबंधानें फक्त हिंदु लोकांकडेसच बोट दाखविल्याशिवाय

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

to India, as I could not have come had it been my happy fate to have been born for this latest earth-life in this India of ours. And if the destiny seems best I would not have it otherwise."

( Mrs. Anne Besant in her Calcutta lectures. )

1 "Rome had passed and left her ruins, and Greece had passed and left her literature; India, older than Greece or Rome—India that was old

( पुढें चालू. )

अगदीं गत्यंतर नाहीं. कारण, फक्त **आर्यहिंदु** खेरीज. करून, बाकीचीं सर्व राष्ट्रें रसातळास गेलेलीं दृष्टीस पडतात. इतकेंच नाहीं तर, त्यांच्याबरोबर त्यांचा धर्मही गेला; त्याचें राष्ट्रत्व नाहींसें झालें; त्यांच्या समाज-संस्था बुडाल्या; आणि त्यांचें राजकीय तेजही लोपलें.

**आर्य** लोक, **बाबिलनचे** लोक, **मिसरदेशाचे** लोक, **इराणी** लोक, **ग्रीक** लोक, आणि **रोमन** लोक, हींच पृथ्वीवरील प्राचीन काळचीं प्रचंड राष्ट्रें होत. पण त्या सर्वांत हरएक प्रकारें **आर्यांचीच** सरशी, व त्यांचेंच पाऊल पुढें. आणि तेंही पूर्वीप्रमाणेंच सांप्रतकाळीं देखील तसेंच आहे. इतर पुराण राष्ट्रें अगदीं लयास गेलीं असतांही, आमच्या **आर्यराष्ट्राचें** श्रेष्ठत्व कित्येक बाबतींत अजून देखील **जगन्मान्य** होऊन राहिलें आहे.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

befor Egypt was born. India that was ancient before Chaldea was dreamed of. India that went back thousands of centuries before Persia had come to the front. India was still a living nation, when the nations of the past were dead, and their dust had vanished from the surface of the Globe."

( Mrs. Besant on India and its mission. )

1 " Why was it that amongst such ancient civilization her's ( India's ) alone was living at the present day ? Why was it that amongst so many

( पुढें चालू. )

त्यांचा **धर्म** जागृत आहे. त्यांच्या **संस्था** कायम आहेत. त्यांच्यांत राजकीय **चळवळ** एकसारखी सुरू आहे. आणि ज्या साम्राज्याचा ध्वज त्यांनीं सुमुहूर्तावर लाविला, तें **हिंदुसाम्राज्य** आमच्या दैवदुर्विपाकानें जरी हल्लीं नष्ट झालें आहे तरी देखील, थेट **वैदिक** कालापासून तों तहत चालू एकोणिसाव्या शतकापर्यंत, आमच्या **हिंदुत्वाचा** झेंडा म्हणून कायमच राहिला आहे; व तो सदैव फडकत असल्याचें सर्वांस महशूरही आहे.

हिंदूंची अध्यात्म विषयांत पारंगता.

ह्याचें मुख्य कारण म्हटलें म्हणजे **अध्यात्मविषयांत** हिंदूंची पारंगता, **धर्मसंस्थांत** त्यांची दूरदृष्टि, व **सामाजिक** व्यवहारांत त्यांची परिपक्वता होय. त्याचप्रमाणें त्यांची परोपकारशीलता, त्यांचा सानुकंप स्वभाव, त्यांचें दीनवात्सल्य, आणि सर्व भूतांच्या ठायीं त्यांची दयार्द्रवृत्ति, हीं देखील त्यांच्या चिरस्थायित्वास विशेष कारणीभूत झालीं आहेत. पण ह्याच गुणांनीं **हिंदुसाम्राज्यास** अपाय आला; त्यांचें स्वातंत्र्य ह्यामुळेंच नष्ट झालें; आणि त्यांस दैन्यदशा देखील ह्याच कारणानें भोगावी लागली.

---

( मागील पृष्ठावरुन पुढं चालू. )

ruins India had still a future as well as the memory of a past? It was because of that difference of ideal which was spiritual more than intellectual, and spiritual more than physical."

( Mrs Besant on India and its mission. )

त्यापासून झालेले इष्ट व दुष्ट परिणाम.

आतां, आमचा देश सर्व प्रकारें उत्कृष्ट असूनही त्याला सांप्रतची विकलदशा कां आली, अथवा **आर्यसाम्राज्यांत** आम्हीं स्वातंत्र्याचा पूर्णपणें उपभोग घेत असतां, आम्हांस परतंत्रता काय कारणांनीं प्राप्त झाली, किंवा स्वातंत्र्याचें सर्व प्रकारें योग्य संगोपन होण्याविषयीं आम्हांस नैसर्गिक अनुकूलता असतांही, आज कित्येक वर्षे आम्हीं परकीयांच्या अमलाखालीं कां आहोंत, याविषयीं योग्य स्थळीं साधकबाधक कारणांसह सर्व बाजूंनीं विचार करण्यांत येईल. तसेंच, आमचे राजकीय प्रमाद, आमच्या सामाजिक चुका, धर्मविषयांत कित्येक बाबतींत आमची मिथ्याभक्ति व अतिविश्वास, आमची सांप्रतची शिथिलता, पूर्वीच्या प्रमाणानें आमचें हल्लींचें दौर्बल्य, अशक्तता, आणि सत्वहानि, यांबद्दलही त्याच वेळीं चांगला विचार करूं. परंतु, प्रस्तुत प्रसंगीं केवळ दिग्दर्शनासाठीं इतकें मात्र सांगणें जरूर आहे कीं, एकामागून एक अशीं अनेक राज्यें व अफाट देश जिंकून देखील आपली तृप्ति होत नाहीं; व आपलें विस्तीर्ण साम्राज्य सर्वत्र फडकत असतांही आपली तृषा मावळत नाहीं; आणि ऐहिक उन्नतींत आपलें श्रेष्ठत्व गाजत असूनही आपलें मन कोणत्याही प्रकारें समाधान म्हणून बिलकूल पावतच नाहीं; असें ज्या वेळीं आमच्या **पूज्य पूर्वजांस** दिसून आलें,

त्यावेळीं त्यांनीं दूरवर विचार करून, आपली दृष्टि पारमार्थिक विषयाकडेसच एकदम वळविली; व तन, मन, आणि धन, हीं सर्व त्यालाच त्यांनीं अर्पण केलीं. अशा स्थितींत बरेच दिवस लोटल्यावर अध्यात्म विषयाचा त्यांजला बराच व्यासंग होऊन, त्यांची त्यांत चांगली प्रवीणता झाली. त्यामुळें, पारमार्थिक विषयाची सत्यता व नित्यता, आणि ऐहिक विषयांचें मिथ्यत्व व क्षणभंगुरत्व, हीं त्यांच्या लक्षांत पूर्णपणें येऊन चुकलीं. तेव्हां ऐहिक साम्राज्य, व तज्जन्य सुख, यांवर लाथ मारून तद्विषयीं ते केवळ बेफिकीरच राहिले; आणि त्यांचें मन निरुपाधि होऊन, ते अध्यात्म विषयांत अगदीं निमग्न झाले.

त्याचीं कारणें.

बरें, ही मजल येवढ्यावरच आटपून राहिली, असें नाहीं. पारमार्थिक विषयाचें प्राबल्य दिवसानुदिवस वृद्धिंगत होतांच सर्वत्र ऐक्य वाटलें, आणि "**सर्वं खल्विदं ब्रह्मासि**" या उपनिषदांतील वाक्याची लागलींच स्फूर्ति होत गेली. तेव्हां द्वैत आपोआपच मावळलें. दुजाभावच राहिला नाहीं. "**आपपर नाहीं जया,**" असें झालें. आणि "**सर्वांभूतीं भगवद् भावो । हाचि भक्तीचा निज निर्वाहो ।**" याची सार्थकता त्यांस वाटूं लागली. त्यामुळें, नश्वर वस्तूचा संग्रह करण्याकडे त्यांनीं जाणूनबुजून दुर्लक्ष्य केलें. व तेणेंकरून आमच्या पारमार्थिक उन्नतीला मात्र खरोखरच

श्रेष्ठत्व आलें. तथापि, त्यायोगानें आमची ऐहिक उन्नति न होतां, उलटी अवनतीच होत गेली. आमच्यांत शिथिलता वाढली. आमचें साहस मावळलें. राष्ट्राचें समाजबंधन तुटत चाललें. जूट मोडली. कार्यक्षमता नाहींशी झाली. उत्साह राहिला नाहीं. आणि आम्हांस दौर्बल्य मात्र प्राप्त झालें. परंतु इतकें झालें तथापि, आमचें **धर्मबंधन** जबरदस्त व सर्वव्यापि असल्या कारणानें, आमचें **हिंदुत्व** कायम राहिलें. इतकेंच नाहीं तर, आमच्या धर्मांत ज्या ज्या वेळीं परकीयांनीं ढवळाढवळ केली, त्या त्या वेळीं आमचा **सनातनधर्म** सांवरण्यासाठीं, आम्हीं आकाशपाताळ एक केलें; आमच्या शत्रूंस केवळ दातीं तृण धरावयास लाविलें; आणि आमच्या **हिंदुधर्माचें साम्राज्य** पुनश्च प्रतिष्ठापिलें.

हिंदु धर्माची ग्लानि, व आमच्या गुणोत्कर्षांची उचल.

अशा वेळीं, आमच्या पूर्वज **आर्यांचे** जे जे उत्कृष्ठ गुण आमच्यांत जणूंकाय निद्रावस्थेंत व प्रच्छन्न राहिले होते. ते ते सर्व अकस्मात् क्षुब्ध होऊन अणीबाणीच्या प्रसंगाला एकदम जागृत झाले. शौर्य आणि साहस यांनीं तर कमाल करून सोडली, व अखिल जगास तोंडांत बोटें घालावयास लाविलें.

यात्रमाणें हजारों वर्षांच्या झटापटींत, आमचें **हिंदुराष्ट्र** कित्येक वेळां उन्नतीच्या पराकाष्ठेप्रत पोहोंचलें असतांही त्याला

हिंदूंचें हिंदुत्व राहण्याचें कारण.

पुनश्च अवनति प्राप्त झाली. पण ह्या अवनतीच्या भोंवऱ्यांत कायमचे गर्क होऊन तें रसाळतास न जातां, त्या निकृष्ठ दशेंतूनही कित्येक वेळां तें आपोआप सांवरलें, आणि पुनश्च उन्नतीप्रत पावलें. ह्याचें मुख्य कारण म्हटलें म्हणजे आमचा **हिंदुधर्म**, त्याचें **दृढबंधन**, व त्याची **सत्यपरायणता** होय.

पृथ्वींतील मुख्य धर्म.

आतां, ह्या पृथ्वींतले मुख्य धर्म कोणते, असा कोणी प्रश्न केला तर, ते विशेषतः पांचच असल्या विषयीं आपणांला उत्तर मिळेल. हे पांच धर्म म्हटले म्हणजे **१ हिंदुधर्म, २ झरथुष्ट्रधर्म, ३ बौद्धधर्म, ४ ख्रिस्तीधर्म**, आणि **५ इस्लामधर्म**, असे होत. सबब, हे प्रथमतः थोडक्यांत सांगूं; व तदनंतर सदरहू सर्व धर्मांचें संक्षेपानें वर्णन करूं.

वेद धर्मांपासून इतर धर्म.

हे पांचही धर्म, ज्या त्या धर्मपंथाच्या दृष्टीनें महत्वाचेच असल्या कारणानें, त्या प्रत्येकाबद्दल अगदीं स्वतंत्र रीतीनें पृथक् पृथक् भागांतच विवेचन करण्याचें योजिलें आहे. तथापि, या ठिकाणीं इतकें दिग्दर्शन करणें केवळ अवश्य आहे कीं, **वेदधर्म** किंवा **हिंदुधर्म** यापासूनच परंपरेनें परंतु थोड्याबहुत विपर्यासानें **झरथुष्ट्र** व **बौद्धधर्म** निसृत झाले असून, **बौद्धधर्मापासून**

ख्रिस्ती धर्म, आणि ख्रिस्ती धर्मापासून इस्लाम धर्म, याप्रमाणें सर्व क्रमशःच उद्भवले आहेत.

आर्यांची जी शाखा इराणाकडे गेली, तींत कांहीं-जणास हिंदुआर्यांचा पूजाविधि, किंवा इश्वरोपासना, अथवा अनेकदेवतार्चनपद्धति न आवडून, त्यांपैकीं झरथुष्ट्रस्पितमा नामक धर्माधिकाऱ्यानें एक निराळाच पंथ काढला. आणि हाच त्या सुप्रसिद्ध प्रतिष्ठापकाच्या नांवानें झरथुष्ट्र म्हणून सर्वांस महशूर आहे.

आतां, वेदधर्मदुर्गांत भेद करून बुद्धानें बौद्धधे-

---

1 * * * "The Zoroastrian religion arose in consequence of a serious conflict of the Iranians with those Arian brother-tribes which immigrated into Hindustan Proper, and whose leaders became in later times the founders of Bràhmanism."

(Dr. Martin Haug, on the religion of the Parsees). p. 248,

2 "We are, therefore, led to suppose the Bràhmin faith to have originated in early times, and that of Buddha to have branched off from it, at a period when its orthodox tenets had reached their highest perfection, if not shown a tendency to decline.

The historical information regarding these religions tends to the same conclusion."

(Elphinstone's History of India. P. 213).

( पुढें चालू. )

मोंचा प्रसार केला. किंबहुना, बौद्धधर्म हा सांख्यदर्श- नाचेंच आविष्करण, किंवा हिंदुधर्माची एक शाखाच आहे, असेंही म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

Vide also I Journal Asiatic (Nouvean), vol. VII. p.p. 182, 183, 184.

II Turnour's Mahàwanso.

III Journal Asiatic society Calcutta. vol I.

IV Princep's Useful Tables. p.p. 77-78.

V The oriental Magazine. vol. IV. p. 106-107.

VI Wilson. Asiatic Researches vol XV. p. 92.

"In this, as in its other features, the story of Buddha adheres to ancient Aryan types, but gives to them a New spiritual significance."

"But he (Buddha) developed from the old Bràhmanical model of the wandering ascetic." * *.

( Dr. Hunter's Indian Empire. p. 135 )

1 "Buddhism and Bráhmanism are unquestionably united by intermediate links. * *. Buddhism was merely the Sänkhya philosophy widened into a national religion; and the religious life of the Buddhistic orders was the old Bráhmanical type popularized. * * * Buddhism was not a sudden invention of any single mind, but a development on a broader basis of a philosophy and religion which preceded it."

(Dr. Hunter's Indian Empire. p. p. 153-154).

बौद्धधर्मापासूनच खिस्तीधर्म उद्भवला. आणि खिस्तिधर्म व्याकीर्ण व निस्सत्व झालेला पाहूनच महमदानें आपलें नांव राखण्याकरितां, इस्लाम धर्माची नूतन प्रतिष्ठापना केवळ आपमतलबानेंच केली.

---

1 "Dean Mansel admits that the philosophy and rites of the Therapeuts of Alexandria were borrowed from the Buddhist missionaries who visited Egypt within two generations of the time of Alexander the Great. Philosophers like Schelling and Schopenhauer, and Scholars like Lassen support this view. Dean Milman maintains that the Therapeuts sprang from the contemplative fraternities of India."

(Dutt's Ancient India. p. 452).

"That Christianity was but an inferior copy of a greater original ( Buddhism)"

( India what can it teach us ? )

By Maxmuller. p. 279.

(भारतीय साम्राज्य पुस्तक दुसरें, पान १७८।१७९ पहा.)

2 "But they ( impartial writers ) deny to it ( the Koràn ) the praise of originality. They trace it partly to the Jewish and Christian, scriptures partly to the Talmud, and Rabbinical traditions ; partly to apocryphal gospels and partly to the fables then current in Arabia. "

* * * In its general outline of facts, the Korán corresponds with the old Testament." * *

"Again, with the New Testament, the Korân

( पुढें चालू. )

आतां, ह्या सर्व गोष्टींत विशेष महत्त्वाची गोष्ट ही आहे कीं, **बुद्ध** जन्मल्याला आज सुमारें अडीच हजार वर्षें होऊन गेलीं. **ख्रिस्ताला** जन्मून दोन हजार वर्षें झालीं. **महमदाचा** जन्म होऊन बाराशें वर्षांवर होत आलीं. आणि ह्या सर्वांच्याही पूर्वी **हिंदुधर्म** फैलावला असून, त्याच्या उत्पत्तीचें कारण तर वेदाप्रमाणेंच सखोल आणि **अनादि** आहे. **बुद्ध, ख्रिस्त,** व **इस्लाम** धर्म उदयास आल्यापासून, इतर देशांतल्या लोकांची अनेक धर्मांतरें झालीं. परंतु धर्मसंबंधीं आमची स्थिति पूर्ववतच आहे. आम्हीं आपला धर्म आहे तोच राखून आहोंत. फक्त आमच्या मर्जीप्रमाणें मात्र त्यांत जरूर तो फेरबदल, त्याच्या मुळांस कोणत्याही प्रकारें यत्किंचित् देखील धक्का न लावितां, आम्हीं करीत आलों आहोंत. आमच्या धर्मावर, आणि त्या कारणानेंच आमच्या साम्राज्यावर, आजपर्यंत असंख्य संकटें गुदरलीं. पण त्या सर्वांतून आमचा बचावच होत गेला. इतकेंच नाहीं तर, त्या संकटांतून पार पडल्यानंतर आम्हांस ज्यास्त हुरूप व उमेद येऊन,

अन्य राष्ट्रांचें धर्मांतर.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

concurs in the recognition of Jesus Christ as the promised Messiah of the Jews. * * * * * *

( Life of Mahamed. Bombay Tract and Book society. Third Edition. p p. 134-135-136 ).

आमच्या **पराक्रमसूर्याचें** तेज ज्यास्त प्रखर भासूं लागलें खरोखर, अशा प्रकारची स्थिति अन्य कोणत्याही प्राचीन राष्ट्राची असल्याचें दिसून येत नाहीं.

त्यांची नश्वरता.

आपलीं नगरमंदिरें थेट स्वर्गाप्रत पोहोंचविण्याचा वृथा प्रयत्न करून, **बाबिलन** तर कायमचें मावळलें. ठिकठिकाणीं प्रचंड मनोऱ्यांचें स्मारक करून, अखेर **मिसर** देशही निमाला. अनेक राज्यें जिंकून, शेवटीं **इराण** देश सुद्धां रसातळास पोहोंचला. विविध ललितकलांत आपलें बुद्धिवैभव दाखवून, अखेरीस **ग्रीस** देश देखील उध्वस्त झाला. आणि आपल्या साम्राज्याचा डौल मिरवितां मिरवितां, **रोम** देशालाही अखेरीस भिक्षांदेहिच करावी लागली. परंतु, सदरहू सर्व राष्ट्रांपेक्षां **भरतखंड** अति प्राचीन असून देखील, आमचे **हिंदुराष्ट्र** अजून जसेंच्या तसेंच आहे. त्याचें **हिंदुत्व** आद्यापि कायम आहे. व त्याचा सनातन **हिंदुधर्म**ही अजून जागृत आहे. हजारों शतकांच्या घडामोडींत, त्याला म्हणून आजपर्यंत बाधच आला नाहीं. अनेक राज्यक्रांतीचा प्रचंड झंझावात सुटला असतांही, त्याला तिळमात्र देखील धक्का पोहोंचला नाहीं. कित्येक धर्मांतराचीं भयंकर वावटळें पसरलीं असतांनाही त्याचीं अवनति म्हणून बिलकूल झालीच नाहीं. आणि नानाप्रकारचीं

असंख्य संकटें त्यांजवर कोसळलीं असतांही त्याला यत्किंचित् देखील गौणत्व आलें नाहीं.

धर्म व नीतीमुळें राष्ट्राची उन्नति.

प्रत्येक राष्ट्राच्या उन्नतीविषयीं आपण दूरवर विचार केला तर आपणांस असें दिसून येईल कीं, त्या राष्ट्राचा धर्म, आणि तदंतर्गत नीतिमत्तेची उत्तमावस्था, हींच त्याच्या वैभवाचीं मूळ कारणें होत. आणि जावत्-कालपर्यंत हीं दोन्हीं तत्त्वें मजबूत पायावर असतात, तावत्-कालपर्यंत त्या राष्ट्राला मरणाचें म्हणून अगदींच भय नसतें. आणि याच कारणांसाठीं आमच्या हिंदुत्वाला, अथवा आमच्या हिंदुराष्ट्राला, कायमचें मरण किंवा निरंतरची ग्लानि येण्याचा मुळींच संभव नाहीं.

तद्विषयक पहिलें प्रत्यक्ष प्रमाण.

आतां, कदाचित् हें लिहिणें कित्येकांस अतिशयोक्तीचें दिसेल. किंबहुना, कांहींस तें वृथाभिमानाचेंही वाटेल. परंतु, ऐतिहासिक प्रमाणांकडेसच जो कोणी विशेष लक्ष्य पुरवील, त्याला तें अगदीं देखील मिथ्या भासणार नाहीं. शिवाय, याच संबंधानें दुसरी एक गोष्ट सुद्धां विशेष महत्वाची असल्या कारणानें, त्याविषयी देखील फार दूरवर विचार करणें अत्यवश्य आहे. आणि तिजवर नजर पुरविली म्हणजे तर असें वाटतें कीं, या बाबतींत इतिहासाचें प्रत्यक्ष प्रमाण जित-

क्या अंशानें बलवत्तर आहे, तितक्याच अंशानें अप्रत्यक्ष प्रमाणाची देखील आपणाला चांगली बळकटी मिळते.

कारण, आमचें हिंदुराष्ट्र दिवसानुदिवस अवनतीप्रतच पोहोंचणार अशी कल्पना केली तर, ती विसंवादी व असंबद्ध दिसते. आणि आमची सुमारें वीस कोटी हिंदुप्रजा केवळ नष्ट दशेप्रत पोहोंचविण्यासाठींच परमेश्वरानें उत्पन्न केली आहे, असें म्हणणें म्हणजे अगदींच अन्यायाचें व साहसाचें वाटतें.

व दुसरें अप्रत्यक्ष प्रमाण.

कित्येक पाश्चात्य विद्वानांचें असें मत आहे कीं, प्राच्य राष्ट्रांची जितकी म्हणून उन्नति व्हावयाची होती तितकी होउन गेली असून, आतां त्यांजला

त्या बाबतींत कित्येक पाश्चात्यांचें मत.

1 " Their intellectual condition has passed onward, never more to return. It remains for them only to advance as far as they may in their own line and to die, leaving their place to others of a different constitution and of a renovated blood. In life there is no going back ; the morose old man can never resume the genial confidence of maturity ; the youth can never return to the idle and useless occupation, the frivolous amusements of boy-hood ; even the boy is parted by a long step from the innocent credulity of the nursery."

(Intellectual Development in Europe.)

By Draper vol. I. p. 57.

एक प्रकारची स्थिरता प्राप्त झाली आहे. ह्या स्थितींत त्यांजला जितके दिवस राहणें शक्य असेल तितके दिवस काढून, तीं हळूं हळूं संपुष्टांत येणार; त्यांच्या नाड्या क्रमाक्रमानें आंखडत जाणार; आणि शेवटीं तीं मरणत्व पावणार. आतां, राष्ट्राचें मरण म्हटलें म्हणजे त्याचें **स्वातंत्र्यापहरण** होय. अमुक एक राष्ट्र लयास जाणार किंवा मृत्यु पावणार, म्हणजे त्यांतील प्रत्येक व्यक्ति नष्ट होणार अथवा पंचत्वाप्रत जाणार, असा अर्थ नव्हे. तर त्याचें पारमार्थिक कुतूहल, त्याचें राजकीय स्वातंत्र्य, त्याची सामाजिक उन्नति, त्याचें औद्योगिक साहस, त्याचा बुद्धिप्रभाव, आणि त्याचें सांपत्तिक ऐश्वर्य, इत्यादि सर्व नष्ट होऊन, तें राष्ट्र अखेरीस अवनतीप्रत पावणार, असें समजावयाचें.

आमच्या प्राच्यराष्ट्राची उन्नतावस्था पुढें पुढें जाऊन, ती परत फिरण्याची आतां बिलकूल आशाच राहिली नाहीं. आपापल्या मार्गानें जाववेल तितके जाऊन, शेवटीं हीं राष्ट्रें लयाप्रत पावणार; आणि त्यांच्या जागीं भिन्न शीलाचीं, ताज्या रक्ताचीं, व निराळ्या जोमाचीं दुसरीं राष्ट्रें येणार. मनुष्याच्या आयुष्यक्रमाची ज्याप्रमाणें पीछेहाट होत नाहीं, अथवा एकाद्या जरखड म्हाताऱ्याच्या अंगीं तारुण्याची तरतरी, आणि त्याचें चांचल्य ज्याप्रमाणें वसत नाहीं, त्याचप्रमाणें पुराण राष्ट्रें फिरून कधींही सरसावत

नाहींत, किंवा पुनश्च उफाळ्यासही येत नाहींत, अशी कित्येक पाश्चात्यांची कल्पना आहे.

सृष्टगोष्टींच्या परिणामांवर, तसेंच भोंवतालच्या आनुषंगिक कारणांवर, हे गृहस्थ वाजवीपेक्षां फाजील विश्वास ठेवितात, व त्यामुळें त्यांचे कित्येक सिद्धांत चुकीचेही ठरतात. आणि ह्याच मालिकेंतील ड्रेपर प्रभृति पाश्चात्य होत.

परंतु, हें लिहिण्यास आम्हांला फारच आनंद वाटतो कीं, अलीकडे दिवसानुदिवस, या देशांतील व यूरोपखंडांतील विद्वन्मर्गीनें अगदीं ह्याच्या उलट मत होत चाललें आहे. आणि त्यावरून आमचें राष्ट्र मरणार नाहीं, अशी आम्हांला खचितच आशा वाटत आहे.

तद्विरुद्ध इतरांचें मत.

या संबंधानें **नामदार रावबहादूर महादेवराव गोविंद रानडे** यांचें व्याख्यान अत्यंत महत्वाचें असल्या कारणानें, विशेष विचार करण्यासारखें आहे. ते असें म्हणतात कीं, ईश्वराची आम्हां हिंदूंवर पूर्ण कृपा आहे. सबब तो आपणांस हात देईल, आणि आपली उन्नति खात्रीनें होत जाईल. आपण उद्योग केल्यावर एतद्विषयीं निराश होण्याचें, किंवा आपल्या **राष्ट्रास** मरण येईल अशी भीति बाळगिण्याचें, आपणांस यत्किंचित् देखील कारण नाहीं.

तत्संबंधीं नामदार रानडे यांचा अभिप्राय.

## " आम्ही ईश्वराचे लाडके आहोंत. "[1]

या विषयावर नामदार मजकूर यांचें प्रसिद्ध इंग्रजी भाषण, पुणें येथील प्रार्थनासमाजाच्या वार्षिक उत्सवा-निमित्त, मार्गशीर्ष वद्य २, शके १८१४ रोजीं सोमवारीं,[2] झालें. त्यावेळीं त्यांनीं असें बोलून दाखविलें कीं, आमच्या राष्ट्राला मरण येण्याची अगदींच भीति नाहीं. कारण हा रोगी[3] मरणार नाहीं, असें सांगणारे कित्येक पाश्चात्य व पौरस्त्य वैद्य असून, मी स्वतः त्यांपैकींच एक आहें. ह्या संबंधानें त्यांचें असें मत आहे कीं, आपलें हिंदुराष्ट्र बिलकुल मृतप्राय होणार नाहीं. इतकेंच नाहीं तर त्याची जीवनकला, ह्मणजे त्याचें पूर्वीचें सत्व आणि तेज, इत्यादि त्यास पुनश्च प्राप्त होण्याची दिवसानुदिवस बरीच आशा वाटत आहे. जुन्यांतलें चांगलें तें घ्यावें आणि वाईट टाकून द्यावें, तसेंच जें कांहीं नवें ह्मणून दिसेल, त्यांतल्याही चांगल्या गोष्टी घ्याव्या, असा आमचा वर्तनक्रम फार प्राचीनकाळापासूनच चालत आला आहे; व त्यापासून होणाऱ्या सुपरिणामावर आमचा पूर्ण विश्वासही आहे. तेव्हां, आमचें राष्ट्र नष्ट होणार ह्मणून ड्रेपरनें जीं जीं

---

1 We are the chosen people of God.

२ तारीख ५ डिसेंबर, सन १८९२.

३ म्हणजे भरतखंड देशरूपी रोगी.

प्रमाणें पुढें ठेविलीं आहेत, त्यांचाच ऐतिहासिक व शा-
स्त्रीयदृष्ट्या आपण विचार करूं.

त्याचा ऐतिहासिक व शास्त्रीयदृष्ट्या विचार.

मुख्यत्वें करून ड्रेपरनें दोनच प्रकारचीं प्रमाणें दाखविलीं आहेत. पहिलें इतिहासाचें, व दुसरें सृष्टपदार्थांच्या नियमाचें. ड्रेपराच्या मतें नष्ट झालेलें राष्ट्र, एकाद्या नूतन राष्ट्राच्या संगतीनें, किंवा विद्याप्रसाराच्या योगानें, अथवा स्वतःच्या मुद्दाम केलेल्या प्रयत्नानें, कधींही उन्नतीस आल्याचें आढळत नाहीं; किंवा त्याचें पुनरुज्जीवन झाल्याचें कोठें देखील दिसून येत नाहीं. आतां, सृष्टिशास्त्राच्या नियमाच्या संबंधानें त्याचा ( ड्रेपरचा ) असा अभिप्राय आहे कीं, सभोंवतालच्या हवापाण्याच्या स्थितीप्रमाणें, आणि सृष्टिगत अन्य कारणानें, राष्ट्राच्या शरीरांतील कांहीं नियमित शक्तींस अवश्य तें खाद्य मिळून, त्यांची तितक्यापुरतीच उन्नति, व तेवढीच भरभराट होते. परंतु इतर शक्ति प्रच्छनावस्थेंत राहिल्यानें, किंवा सुषुप्त असल्यानें, त्या हळूंहळूं बधिर होत जाऊन, शेवटीं आपोआपच नष्टप्राय होतात. त्यांजला पुनश्च उत्तेजन मिळणें किंवा त्यांच्यांत नवीन जीव येणें ह्मणजे, सृष्टिशास्त्राच्या नियमाविरुद्ध होय. अशा प्रकारचें दोन धारेचें शस्त्र हे ग्रंथकार आमच्यांवर फेकित असून, त्याचें निवारण करणें प्रथमदर्शनीं जरासें कठिण

भासतें. कारण पहिलें ऐतिहासिक प्रमाण व दुसरें सृष्टि-
शास्त्राच्या नियमांचें प्रमाण. तेव्हां त्यांतून बचाव होऊन
निसटून जाणें विशेष अडचणींचें दिसतें.

तत्संबंधीं अप्रत्यक्ष प्रमाण.

तथापि, ह्या दोन्हीं प्रमाणांच्याही विरुद्ध आमचें मत
आहे, असें आह्मांला अगदीं निक्षून
सांगावें लागतें. कारण, ह्या संबंधानें
आमचा अभिप्राय असा आहे कीं,
वीस कोटी लोक नष्ट दशेप्रत जावे, या हेतूनेंच ते
परमेश्वरानें निर्माण केले, असें प्रतिपादन करण्याकडे
आमच्या मनाची प्रवृत्तीच होत नाहीं. प्रत्यक्ष प्रमाण न
दाखवितांही आपणांस विश्वास ठेवणें अगदीं भाग पडतें,
अशा गोष्टी पुष्कळ आहेत. प्राणिमात्रास आत्मा आहे
कीं नाहीं, आणि असल्यास तो कोठें आहे, असा जर
कोणी प्रश्न विचारला तर तो आहे, ह्मणून एकदम उत्तर
मिळेल. आतां, हा आत्मा असल्याविषयींचें प्रत्यक्ष प्रमाण
जरी दाखवितां येणार नाहीं, तरी तत्संबंधीं जो आमचा दृढ
विश्वास आहे, त्यांत तद्विरुद्ध असलेल्या शास्त्रीय किंवा ऐति-
हासिक प्रमाणांनीं देखील, तिळमात्रही बदल होणार नाहीं.

ऐतिहासिक प्रमाण, व भारतीय उन्नतीची पुनरावृत्ति.

हें एक अप्रत्यक्ष प्रमाण झालें. आतां, यूपरच्या ऐतिहा-
सिक प्रमाणाच्या संबंधानें आमचें
असें ह्मणणें आहे कीं, इतिहा-
साच्या दृष्टीनें पाहिलें तर, यूपरनें

लिहिलेलें ऐतिहासिक प्रमाण आमच्या देशाला मुळींच लागू पडत नाहीं. कित्येक वेळां आह्मीं अगदीं नष्टप्राय होऊन पुनश्च उन्नतावस्थेप्रत पावलों आहों. पुष्कळ वेळां असें होत असतें कीं, एकादें भयंकर दुखणें येऊन, त्यांत तें मनुष्य अगदीं जेरीस येतें, व शेवटीं मरणाच्या पंथासही लागतें; परंतु वास्तविक पाहतां, तें दुखणें घातक नसून, तें परमेश्वरानें केवळ आपल्या हितासाठींच पाठविलेलें असतें. त्यामुळें त्या दुखण्यांतून पार पडतांच, त्याबरोबर आपल्या शरीरांतले कित्येक दोषही नाहींसे झाल्याचें आपणांस आढळतें. व अशा प्रकारच्या दुखण्याचा पुष्कळांस अनुभव असून, तसा आपल्याला स्वतः देखील अनेक वेळां आलेला आहे.

इतर राष्ट्रांचें देहावसान, व हिंदूचें जीवन.

ह्याच मासल्याची आमच्या देशाची स्थिति आहे. हिंदूशिवाय इतर सर्व प्राचीन राष्ट्रांचें देहावसान झालें, आणि हल्लीं त्यांचा फक्त नामावशेषच राहिला आहे. मिसर देशाचीं पडकीं सडकीं भिंताडें व उध्वस्त झालेले मनोरे दृष्टीस पडतात. रोमचा राज्यविस्तारही कथावशेषच आहे. फक्त ग्रीसच्या बुद्धिवैभवाची मात्र चमक मारते. पण सांप्रतकालीं तें देखील स्मृतिविषयाप्रतच गेलें असून, पूर्वीपैकीं हल्लीं कांहींएक राहिलें नाहीं. परंतु हिंदूचें तसें नाहीं. ह्यांची स्थिति कांहीं निराळीच असल्याचें दिसून येतें.

अनेक संकटांतून आमचा तरणोपाय.

'आमचा देश, अनेक प्रसंगीं, कालचक्राच्या भयंकर फेऱ्यांत सांपडून, केवळ निश्चेष्ट आणि मृतप्राय झाला असतांही, तो पुनश्च उन्नतीप्रत पावला. इतकेंच नव्हे तर, ह्या उन्नतींत आमच्यांतील कित्येक वाईट गोष्टी, त्या विपदवस्थेंतील सपाट्याबरोबरच एकदम नाहींशा झाल्या. आमच्या देशांत घडून आलेलें बौद्धधर्माचेंच परिवर्तन घ्या. हें धर्मांतराचें तुफान जरा प्रचंडच होतें. त्यामुळें हिंदुधर्म केवळ नष्ट होऊन शेवटीं अखिल भरतखंडभर बुद्धाच्याच धर्माचा प्रसार होणार कीं काय, अशी सर्वांस फारच भीति वाटूं लागली. परंतु त्या संकटांतून आम्ही पार पडलों, व आमचा धर्म सांवरला. तथापि आमच्यावर, धर्मान्तराची ही एक दारुण गदाच येऊन ठेपल्यामुळें, आम्ही मध्यस्थवृत्तीनें अवलंबन केलें, आणि तडजोड स्वीकारली.

बौद्धधर्माचें सत्र, व इस्लाम धर्मीचें होम कुंड.

आतां, दुसरा प्रसंग तर याहूनही विशेष भयंकर होता. तो कोणता म्हणाल तर इसलाम धर्माची अनन्वित गर्दी, व त्यापासून झालेला भयंकर परिणाम. ह्या वेड्या धर्मांतराची धामधूम कितपत भयंकर होती हें आम्हां दाक्षिणात्यांस तितकें विशेष रीतीनें कळण्यासारखें नाहीं. परंतु उत्तरेकडे गेलें असतां, ती यथार्थ कळ-

ण्याजोगी आहे. ह्या धर्मक्रांतीनें तिकडे जो कांहीं कहर उडवून दिला, तो सांगतां पुरवत नाहीं. त्या धर्माचें विक्राळ स्वरूप प्रत्येक क्षेत्रांत, आणि प्रत्येक देवालयांत दृष्टिगोचर होतें. **उत्तरहिंदुस्थानांत** असें एकही जुनें देऊळ दृष्टीस पडणार नाहीं कीं, ज्याचें शिखर इतर घरांच्यावर डोकावत आहे. ह्या राजक्रांतीनें आमच्या युवतीजनांस तर अगदीं पडद्यांतच ठेविलें, आणि त्यांस अज्ञानांधकारांत निव्वळ कोंडून टाकिलें. अशा प्रकारची आमची पूर्ण निराशेची स्थिति झाली असतांही, त्यांतून आम्हीं उत्तम प्रकारें निभावलों. इतकेंच नाहीं तर, त्या धामधुमींत आम्हीं पुष्कळ वाईट गोष्टी सोडूनही दिल्या, व चांगल्या होत्या त्यांचा अंगिकार केला.

त्याचा परिणाम.

ऐतिहासिक प्रमाणांवरून असें दिसतें कीं, कोणत्याही राष्ट्रास चांगली स्थिति येण्याच्या अगोदर वाईट स्थिति भोगावी लागते. आणि अशा प्रकारें बरें करण्याच्या हेतूनेंच **ईश्वर** आपणांवर नानाविध प्रसंग आणितो, व त्या योगानें तो आपणांस एक प्रकारचें शिक्षणही देतो. **इसलामशाहीच्या** प्रळयकाळचें होमकुंड ज्या वेळेस पेटलें, त्या वेळेस त्याच्या ज्वाळा अखिल **भरतखंडभर** पसरल्या; त्याचें तुफान सर्वत्र भासमान होऊं लागलें; आणि त्यायोगें दाहीदिशा अगदीं दणाणून गेल्या. आमच्या अंगाला चटका बसला;

आमचा देह पोळला; आणि आमचा **हिंदुधर्म** आतां रसातळास जातो कीं काय अशी सर्वांस दहशत वाटली. परंतु त्याचा प्रतिकार लवकरच झाला.

ही धर्मग्लानि येतांच आमचे बाहू स्फुरण पावूं लागले,

त्यापासून झालेलें स्फुरण.

आणि **भगीरथ** प्रयत्न करून आमचा धर्म सांवरण्याचें आमच्यांत धैर्य आलें. त्याच आवेशांत आम्ही कित्येक देशोन्नतीचीं कामेंही केलीं; व आम्हीं आपला देश परकीयांच्या अमलांतून कांहीं कालपर्यंत सोडविला. **इसलामशाहीनें** आमच्या धर्मावर जो निष्कारण हल्ला केला, त्यामुळेंच आम्हीं एकदम सरसावलों व **मराठे** आणि **शीख** यांनीं अखिल **भरतखंडभर** जें आपलें नांव गाजविलें, तो ह्याचाच प्रत्यक्ष परिणाम होय.

अशा प्रकारें ऐतिहासिक प्रमाणांनीं सिद्ध होत असलेली गोष्ट मी कशीबशी वाचकांपुढें भीत भीत ठेविली. आतां ती ठेवीत असतां, माझ्या मनाची चलबिचल होऊन तें कित्येक वेळां अगदीं साशंकही झालें. कारण एकंदर मताधिक्य तद्विरुद्धच असल्याचें भासलें. परंतु, **नामदार राव बहादूर महादेव गोविंद रानडे** यांच्या सारख्या प्रचंड विद्वान, शोधक, आणि इतिहासतत्त्ववेत्यांचा देखील तदनुकूल असाच अभिप्राय पडल्याकारणानें माझ्या मनाला उत्साह वाटून त्यासरशी मजला एकदम हुरूपही आली.

असो. हें ऐतिहासिक प्रमाण झालें. आतां शास्त्रीय

ड्रेपरच्या मताचें प्रमाणाचा विचार करूं. ड्रेपर, बकल्,
खंडन, वगैरे ग्रंथकार, हे देशस्थिति व सृष्टि-
रचना, इत्यादिकांचा लोकस्थितीवर जो परिणाम होतो, त्याला वाजवीपेक्षां फाजील महत्व देऊन, असें प्रतिपादन करितात कीं, हिंदुस्थानांतील नद्या व पर्वत वगैरे दीर्घ-प्रमाणावर असल्याकारणानें तेथील लोक लहान बांध्याचे व ठेंगणे आहेत. परंतु युरोपांतील लोक तसें नाहींत. ते उंच व धिप्पाड आहेत. कारण तिकडील पर्वत व नद्या लहान आहेत.

आतां, हवापाणी, देशाची ठेवण, वगैरे गोष्टींचे परिणाम लोकस्थितीवर होतात खरे. पण ते अशाप्रकारचे असतात असें म्हणणें जरा चमत्कारिक दिसतें, व तें अनेक उदाहरणांवरून दाखवितांही येईल. कारण, प्रत्येक मनुष्यमात्र हा ज्या त्या देशाच्या सृष्टस्थितीप्रमाणें आपल्या स्वतःची स्थिति तेव्हांच बदलून टाकतो. ह्याचें प्रत्यक्ष उदाहरण इंग्रजांचेंच घ्या. हें लोक बर्फाळ आणि थंड देशांतले असून देखील, तें पृथ्वीवरील पाहिजेल त्या प्रदे-शांत जाऊन राहिले आहेत. व तेथें त्यांच्या संततीची वाढ आणि उन्नतावस्था फारच आश्चर्य वाटण्यासारखी होत आहे. त्यामुळें हें शास्त्रीय प्रमाण विशेष बलवत्तर आहे, असें म्हणण्यास अडचण वाटते.

आमच्यावरही अशाच प्रकारचा परिणाम होत आहे, आणि सध्यांची आमची स्थिति देखील आमच्या बऱ्या करितांच परमेश्वरानें आम्हांस दिली आहे. त्याच्या

व आमच्या प्रस्तुत स्थितीचा विचार.

मनांतून आमचा नाश करावयाचा नसून, यापेक्षांही चांगल्या स्थितींत आम्हांस आणून सोडावयाचें आहे. आजपर्यंत घरच्या उपायांचा यत्न चालला होता. पण आतां **इंग्रज** हे बाहेरचे वैद्य आम्हांकडे **परमेश्वरानें** पाठविले आहेत. आम्हांला ह्या लोकांचा सहवास आज सुमारें ८० पासून १५० वर्षांचा असून, तितक्या मुदतींत आमची स्थिति वाईट न होतां, उत्तरोत्तर ती बरीच होत चालली आहे, असें प्रत्येकाला कबूल करावें लागेल.

**परमेश्वरानें** आम्हांवर आणलेलीं संकटें केवळ आमच्या हितासाठींच होत. जुन्या करारांत **यहुदी** लोकांस ईश्वराचे आवडते मानिले आहेत, व **जरूसेलम** येथील राज्य आपणांस परत मिळणार ह्मणून ते निराशेचीही आशाच करीत बसले आहेत. परंतु खरोखर पाहिलें तर देवाचे **लाडके लोक आह्मींच आहोंत**. कारण, कालानुरूप, भिन्न भिन्न वेळीं, पृथक पृथक लोकांबरोबर, आमची सांगड लावून देऊन **ईश्वर** आम्हांस एकप्रकारचें शिक्षण देतो, आणि आम्हांस अनेक संकटांतून बचावतो. व त्यामुळेंच आम्हीं नष्ट झालों नाहीं. जुन्यांतलें चांगलें व

उपयुक्त असेल तें ठेवून वाईट तेवढें टाकावें, आणि नव्यांतलें उपयुक्त तितकेंच घ्यावें, अशी आम्हांला नेहमींची संवय असल्याप्रमाणें आम्हीं तसें सततच करीत गेलें पाहिजे. मात्र आम्हीं देवाचे लाडके आहोंत, व तो आमच्यावर पूर्ण कृपा करील, असें मानून आपण उगीच फुगून बसतां कामानये. आपणांस निरंतर उद्योग केला पाहिजे. मागल्या गोष्टीचा फक्त अभिमान धरूनच कांहीं एक उपयोग होणार नाहीं. इतकेंच नाहीं तर, वृथाभिमानानें आह्मीं जागच्याजागीं थिजून मात्र जाऊं, आणि मरण पावूं. परंतु तेच आह्मीं सदैव उद्योग करूं लागलों, व अश्रांत परिश्रम घेतले, तर ईश्वर आपणांस हात देईल, आणि आपली उन्नति खात्रीनें होत जाईल. आपण मेहनत घेतल्यावर, यासंबंधानें निराश होण्याचें, किंवा आपल्या राष्ट्रास मरण येईल अशी भीति बाळगण्याचें यत्किंचित् देखील कारण नाहीं.

असो. इतकी गोष्ट आतां अगदीं निर्वेधपणें सिद्ध आहे कीं, आमच्या जीवनाला मुख्यत्वेंकरून आमचा धर्मच कारणीभूत झाला असून, त्यामुळेंच आमची पुनश्च उन्नति होईल अशी आह्माला थोडी बहुत उमेद येत आहे.

आमची पुनश्च उन्नति होण्याच्या संबंधानें आनि विसांटचें मत.

अशा प्रकारची आमची उन्नति होईल, असें कांहीं

काहीं **पाश्चात्यांस** देखील आतांशा वाटूं लागलें आहे. आणि त्यांपैकींच **आनि बिझांट्** नांवाच्या सुप्रसिद्ध बाई होत. ह्या विदुषी **भरतखंडांत** ठिकठिकाणीं फिरल्या, आणि अनेक राजधान्यांत व नामांकित शहरांत त्यांनीं **अध्यात्मविद्येवर** व्याख्यानें दिलीं, व **आधिभौतिक** शास्त्रसंबंधीं चर्चा केली. त्यांची विद्वत्ता व उद्योग, त्यांचें धैर्य व साहस, आणि त्यांचें वाक्पटुत्व व कळकळ, हीं खरोखर फारच आश्चर्यकरण्यासारखीं आहेत.

तिची विद्वत्ता व उद्योग.

त्यांनीं **यूरोप** व **अमेरिका** खंडांतले बहुतेक प्रदेश पाहून, एकंदर अठरा एकोणीस भाषांचें ज्ञान चांगल्या प्रकारें संपादन केलें. **पाश्चात्यांची** समाजरचना, त्यांचीं धर्मतत्वें, त्यांचा शास्त्रप्रसार, त्यांचें आधिभौतिक वैभव, त्यांची राजनीति, व त्यांच्यांतील राजकीय चळवळी, इत्यादि ठळक ठळक गोष्टींची आमूलाग्र माहिती त्यांस असून, ते सर्व विषय केवळ करतलामलकवत्च त्यांजला अवगत आहेत. सर्व धर्मांत उत्तम धर्म कोणता, याविषयींची तीव्र जिज्ञासा, व अत्युत्कट कुतूहल, हीं कालगत्या जागृत झाल्याकारणानें, ह्या बाईनीं गेल्या वीसपंचवीस वर्षांत सतत शास्त्राध्ययन चालविलें, आणि कित्येक वर्षें तत्वविचाराशिवाय दुसरा व्यासंगच त्यांनीं केला

तिचें अन्य धर्माव-लोकन, व धर्मांतर

नाहीं. ख्रिस्ती धर्मादिकरून त्यांनीं नानापंथांचें परीक्षण केलें, व ते सर्व कसोटीस लावूनही पाहिले. परंतु त्या कोणत्याही धर्मांतल्या तत्वांनीं, किंवा कोटिक्रमांनीं, त्यांचें म्हणून बिलकूल समाधानच होईना; अथवा मनास यत्किंचित् देखील शांति वाटेना. अखेरीस कशांत कांहींच तत्व नाहीं, असें त्यांजला वाटूं लागलें, व त्या शेवटीं अगदीं नास्तिक देखील बनल्या. अशा प्रकारें त्यांचीं अनेक मतांतरें झालीं; तथापि, कांहीं केल्या चित्ताचें स्वास्थ्य व निर्वृति अशी होईचना. ह्मणून त्यांनीं हिंदुधर्माचें परिशीलन केलें, आणि त्यांतील उपनिषदादि तत्वविषयक ग्रंथ समजून घेतले.

तिची हिंदुधर्मावरील श्रद्धा.

तेंव्हांपासून बिझांटबाईच्या एकंदर स्थितींत उत्तरोत्तर बदलच होत गेला; दिवसानुदिवस अध्यात्म विषयाची त्यांस ज्यास्त गोडी लागत चालली; आणि हरएक गोष्टींत प्रत्येक शंकेचें समाधानच होत गेल्यामुळें, त्यांची

---

I " Then, man having accomplished his mission passes upward again to the source whence he came. That, I claim, is India's *right to immortality*, that is a claim to take her *place* among the nations of the world. For, *no where else* do you find a perfectly reasoned-out scheme of human existance, which can be justi-

( पुढें चालू. )

चित्तवृत्ति आपोआपच प्रफुल्लित झाली. त्या कारणानें त्यांस साहजीकच असें वाटूं लागलें कीं, इतर सर्व धर्मांतील तत्वांपेक्षां हिंदुधर्मांतील तत्वरहस्यें खचितच अधिक श्रेष्ठ आहेत. तो धर्म अतिपुराण असूनही त्यांतील तत्वविचार फारच मार्मिक आणि प्रगल्भ आहेत. कारण **जीव** आणि **शिव**, **आत्मा** व **प्रकृति**, **नित्य** आणि **अनित्य**, **ब्रह्म** व **माया**, इत्यादि सर्व गोष्टींचें त्यांत संपूर्ण विवेचन केलेलें आढळतें. आपण कोण, कोठून आलों, आणि कोठें जाणार, वगैरे अत्यंत महत्वाचे व बिकट प्रश्न, आणि तद्विषयक नाना प्रकारचीं उत्तरें, तसेंच तत्संबंधीं अनंत शंका व विलक्षण कोटिक्रम, ह्यांचा विचार केला म्हणजे केवळ आपल्या मनाचें समाधानच होतें. इतकेंच नाहीं तर, अनेक तऱ्हेची कुतूहलस्फूर्ति आणि तत्संबंधीं शंकानिरसन पाहून, आपली मति अगदीं गुंग होऊन जाते, व आपल्या पुण्यपूर्वजांच्या बुद्धिवैभवाचें महदाश्चर्य वाटतें.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

fied to the intellect as well as *satisfy* the heart. The mightiest brains of the day in Europe to-day are beginning to study this philosophy * * * "

( Anne Besant's view of the Hindu Religion, in the Daily chronicle of 7th April 1894 ).

असो. आमच्या उपनिषदांचें अवलोकन करून बिझांट् बाईस परम आनंद झाला, आणि त्यांचं चित्त समाधान पावलें. व ह्मणूनच त्यांनीं हिंदुधर्माचीं तत्वें स्वीकारून आपण सुद्धां केवळ हिंदूच बनल्या.

त्यामुळें त्यांच्या मनाचें समाधान.

हिंदुधर्मावर ह्या बाईचें कांहीं विलक्षण प्रेम असल्याचें

1 " In the Upanishads, lies the philosophy of India. In this part of the sacred Vedas is to be found every thing which man needs to evolve spiritual life, if only he can find it, and know how to study it."

( Mrs. Anne Besant, at the Calcutta Town Hall on " India's mission in the world.")

" * * * We may find in these Upanishads a philosophy which, understood and practised, will lead men to the highest knowledge which is necessary for the spiritual growth of the whole world."

(Mrs. Anne Besant, at the Calcutta Town Hall on " India's mission in the world." )

2 " But * * * I regard Hinduism as the most ancient of all religions and as containing more fully than any other the spiritual truths named Theosophy, in modern times. Theosophy is the ancient Brahma Vidyâ of India. Of this, Hinduism is the earliest and best exoteric presentment. Exoterically, therefore, I am a Hindoo in my religion and in my philosophy."

( पुढें चालू. )

हिंदुधर्माविषयीं निचें प्रेम.

दिसतें. व तें त्यांच्या प्रत्यक्ष उद्गारांवरूनही सिद्ध होतें. कारण, एके प्रसंगीं त्यांनीं असें बोलून दाखविलें कीं, हिंदूंचा धर्म, त्यांचे आचारविचार, आणि त्यांची एकंदर स्थिति पाहून माझ्या मनांत जें प्रेम व जो अत्यादर उत्पन्न होतो, तसा पाश्चात्यांचा आचारविचार व धर्मनीति पाहून कधींही होत नाहीं.

आह्मां हिंदूंची पुनश्च उन्नति होण्याच्या संबंधानें ह्या

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

( The Daily Chronicle of 7th April 1894, Anne Besants view of the Hindu Religion. )

1 " I have a very strong sympathy with the Hindu religion, and I believe that will dispose them to hear me with greater readiness than another."

" I have far more sympathy with the Hindu religion, methods of thought and every thing about them, than I have with Westerns and their ways."

2 " And so, when I am asked, why should India live, what is her mission, my answer is, she must live as long as her heart yearns after the divine light, and souls long to find their way back to the home which they have quitted, which is lost in the clouds and fogs, which rise in the swamps of the earth. The earth, how can it give to the soul that which, it is beginning to yearn after? That which is

( पुढें चालू. )

ब्रह्मविद्येची स्फूर्ति व हिंदूंची पुनश्च उन्नति.

बाईचें असें मत आहे कीं, जावत्-कालपर्यंत हिंदूंना आपल्या धर्माची स्फूर्ति व ब्रम्हविद्येची पूर्ण गोडी राहील, तावत्कालपर्यंत त्यांचें पुनरुज्जीवन झाल्याशिवाय कधीं देखील खचित राहणार नाहीं.

अनुकरणाचें विडंबन.

मात्र हिंदूंनीं पाश्चात्यांच्या चालीरीती न उचलितां, किंवा त्यांचें निष्कारण अनुकरण न करितां, त्यांनीं आपला सर्वोत्कृष्ट धर्म व आपली जगमान्य अध्यात्मविद्या कायम राखण्यासाठीं अश्रांत परिश्रम करून, आपल्या स्वोन्नत्यर्थ सतत आणि दीर्घोद्योग चालविला

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

eternal and beyond all change of time. The spirit of man can never forget its birth-place and as Narada said, this is but a pleasant place for those who have forgotten their birth place ; and while that memory survives it is necessary that India should endure.

( Mrs. Anne Besant, on India's mission, Calcutta.)

1 " She ( India ) will revive. Why ? And how ? She will revive. Why because the world has need of her, of her spiritual teaching of her knowledge of the inmost spring of the human soul. She will revive, How ? Not by imitating the West, but by reviving the East. That is the method for India's revival and that is the road along which we must walk."

(Mrs. Anne Besant on India's mission, Calcutta.)

पाहिजे. नाहीं तर सर्वच मुसळ केरांत गेल्यासारखें होईल. कारण, आमचा धर्म आणि आमची ब्रह्मविद्या, ह्यांजवरच आमची सर्व मदार आहे. आमचें मूळ अधिष्ठान ह्मटलें ह्मणजे हींच होत. आणि आमच्या एकंदर वैभवाची इमारत देखील ह्यांजवरच रचलेली आहे. तेव्हां धर्मरूपी हें जें आमचें टोलेजंग व भव्य मंदिर आज हजारों वर्षे एकसारखें दृष्टिगोचर होत आहे, तें कोणत्याही कारणानें खचूं न देण्याविषयीं, आपण अहर्निशीं अगदीं भगीरथ प्रयत्नच केले पाहिजेत. आणि असें केलें तरच आपला

1 " But what are the Conditions ? I say that India's past was built upon a mighty philosophy. I say that India's civilization took shape from the hands of those who taught the philosophy and gave it as the deathless heritage to the Aryan race. I said it went into the back ground, as India's glory began to wane until to-day, in the might of her darkness she is touching the lowest point that ever yet her foot had trodden. And now what is the fate which threatens this India of ours ? What possibility of escape from that destiny? What chances of her revival, after taking her place again amongst the nations of the earth ? As the greatness of her past lies in her philosophy and her religion, so in those, and those alone, lies the possibility of her revival and the certainty of her upward growth once more."

(Mrs. Anne Besant on Indian's mission, Calcutta.)

तरणोपाय होऊन, आपली पुनश्च उन्नति केव्हां ना केव्हां तरी होईल. नाहीं तर, दुर्दैवानें आह्मीं आकाबाईच्या फेऱ्यांतच सांपडल्यामुळें, आमचे हाल कुत्रें देखील खाणार नाहीं.

अन्य धर्मांचा दबाव.

आतां, कदाचित् कोणी अशी शंका घेईल कीं, अहो सर्व आकाश फाटलें, तेथें तुम्ही ठिगळ म्हणून कोठें लावणार? व जेथें अन्य धर्मियांचें विशेष प्राबल्य, तेथें आपलेंच तें कसें चालणार? कारण, ह्या विस्तीर्ण भरतखंडांत इस्लाम धर्मानें तर कित्येकांचें मुंडण करून, बहुतकांस देशोधडीस लाविलें आहे. आणि सांप्रतच्या ख्रिस्तशाहींत, धर्मांतराच्या हेतूनें कित्येक पाद्र्यांनीं आपापलें येशुजाल सर्वत्रच पसरून ठेविलेलें आहे. तेव्हां, ह्या सर्वांपुढें एकटा हिंदुधर्म तो कसचा टिकाव धरणार?

हिंदुधर्माचें बल, व हिंदूंची आपल्या धर्माविषयीं श्रद्धा.

पण, ह्या शंकेचें निरसन करण्यास फार दूर जावयास नलगे. कारण, एक तर अखिल भरतखंडांत हिंदु प्रजा[1] फार मोठी आहे. तेव्हां ही सर्वच बाटे- ण्याची काडीमात्र देखील भीति नाहीं. दुसरें असें कीं, आमच्या एकंदर हिंदुप्रजांची[2] कोणत्याही

१ ही सुमारें वीस कोटी होईल असें वाटतें.

२ थोडेबहुत नीच वर्णांतले लोक बाटतात खरे. पण ते देखील

( पुढें चालू. )

अन्य धर्मांवर तिळमात्र सुद्धां श्रद्धा नाहीं. आणि तिसरें हें कीं, ह्या **भरतभूमींत** पाश्चात्यांच्या चालीरीतीचा चोहोंकडेच सुळसुळाट झाला असतांही, कित्येक **हिंदू** इतके बाणेदार आहेत कीं, त्यांच्यांत सुधारलेल्या रिवाजाचा अथवा नवीन रीतिभातीचा गंध देखील नाहीं. इतकेंच नाहीं तर, हिंदुधर्मातील यच्चावत् कर्मे ते

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

केवळ द्रव्याच्या लोभानें चाटतात. आणि म्हणनच एकंदर हिंदूंची प्रवृत्ति धर्मांतर होण्याकडे बिलकूल नाहीं, असे म्हणण्यास हरकत नाहीं. ही गाष्ट आम्हीं प्रसिद्धपणें सांगावी यांत तर नवलच नाहीं. पण त्याचा खरेपणा प्रत्यक्ष नद्देशीय **पाद्र्यांस** देखील प्रतिदिनीं भासमान होतो. आणि म्हणूनच त्याविषयीं एक पाद्री आपल्या स्वतःच्या अनुभवावरून असें लिहितो कीः—

"Well known it is that the Jesuits there, who, like the Pharisus, that would compass sea and land to make one proselyte (Matt. 23-25,) have sent into Christendom many large reports of their great conversions of infidels in East India. But all these boastings are but reports; the truth is, that they have there spilt the precious water of Baptism upon some few faces, working upon the necessity of some poor men, who for want of means which they give them are contented to wear crucifixes; but for want of knowledge in the doctrine of Christianity are only. in name Christians."

(Voyage to East India Della. Valle.
p. p. 402-417-419-480.)

यथासांग आणि नित्यशः करितात. आतां, कित्येक हिंदु-लोक हल्लींच्या मन्वंतराप्रमाणें बाह्योपाधीनें सुधारलेले दिसतात खरें. तथापि, अंतर्यामीं ते पुरे आणि बाणेदार हिंदू व कट्टे धर्माभिमानी आहेत.

सदरहू सर्व कारणांमुळें, हिंदुधर्म लयास जाण्याची अगदींच भीति राहिली नाहीं. आणि म्हणूनच आमचा उदयकाल होण्याचीं देखील बरींच चिन्हें दिसत आहेत, असें म्हणण्यास कांहींच हरकत व प्रत्यवाय नाहीं.

कर्म, उपासना, आणि ज्ञानाचें फळ.

**कर्म, उपासना**, आणि **ज्ञान**, ह्या तीन्हीं गोष्टींवर आह्मां सर्व हिंदूंचा पूर्ण भरंवसा असून, ते असेंही चांगल्या प्रकारें समजून आहेत कीं, कर्ममार्ग हा ज्ञानभवनाची पहिली पायरी होय. सबब ह्या ज्ञानमंदिराच्या अत्यंत रमणीय रंगमहालांत प्रवेश होण्याची ज्याची ह्मणून इच्छा असेल, त्यानें प्रथमतः कर्मच केलें पाहिजे. कारण,

1 "There is the revival in the heart of a few, here and there, scattered over this mighty land, you may find still some heart, loyal to the care that knows the ancient religion, and that lives and worships because it knows. In this lies the hope of regeneration, and this is one of the chances of revival for a nation which was once so great."

(Mrs. Anne Besant on India's mission. Calcutta.)

विनाज्ञानेनाधिकारः
कर्मण्येव प्रयुज्यते।
तस्मात् कर्माणि कुर्वीत
बुद्धियुक्त नराधिप ॥

त्यामुळें आज मित्तीसही हजारों हिंदू कर्ममार्गांत आणि अध्यात्मविषयांत अगदीं गुंग होऊन गेले आहेत, आणि ह्या सर्व कारणांवरूनच मिझांटबाईसारख्यांस आमची पुनश्च उन्नति होईल, असें खात्रीपूर्वक वाटत आहे.

---

1 "Nay, I know that there will be some who will take up this mission for man; some one perhaps who will find his heart fired with desire, that India shall arise, and take back her heritage once more, the Empire of spirituality in the world. And if we can only find a few only, one man here and another there, who loves India better than worldly possessions, who loves India better than rank gold, better than the favour of a foreign Government, I believe that revival will come. There are those who will work for India, and some of those who will help us in the struggle. There are wanting for reincarnation some of those mighty souls who, in the days past, were India's leaders, and in the future shall be her spiritual guides once more and I speak to you as the herald of their coming, as a coming messenger goes to clear the way, before the Lord. I tell you that in India there is to-day the possibility of

( पुढें चालू. )

**सर चार्लस टर्नर**, मद्रास हायकोर्टचे माजी चीफ जस्टिस, यांनीं **मद्रास** येथील **विश्वविद्यालयांत** सन १८८१ सालीं असें बोलून दाखविलें कीं, अर्वाचीन **भारतीयांस पाश्चात्यांशीं** देखील टक्कर मारण्याचें प्रस्तुतकाळीं चांगलें सामर्थ्य आलें आहे. इतकेंच नाहीं, तर बुद्धिमत्तेंत किंवा राजकीय सभेंत, न्यायासनीं अथवा वाक्पांडित्यांत, व्यापारांत आणि इतर युक्तिवादांत, ते **यूरोपांतील** उत्तमोत्तम गुणिजनांशीं देखील योग्य सामना करतील. आणि ही वस्तुस्थिति **भारतीयांनीं** केवळ आपल्या क्रियेनेंच सिद्ध करून दाखविली आहे, यांत संशय नाहीं.

हिंदूंच्या उन्नती-विषयीं टर्नरचें मत.

---

( मागील पृष्ठावरून पुढ चालू. )

a spiritual revival, that in India there is to-day the first thrill of a new life, which shall be born into the world as living men; and so in the womb of India, there are spiritual lives to-day, who shall bring back to India the teaching of the mighty ones which shall make her great once more."

( Mrs. Anne Besant on India's mission, Calcutta. )

1 " Modern India has proved by examples, that are known to and honoured by all in this assembly, that her sons can qualify themselves to hold their own with the best of European talent, in the Council chamber, on the Bench, at the Bar, and in the Mart. The time cannot be far distant, when she will produce her philosopher, her moralist, her reformer."

आमची पुनश्च उन्नति होईल, असें विद्याखात्यांतील

तत्संबंधीं जेकबचें मत.

विशेष अनुभवी लोकांसही दिवसानुदिवस वाटूं लागलें आहे इ० स० १८९२ सालीं, कराची येथें, "दयाराम जेठमल" नामक पाठशाळेचा सरवातसमारंभ झाला. त्या वेळीं सिंधचे एजुकेशनल इन्स्पेक्टर मि० जेकब यांनीं असें बोलून दाखविलें कीं, प्राचीनकाळीं हिंदू लोक फारच सुधारलेले असून, त्यांच्या विद्वत्तेविषयीं तर विशेष प्रसिद्धि होती. ते नीतीचें माहेरघर, सत्याचे पोषिंद, आणि शास्त्रांत निपुण असून, ते अगदींच व्यसनासक्त नसत. दोन हजार वर्षांपूर्वींची हिंदूंची स्थिति, आणि त्याच काळचा आंग्लसमाज, यांची परस्पर तुलना केली तर, त्या दोहोंत जमीन अस्मानाचें अंतर दिसून येतें. कारण पहिलें राष्ट्र उन्नतावस्थेप्रत पोहोंचलेलें असून, दुसऱ्याची तत्कालीन अवस्था अगदींच रानटी स्थितींतील होती. इतकेंच नाहीं तर त्या वेळचे तद्देशीय लोक जबर लुटारू असत, व ते चांचेपणाचें काम करीत.

परंतु कालगति कांहीं विचित्र आहे. हिंदूंचें दैव

1 "We also know that at that time the ancestors of Englishmen must have been in a more primitive stage of civilisation,—free men, it is true who never yielded to the Roman yoke, yet scarcely more, at that remote period, than fierce rovers and pirates of the sea."

फिरलें, आणि त्यांच्या दैवदुर्विपाकामुळें त्या राष्ट्रास अगदं ओहोटी लागली. पण त्याच आंग्ल राष्ट्राच्या भाग्योदयास सुरवात होऊन, त्याला पूर्ण भरती आल्याचें दिसत आहे.

तथापि, हिंदूंची जीवनकला, आणि त्यांची प्राणशक्ति ह्यांचा अगदींच ऱ्हास झाला नाहीं. आणि ह्मणूनच त्यांची पुनश्च उन्नत्ति होण्याचीं बरींच सुचिन्हें दिसत आहेत.[1]

हिंदुधर्मवृक्षाचें बीजारोपण.

असो. आतां, हिंदूधर्मवृक्षाचा हा जो प्रचंड विस्तार अनेक शाखांनीं मंडित असा दृष्टीस पडतो, त्याचें मूळ कारण कोणतें तें पाहूं, आणि ह्या विलक्षण व अप्रतीम धर्माचीं मूलतत्वें कोणतीं, त्याविषयीं विचार करूं.

सृष्टिसौंदर्याचा आर्यांच्या मनावर झालेला परिणाम.

प्रथमतः हें अलौकिक सृष्टिसौंदर्य पाहून आमच्या पूर्वजांना कांहीं विलक्षण चमत्कार वाटला; आणि ह्या त्रैलोक्यांतील एकंदर व्यवस्थेचें अवलोकन करून

---

1 "But in spite of all adverse conditions during the long flight of ages, the vitality of the great Hindu race has never been quenched, though it has been from time to time enfeebled; and under the nurture of its present foster-mother, there can be no manner of doubt that a great future of rejuvenescence lies before it."

( Mr. Jacob, on Higher Education. )

त्यांजला अत्यानंद झाला. हें प्रचंड नभोमंडल, व त्यांत फिरणारे अति विस्तीर्ण तेजोमय गोल; इतस्ततः चमकत असणारे ते असंख्य तारे, व त्यांची दिव्य प्रभा; ती प्रसादरूपी मेघवृष्टि, व तींत मधून मधून भासमान होणारें विद्युल्लतेचें प्रखर तेज; तो वायूचा सोसाटा, व त्याची आकस्मिक मंदगति; तो अत्युच्च हिमनग व त्यांतून वाहणाऱ्या सिंधूपम नद्या; तो विशाल सागर, व त्याची भयंकर वीचि गर्जना; इत्यादि सर्व पाहून आमच्या आर्य पूर्वजांस अत्यंत चमत्कार वाटला. इतकेंच नाहीं तर, ह्या पंचमहाभूतांची विलक्षण शक्ति आणि अनुपम सत्ता पाहून, त्यांच्या मनांत आदर व एक प्रकारचें प्रेम उत्पन्न झालें. आणि ह्या अखिल चराचर वस्तूंचा कोणी तरी नियंता आहे, असें त्यास खात्रीपूर्वक वाटूं लागलें.

नानाविध देवतांचें आवाहन.

ही स्फूर्ति होतांच, ह्या प्रचंड पंचमहाभूतांपैकीं कोणाचें आवाहन करावें, अथवा कोणाचा म्हणून स्तुतिपाठ गावा, याविषयीं त्यांजला मोठी पंचाईत पडली. आणि, ह्या जगाचें जो आदिकारण हिरण्यगर्भ त्यालाच भजावें; अथवा सूर्यादि स्वर्देवतांस भजावें; किंवा मरुद्गणादि आकाशदेवतांस भजावें; अगर अग्निपर्वतनद्यादि भूदेवतांस भजावें; यांविषयीं साशंक होऊन ते आपापसांत

१ पुस्तक दुसरें, भाग दहावा, पान २२।२३ वरील टीप पहा.

एकमेकांशीं प्रश्न विचारूं लागले, आणि त्यांनीं आपलें आपणच समाधान करून घेतलें.

तदनंतर द्यौ, पृथ्वी, आणि आकाश, या प्रत्येक ठिकाणच्या अकरा देवता[1] कल्पून, त्यांनीं आपला कार्यभाग निदान त्या वेळेपुरता तरी करून घेतला; परंतु तेवढ्यानेंच त्यांचें निरंतरचें समाधान झालें नाहीं. कारण, त्यांची जिज्ञासा आणि आदिकारणाविषयींचें कुतूहल, हीं दिवसानुदिवस एकसारखीं वाढतच गेलीं, आणि त्यांच्या मनांत नानाप्रकारच्या कल्पना उत्पन्न होत चालल्या.

त्यांचें ज्ञानकुतूहल.

ईश्वर[2] कोठें आहे? त्याला कोणीं पाहिलें! आत्मा कसा आहे? तो कोठून आला? मन[3] कसें उत्पन्न होतें?

---

१ पुस्तक दुसरें, भाग दहावा. पान २५ वें पहा.

२ **को ददर्श प्रथमं जायमानमस्थन्वंतं यदनस्था बिभर्ति । भूम्या असुरसृगात्मा क्वस्वित्को विद्वांसमुप गात्प्रष्टुमेतत् ॥ ४ ॥**

( अ. २, अ. ३, व १४, मं. १, अ. २२, सू. १६४. ) ऋग्वेद.

याचा भावार्थ असा आहे कीं, जो स्वतः अस्थिहीन असून अस्थिमंतांस जन्म देतो, त्याचें जन्म कोणीं पाहिलें? या पृथ्वीवरील सृष्टपदार्थांचा प्राण, रक्त, आणि आत्मा, वगैरे कोठें होते? व ही गोष्ट विद्वानाला ( म्हणजे सर्व ज्ञानी परमेश्वराला ) विचारण्यासाठीं कोण गेला होता?

३ * * **मनः कुतो अधि प्रजातम् ॥ १८ ॥**

( अ. २, अ. ३, व १७, मं. १, अ. २२, सू. १६४ ) ऋग्वेद.

तत्संबंधीं गहन प्रश्न.

ज्यानें सहा लोक धारण केले, व जो त्यांस खालीं पडूं देत नाहीं, तो जन्ममरणरहित असून तिन्ही काळीं अबाधित आहे काय? असल्यास कसा? इत्यादि नानाविध मार्मिक आणि गूढ प्रश्न एकामागून एक त्यांस सुचत गेले. परंतु, कांहीं केल्या समाधान म्हणून होईना. तेव्हां शेवटीं, त्या नियंत्याचें स्वरूप आपणास समजत नाहीं, असें म्हणून त्यांनीं आपलें तद्विषयक अज्ञान लागलीच कबूल केलें.

---

१ अचिकि त्वां चिकितुषश्चिदत्र कवीन्पृच्छामि विद्मने न विद्वान्। वि यस्तस्तंभ षळिमा रजांस्यजस्य रूपे किमपि स्विदेकम् ॥ ६ ॥

( अ. २, अ. ३, व १५. मं. १. अ. २२, सू. १६४. ) ऋग्वेद.

भावार्थः—मी अजाणता आणि अज्ञानी असल्याकारणानें, केवळ मजला तत्संबंधीं ज्ञान व्हावें, या हेतूनेंच मीं त्या ज्ञानी कवींस विचारतों कीं, ज्या जन्मरहित देवानें हे सहा लोक धारण केले, तो एकच परब्रह्म व निरंजन परमात्मा आहे काय?

२ पाकः पृच्छामि मनसा विजानन्देवानामेना निहिता पदानि ।

( अ. २, अ. ३, व १४, मं. १, अ. २२, सू. १६४. ) ऋग्वेद.

भावार्थः—मी मूढ व अल्पमति असल्या कारणानें देवाचीं हीं गुप्त स्वरूपें माझ्या ध्यानांत येत नाहींत. सबब तत्संबंधीं कुतूहल

तथापि, पुढें शनैः शनैः त्यांच्या हृदयांत आपोआपच उजेड पडत गेला; व जीव आणि शिव, किंवा जीवात्मा आणि परमात्मा, यांचा अगदीं निकटसंबंध असून, तो प्रज्ञावान परमेश्वरच सर्व देहांत वास करून राहिला आहे; तोच सर्व जगाचें रक्षण करतो; तो अमर व अखिल विश्वांचा नियंता आहे; आणि आपण जे मूढ जन त्यांतही तोच प्रवेश करून राहिला आहे; इत्यादि सर्व गोष्टींचें सत्यत्व त्यांस हळूहळू भासमान होऊं लागलें.

जीवात्मा व परमात्मा.

---

१ द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते । तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्नन्यो अभिचाकशीति ॥ २० ॥ १७ ॥

( अ. २, अ. ३, व १७, मं. १, अ. २२, सू. १६४. ) ऋग्वेद.

भावार्थः—एकमेकाचे जिवलग मित्र असे दोघे पक्षी ( म्हणजे जीव आणि शिव ), हे एकाच वृक्षाचा आश्रय करून, त्यांपैकीं एक त्या वृक्षाची मधुर फळें चाखतो, आणि दुसरा त्यांचा बिलकूल स्वाद न घेतां त्याजकडे फक्त पाहतच राहतो.

२ यत्रा सुपर्णा अमृतस्य भागमनिमेषं विदथाभिस्वरंति । इनो विश्वस्य भुवनस्य गोपाः स मा धीरः पाकमत्रा विवेश ॥ २१ ॥

( अ. २, अ. ३, व १८, मं. १, अ. २२, सू. १६४. ) ऋग्वेद.

भावार्थः—ज्या आत्म्याला ज्ञानामृत निरंतर पोहोंचतें, आणि जो सर्व जगाचा प्रभु व रक्षण करणारा आहे, तोच प्रज्ञावान् परमेश्वर

याप्रमाणें, अध्यात्मविषयाचें बीजारोपण झाल्यावर, त्याचा ज्ञानवृक्ष हं हं ह्मणतां वाढला; आणि तो लवकरच फुलावयास लागून, त्याला कालांतरानें अमृततुल्य फळें देखील येऊं लागलीं. हीं किती मधुर व रुचिकारक आहेत, आणि आज सुमारें पांच सात हजार वर्षांमागेंही तीं किती परिपक्क दशेप्रत येऊन पोहोंचलीं होतीं, हें उपनिषदादि ग्रंथ पाहिल्यावर कोणाही मार्मिक मनुष्याच्या लक्षांत तेव्हांच येण्यासारखें आहे.

अध्यात्मविषयक ज्ञानवृद्धि.

आत्मा चिद्रूप असून एक व अद्वितीय आहे. आणि तो नामरूप विवर्जित, निर्गुण, शुद्ध, सूक्ष्म, निराकार, निर्विकार, निरंजन, साक्षीभूत, निष्क्रियावान्, निरवयव, निरुपाधि, व मायातीत आहे, असें त्यांत स्पष्टपणें सांगितलें आहे.[1]

आत्म्याचें स्वरूप.

आपणांस प्रत्यक्ष भासमान होणारें, परंतु वस्तुतः अगदीं

---

[1] ब्रह्मणोऽन्यतरन्नास्ति । चैतन्यमेकं ब्रह्म ।
चिद्रूपमात्रं ब्रह्मैव । एकमेवाद्वितीयम् ।
नामरूपविवर्जितम् । शुद्धं सूक्ष्मं निराकारं
निर्विकारं निरंजनम् ।
निर्गुणः साक्षीभूतो निष्क्रियो निरवयव आत्मा ।
मायातीतं गुणातीतं ब्रह्म ।
उपाधिविनिर्मुक्तम् । मनोवाचामगोचरं ब्रह्म ।
यतो वाचो निवर्तंते अप्राप्य मनसा सह ।

मिरुपाधिक आत्मा.

मिथ्या असणारें असें जें लटकें जगत, तसेंच आपल्या दृष्टिगोचर न होणारा तथापि, त्रिकाळीं अबाधित आणि अमर असा जो सच्चिदानंद आत्मा, याविषयींचें संपूर्ण वर्णन व तत्संबंधीं विलक्षण कोटिक्रम **उपनिषदां**त दिसून येतो. **रामायण** आणि **भागवत**, यांत देखील आत्म्याविषयींचा अशाच प्रकारचा ऊहापोह केलेला आढळतो. तसेंच तदनंतरच्या अध्यात्मविषयक ग्रंथांतही तत्संबंधीं पुष्कळच निरूपण केलेलें दृष्टीस पडतें.

त्रिगुणात्मक आत्मा.

परंतु, ह्याच निरुपाधिक **ईशतत्त्वा**ला आमच्या **हिंदु आर्यांनीं पौराणिक** कालांत सगुणरूप दिलें, आणि त्या निर्विकार व निर्गुण **आत्म्या**ची त्रिगुणात्मक मूर्ति कल्पून **ब्रह्मा**, **विष्णु**, आणि **महेश**, या त्रिवर्गांची उपासना सांगितली. **सत्त्व**, **रजस्**, आणि **तमस्**, या गुणांपैकीं, **सत्त्व** गुणाच्या प्राधा-

---

१ सर्वान्तरस्थोऽपि निगूढ आत्मा स्वमायया सृष्टमिदं विचष्टे॥
जगंति नित्यं परितो भ्रमंति यत्सन्निधौ चुंबकलोहवद्धि ।
(बालकांड. स. १.)

यथा चुंबकसान्निध्याच्चलंत्येवायआदयः ।
जडा तथा त्वया दृष्टा माया सृजति वै जगत् ॥
(युद्धकांड. स. १४.)

२ निमित्तमात्रं तत्राऽऽसी निर्गुणः पुरुषर्षभः ।
व्यक्ताव्यक्तमिदं विश्वं यत्र भ्रमति लोहवत ॥

न्यानें **विष्णु**देवता कल्पिली; **रजोगुण**प्राधान्यानें **ब्रह्मदेव** झाला; आणि **तमोगुण** प्राधान्यानें **महादेव** अवतरला. व त्याप्रमाणें ही जी त्रिगुणात्मक मूर्ति बनली, तिच्याकडे उत्पत्तिस्थितिसंहाराचें पृथक् पृथक् कामही सोंपविलें. म्हणजे **ब्रह्मदेवा**कडे एकंदर सृष्टीची उत्पत्ति, **विष्णू**कडे तिची स्थिति, आणि **महादेवा**कडे तिचा संहार, अशी कामाची वांटणी होऊन त्याची व्यवस्था लागली.

विराट स्वरूप, व तें पाहून झालेलें आत्मज्ञान.

याप्रमाणें, हें **विराट** स्वरूप पाहून, आमच्या **आर्यहिंदूं**च्या मनाचें कसकसें स्थित्यंतर होत गेलें, हें सहजीं लक्षांत येण्यासारखें आहे. प्रथमावस्थेंत त्यांजला असें वाटलें कीं, या अखिल जगाचें नियंतृत्व **सूर्य**, **चंद्र**, **इन्द्र**, **वरुण**, **अग्नि**, इत्यादि नानाविध देवतांकडे आहे. परंतु कालांतरानें त्यांच्या बुद्धीची प्रगल्भता होऊन, **या विश्वा**ना कोणी तरी निर्गुण व निराकार असा एकच **नियंता** आहे, असें त्याजला हळूहळू पण निश्चयात्मकपणें भासमान होऊं लागलें. आणि तदनंतर त्याच निरुपाधिक **परमेश्वरा**ची त्यांनीं त्रिगुणात्मक मूर्ति कल्पिली, व तिला **ब्रह्मा**, **विष्णु**, आणि **महेश**, अशीं नांवें दिलीं. कारण, निराकार स्वरुपाचें ध्यान होण्याचें बहुमसमाजास बिकट

हिंदूंची वेदावरील श्रद्धा, व त्याचा परिणाम.

असो. इतकें झालें तरी, आमच्या आर्यहिंदूंची वेदावरील श्रद्धा कायमच राहिली, व तिला काडीमात्रही धक्का पोहोंचला नाहीं. इतकेंच नाहीं तर, एकंदर सर्व वेदं[1] ईश्वरप्रणीतच आहेत, अशा विषयींची त्यांची भावना बलवत्तर होत गेली. त्यामुळें, हिंदुधर्मतत्त्वाचें प्राबल्य राहून, तो दिवसानुदिवस अधिकाधिकच जोरावत चालला. आणि त्याच्या मुळांवर अनेक संकटें आलीं असतांही हा निराश्रित हिंदुधर्म केवळ आपल्या सामर्थ्यानेंच आजपर्यंत जशाचा तसा राहिला. बौद्धधर्म हा त्याचेंच पिलूं होय. परंतु त्यानें पितापुत्राचें नातें यत्किंचित् देखील मनांत न आणितां, प्रत्यक्ष आपल्या जनकाच्या मुळाशीं फार प्राचीन काळींच कुऱ्हाड लावण्याचें योजिलें. तदनंतर मध्यंतरीं, इस्लामनें तर हिंदुधर्माच्या गर्दनावरच सुरी ठेविली. आणि सांप्रतकाळीं ख्रिस्तबोवा सुद्धां आमच्या धर्माशीं लाडीगोडी करून, त्याला आपल्या कळपांत घेण्याकरितां त्याची पायधूळ अंतःकरणपूर्वक झाडीत आहेत. परंतु, आमच्या धर्मापुढें सर्वांनीच हात टेकले, आणि तो सर्वांना पुरून उरला. त्या कारणानें त्यानें आपली छाप सर्व धर्मांवर बसविली, व तो सर्वांवर तान करून वरचढच राहिला.

---

[1] (१) ऋग्वेद, (२) यजुर्वेद, (३) सामवेद, आणि (४) अथर्वण वेद.

आतां, हा हिंदुधर्म सनातन होण्याला तरी आमच्या ब्राह्मणांनीं लहानमान युक्ति लढविली नव्हती. खरोखर, याकामीं त्यांची इतकी दूरदृष्टि होती कीं, तत्संबंधीं त्यांची जेवढी ह्मणून तारीफ करावी तेवढी थोडीच.

हिंदुधर्म सनातन राहण्याविषयीं ब्राह्मणांचा उद्योग.

प्रथमतः त्यांनीं असा विचार केला कीं, धर्माचें खरें तत्त्व कळण्याला ह्या विराट् स्वरूपाचें व सृष्टिसौन्दर्याचें चांगलेंच अध्ययन झालें पाहिजे. इतकेंच नव्हे तर, अध्यात्म विषयाचें खरें इंगित कळण्याला देखील, शमादि षट्कसंपत्तीचें[1] साधन केल्याशिवाय दुसरा सुलभ असा उपायच नाहीं, सबब, कर्मकांडाचें अध्ययन, आणि आत्मज्ञानाचें निरूपण, हींच ज्यांचीं स्वतंत्र कर्में आहेत, अशांचा पारमार्थिक ज्ञानासाठीं एक स्वतंत्र वर्ग करून, ऐहिक सुखोपभोगार्थ, ह्मणजे, क्षत[2] आणि क्षुधेपासून[3] संरक्षण करणारांचें, दुसरे दोन वर्ग केले. तसेंच, सदर्हू तिन्ही वर्गांची सेवा

वर्णसंस्था.

---

१(१) शम, (२) दम, (३) तप, (४) तितिक्षा, (५) श्रद्धा, आणि (६) समाधान, अशा सहा प्रकारच्या अध्यात्म विषयांतील संपत्ती होत.

२ क्षतात् त्रायते असौ क्षत्रियः । क्षतापासून, ह्मणजे शत्रूंच्या हल्लयापासून जो संरक्षण करतो, तो क्षत्रिय होय.

३ दिशत्याशु पशुभ्यश्च कृष्यादानरुचिः शुचिः । वेदाध्ययनसंपन्ना

करण्यासाठीं त्यांनीं आणखी एक चवथा वर्ग योजिला, व त्यामुळें हरएक प्रकारच्या कामाच्या संबधानें निरनिराळीच योजना झाली. याप्रमाणें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, आणि शूद्र, असे चार वर्ण अमलांत आले, आणि त्या प्रत्येकानें आपापलीं कर्में करावीं, असें ठरलें.

प्रत्येक वर्णाची इतिकर्तव्यता.

ब्राह्मणांनीं ब्रह्मकर्म करून इतर वर्गांस कर्ममार्ग व ज्ञानमार्ग शिकवावा. क्षत्रियांनीं प्रजापालन करून तिचें शत्रूपासून संरक्षण करावें. वैश्यांनीं कृषिकर्म करून धान्य पिकवावें, व सर्वांच्या पोषणाची तजवीज लावावी. आणि शूद्रांनीं वरच्या तीन्ही वर्णांची सेवा करावी. अशा प्रकारची वर्णव्यवस्था फारच प्राचीन असून, आमचे हिंदू तर, ती अनादिसिद्धच आहे, असें समजतात.

एके जागीं ब्राह्मण आणि क्षत्रिय या वर्णांचा उल्लेख

---

१ यदिन्द्राग्नी मदथः स्वे दुरोणे यद्ब्रह्मणि राजनि वायजत्रा। अतः परि वृषणा वा हि यातमथा सोमस्य पिबतं सुतस्य ॥ ७ ॥

( अ. १, अ. ७, व. २७, मं. १, अ. १६, सू. १०८. ) ऋग्वेद.

भावार्थः—अहो इन्द्राग्नी हो, तुम्ही जरी आपल्या घरीं आनंद करीत असला, किंवा अहो पूजनीय देवतांनो, जरी तुम्ही ब्राह्मणांकडे अथवा राजाकडे आनंदांत असला, तरी हे वीर्यवंत देव हो,

ब्राम्हण व क्षत्रिय वर्णांचा ऋग्वेदांत केलेला उल्लेख.

ऋग्वेदांत आढळतो. त्यावरून, वर्णव्यवस्थेचें अति प्राचीनत्व सहजींच लक्षांत येण्यासारखें आहे. दुसऱ्या एके ऋचेंत असें सांगितलें आहे कीं, प्रज्ञावान ब्राम्हणासच वाणीचीं चार रूपें अवगत असतात. आणि पुरुष-

१ चत्वारि वाक्परिमितापदानि तानि विदुर्ब्राह्मणा ये मनीषिणः। गुहा त्रीणि निहिता नेङ्गयंति तुरीयं वाचो मनुष्या वदन्ति ॥ ४५ ॥

(अ. २, अ. ३, व २२, म. १, अ. २२, सू १६४.) ऋग्वेद.

भावार्थः--वाणीचीं चार रूपें आहेत, पण तीं फक्त विद्वान ब्राह्मणांसच अवगत आहेत, त्यांपैकीं तीन गुप्त आहेत, म्हणजे तीं समजण्यांत येत नाहींत. मात्र वाणीचें जें चवथें रूप तें मनुष्यें बोलतात, व तें वाग्रूपानें दृग्गोचर होतें.

आतां, हीं वाचेचीं चार रूपें कोणतीं याविषयीं बराच मतभेद असून, अनेक मतानुसारी आपापल्या मतानरोधेंकरून तीं भिन्न भिन्न समजतात. १ ओम्, २ भूः, ३ भुवः, आणि ४ स्वः, अशीं रूपें वेदवादी मानतात. १ नाम, २ क्रिया, ३ उपसर्ग, व ४ निपात, अशीं वैयाकरणी मानतात. १ मंत्र २ कल्प, ३ ब्राह्मण, आणि ४ लौकिकी, अशीं याज्ञिक समजतात. १ ऋग्, २ यजुः, ३ साम, व ४ व्यावहारिकी, अशीं नैरुक्त समजतात. व १ परा, २ पश्यन्ती, ३ मध्यमा, आणि ४ वैखरी, अशीं चार रूपें योगीजन समजतात.

२ ब्राह्मणोऽस्य मुखमासीद् बाहू राजन्यः कृतः ॥ ऊरू तदस्य यद्वैश्यः । पद्भ्यां शूद्रोऽअजायत ॥

ऋग्वेद ( अ. ८, अ. ४, अनुवाक ७, पोथी पान ३४. )

( पुढें चालू. )

सूक्तांत तर तत्संबंधीं साद्यंतच उल्लेख केलेला आहे. हें **पुरुषसूक्त** यासंबंधानें खरोखर फारच महत्वाचें आहे, व तें **ऋग्वेदां**तील आठव्या अष्टकाच्या दहाव्या मंडळांत सातव्या अनुवाकांत आढळतें. तसेंच **शुक्लयजुर्वेदां**तही त्याला स्थान दिलें असल्याचें दिसून येतें. **वर्णसंस्थे**च्या संबंधानें हें सूक्त अति प्राचीन व[1] फारच महत्वाचें आहे, असें एक पाश्चात्य गृहस्थ ( प्रसिद्ध **डाक्तर हॉग** ) यांचें देखील म्हणणें आहे.

शिवाय, ऋग्वेदांत उषसाला अनुलक्षून एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, " ही देवता कित्येकांस सर्व वस्तूंचा उपभोग घेण्याविषयीं उद्युक्त करिते; कांहींस संपत्तीच्या मागें लावीते; कांहींना राज्याचें धूरीणत्व स्वीका-

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

भावार्थः—त्याच्या ( म्हणजे पुरुष किंवा विधात्याच्या ) मुखापासून ब्राह्मण झाले; अथवा ब्राह्मण हेच त्याचें मुख बनले. क्षत्रिय त्याचे बाहू झाले. वैश्य त्याच्या मांड्या बनले. आणि त्याच्या पायांतून शूद्र उद्भवले.

१ **ब्राह्मणांची** उत्पत्ति, याविषयावर व्याख्यान देत असतांना त्यांनीं असें बोलून दाखविलें कीं,

" It is the most ancient and authoritative on the origin of Brâhmanism and caste in general." .

( Dr. Haug on the Origin of Brâhmanism. )

२ ऋ. १. १३३. ५. ६.

रण्यास भाग पाडते; कित्येकांस कीर्तिप्राप्त्यर्थ हिंडविते; आणि कांहींच्यामार्गे सेवाधर्मच लावून देते. याप्रमाणें, ज्यानें त्यानें आपापल्या मार्गानें जाऊन, स्वकर्मानुष्ठान करावें एतदर्थ, उषस ही सर्वांसच जागृत ठेविते. "

तेव्हां सदरहू ऋचेच्या तात्पर्यार्थावरूनही, आमच्या **वर्णसंस्थे**च्या आदिभावनेची व्यंजकता पूर्णपणें दिसून येते. आणि ह्या ऋचेंतच जातिभेदाचें किंवा वर्णभेदाचें दिग्दर्शन झालेलें आहे, म्हणून जें **लड्विग्**चें म्हणणें आहे, तें साधार व सयुक्तिक वाटतें.

वर्ण संस्थेपासून झालेले हिताहित.

असो. ह्या **वर्णसंस्थे**च्या योगानें आमचा **हिंदुधर्म** सनातन राहिला, ही गोष्ट तर निर्विवादच आहे. पण, त्यायोगानें आमचा दुसराही एक मोठा फायदा झाला. तो असा कीं, एकंदर कामाचा लागलाच श्रमविभाग होऊन, जो तो आपापलें काम सुरेख करूं लागला. आणि जर कां ह्या चार वर्णांचे दुसरे अनंत पोटभेद व अन्य शाखा झाल्या नसत्या तर, **हिंदुसमाजा**ची जूट कायम राहून, त्यापासून आमचें निरंतरचें कल्याणच झालें असतें. कारण, आमच्या पूर्वजांनीं फार दूर दृष्टीनेंच ही **वर्णव्यवस्था** लावून दिली होती. परंतु ती जशीच्या तशीच कायम

---

1 Vide Vedic India. p. 281.
( By Zenaide A. Ragozin. )

राहिली नाहीं, आणि तिच्यांत कालांतरानें असंख्य शाखा व उपशाखा उत्पन्न झाल्या, ही आमच्या दुर्दैवाची गोष्ट होय.

तत्संबंधीं पाश्चात्यांचे विचार.

ही वर्णव्यवस्था फार चांगली असून **हिंदुसमाजास** तिची फारच अवश्यकता आहे, असें कित्येक **पाश्चात्यांचें** देखील मत आहे. प्रसिद्ध विदुषी **अनिबिझांट** ही एके ठिकाणीं असें म्हणते कीं;—

"I consider that the four great Castes, based on the fact of reincarnation, and which serve as schools for the re-incarnating soul, should be *maintained* and gradually brought to their original purpose. But the endless modern subdivisions of caste as well as the rigidity of the modern system are mischievous, religiously and socially, and indefensible either from the Hindu or from a rational view of human life. The four great castes of India are natural divisions of humanity, such as under other names, occur in our own and other nations, and must practically always exist in social life."

( Mrs. Besant, on the Theosophy of the Hindus. )

इ० स० १८९१ सालीं जी हिंदुस्थानची मोठी खानेसुमारी झाली, तिच्या संबंधानें कित्येक महत्वाच्या विषयांवर व्याख्यान देत असतां, " हिंदुसमाजपरिवेष्टन " हाही विषय मिस्तर बेन्स, सेन्सस् कमिशनर, यांनीं घेतला होता. त्यावेळीं त्यांनीं असें बोलून दाखविलें कीं, हिंदूंच्या वर्णव्यवस्थेच्या संबंधानें जरी बराच अपकार झालेला दृष्टीस पडतो, तरी त्यापासून त्या समाजावर उपकार व कित्येक बाबतींत हितही झाल्याचें दिसून येतें. ते म्हणतात कीं:—

" Like all other institutions that have obtained a firm or general footing amongst large numbers of different classes, and have retained their hold over the masses through generations of adverse influences, the Caste system has obviously much to *recommend* it, though its deficiencies as what I called it just now, a scheme of life, may be sufficiently apparent to those who approach the question from the out-side." * * * * *

" But we may now turn to the other side of the Caste-question, and it will be seen, I think, that setting aside the marriage regulations and customs, which are too elaborate and various to be discussed here, the balance from the stand point I am now occupying, is by no means entirely *adverse* to the existing

state of things, though obviously their is much to reform."

( Mr. J. A. Baines on "The Conditions and Prospects of Popular Education in India." )

वैदिककालांतील व्यवस्थेनें समाजावर आणि धर्मांवर झालेला परिणाम.

**वैदिक** कालांत जी **वर्णव्यवस्था** अमलांत आली, तिच्यामुळें आमचें **धर्मबंधन** कायम राहिलें. इतकेंच नाहीं तर, आमच्या अंतर्गत समाजाची देखील दिवसानुदिवस सुधारणाच होत चालली; आणि ह्याबद्दलचें सर्व श्रेय **ब्राह्मणां**कडेसच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण,

---

1 "The second point is that caste is inextricably bound up with the religion of the majority of those who conform to its rules, that it is *admittedly* through caste that religion is able to *maintain* its hold of the masses, so that it is through caste that social improvement must work in order to be permanent. This is tantamount to saying that the key of the situation is held by the Brahman, so long as present conditions remain unchanged. It is important, therefore, to appreciate as far as my space allows, the attidude of this class towards the rest of the community."

( The Conditions and Prospects of Popular Education in India By.J.A. Baines, Census. Commissioner.)

दूरवर दृष्टि देऊन हा सर्व प्रचंड व्यूह त्यांनींच रचला; लांबचें धोरण बांधून ही समाजरचना त्यांनींच केली; व अनुपम मनोनिग्रह करून हें धर्माचें बंधन त्यांनींच सर्वांसच लाऊन दिलें. असें करण्यांत त्यांनीं आपल्या मनाचा उदारपणा, आपली सहनशीलता, आणि आपलें आत्मसंयमन विशेष रीतीनें प्रकट केलें, ही गोष्ट कोणाच्यानें देखील नाकबूल करवणार नाहीं. कारण, त्यांत त्यांनीं कोणत्याही प्रकारचा आपलपोटेपणा म्हणून रतिभार देखील केला नाहीं. इतकेंच नव्हे तर, त्यांनीं केवळ दुःखाचा वांटा आपणाकडेसच ठेविला. शमदमादि निग्रहाचे गुरुतर कष्ट सुद्धां त्यांनीं आपल्याच शिरावर घेतले. आणि तप वगैरे करून स्वतःचेंच शरीर झिजविण्याचें त्यांनींच पतकरलें. वस्तुतः खरोखरचा ऐश्वर्योपभोग त्यांनीं इतर वर्गांकडेसच सोंपविला. प्रत्यक्ष **राज्यपद** देखील त्यांनीं **क्षत्रियांसच** दिलें. आणि त्यामुळें, तदंगभूत विलाससुखास्वादही त्यांच्याच वांटणीस गेला.

ब्राह्मणांची निरपेक्ष बुद्धि व त्यांचें औदार्य.

आतां, इतक्या दूरदृष्टीनें जी **वर्णसंस्था ब्राह्मणांनीं** निर्माण केली, तिच्यापासून इष्ट हेतु सिद्धीस न जातां सांप्रतचा अनर्थ कसा ओढवला, हा प्रश्न साह-

ब्राह्मणांच्या श्रमाचें नैष्फल्य.

जिकच उत्पन्न होण्यासारखा आहे. परंतु त्याचें उत्तर मिळण्यास आपणांस फारसें दूर जावयास नलगे. कारण, थोड्या बहुत विचाराअंतीं तें आपलें आपल्यालाच कळण्यासारखें आहे. सबब त्याचा आपण विचार करूं.

त्याचीं कारणें, व बौद्ध आणि

इसवी सनापूर्वी ५०० वर्षें, **बौद्धधर्मानें** जी उचल केली, तिच्यामुळें **वेदधर्मांत** विलक्षण चळवळ होऊन, अनेक मतांतरें देखील झालीं. आणि त्याच कारणानें मुख्य चार वर्णांतही अन्य पोटभेद उद्भवले. हा **बौद्धधर्म हिंदुस्थानां**त सुमारें एक हजार[1] वर्षें राहिला. व तो इ० स० १००० वर्षांच्या सुमाराला **हिंदुस्थानांतून** अजिबात नाहींसा झाला. तथापि, त्याला अन्य देशांत चांगला आश्रय मिळाला. त्याकारणानें त्यानें देशांतरींच मुळें धरलीं, आणि त्याचा तेथें प्रचंड विस्तारही झाला.

इस्लाम धर्मांतराचा परिणाम.

त्यानंतर, **इस्लामशाहीचें** सत्र एकदम सुरू झालें. त्यामुळें तर एकंदर **हिंदुसमाजांत** विशेष फाटाफूट होऊन, आमचा धर्म जणूं काय रसातळासच जातो कीं काय, असें भासूं लागलें. परंतु ज्याची कीर्ति अमर होऊन राहिली आहे, अशा **शिवछत्रपतीनें** आपल्या प्रचंडप्रतापानें त्याही संकटांतून आह्मांस मुक्त करून, **हिंदु-**

[1] इसवी सनापूर्वी ५४३ वर्षांपासून तों इ० स० ७०० वर्षें पर्यंत.

शिवछत्रपतीचा पुण्यप्रताप.

धर्म सांवरला. तदनंतर **पेशवाईत** आमच्या **ब्राह्मणी साम्राज्याची** पुनश्च संस्थापना झाली. त्या वेळीं, **ब्राह्मणी प्रभुत्व** असल्या कारणानें, वेदकालीन पद्धतीवर आमच्या वर्णव्यवस्थेंत आणि सामाजिक संस्थांत कांहीं तरी थोडाबहुत फेरफार होऊन, त्यांतील दुसरे अनंत पोटभेद व घातक बखेडे हळूं हळूं मोडतील, असें आम्हांस वाटत

पेशवाईची समाप्ति आणि हिंदुधर्माची दुर्गति.

होतें. परंतु तो काल बऱ्याच धामधुमीचा असल्या कारणानें, असल्या कामास अवश्य तितकी शांतता मिळाली नाहीं. आणि आमच्या दुर्दैवानें **हिंदुसिंहाची** प्रचंड गर्जना एकाएकी मावळून, सर्वत्र एकदमच सामसूम झाल्यासारखें झालें. त्यामुळें जरूर ती समाजव्यवस्था न होता, जातिभेदाचे बखेडे जसेच्या तसेच राहिले.

असो. सदरीं निर्दिष्ट केलेल्या कित्येक प्रतिकूल कारणांनीं, आमच्यांतील जातिभेदाचा

बौद्ध धर्माचा लय.

तरंग जरी निमाला नाहीं, तरी **हिंदुधर्ममहोदधि** जशाचा तसाच स्थिर राहिला. इतकेंच नव्हे तर, तो आपलें पूर्वसामर्थ्य आणि प्राचीन वैभव पुनश्च शनैः शनैः प्रकट करूं लागला. आणि त्यामुळें **बौद्धधर्मानें** जी पुंडाई माजविली होती, ती हळूं हळूं कमीच होत गेली, व शेवटीं अजिबात मावळली.

इ० स० ७५० च्या सुमाराला एक अतिपवित्र **ब्राह्मण** **भरतखंडांत** उदयास आला. हा **वंगस्थ**[1] असून, त्याचें नांव **कुमारिलभट्ट** होतें. ह्यानें इकडे तिकडे **वेदधर्माचें**च महात्म्य प्रसृत केलें, आणि **परमेश्वराचें** साकारत्व लोकांच्या मनांत पूर्णपणें बिंबविलें. त्याचा तात्कालिक परिणाम असा झाला कीं, लहान अथवा थोर, तरुण किंवा वृद्ध, सुशिक्षित अथवा अशिक्षित, मूढ किंवा विद्वान्, धार्मिक अथवा अधार्मिक, श्रीमंत किंवा गरीब, या सर्वांच्या हृदयांत ती गोष्ट ताबडतोब उतरली, आणि **बुद्धाच्या** निराकार **ईश्वराविषयीं** ते लागलींच साशंक झाले. कारण, **परमेश्वराचें** निराकारत्व मनांत आणण्यास जेवढा प्रयत्न करावा लागतो, तेवढा यत्न त्याचें, साकार रूप मनांत आणावयास लागत नाहीं. त्यामुळें **कुमारिलभट्टाचा** धर्मोपदेश सर्वांच्या मनांत चांगला ठसला जाऊन, हा **वेदधर्म** लागलींच बळावत चालला, व **बुद्धधर्माचा** लोप होत गेला.

कुमारिलभट्ट, व वेदधर्मप्रतिपादन.

**कुमारिलभट्टानंतर हिंदुधर्माचा** नामांकित पुरस्कर्ता म्हटला म्हणजे **शंकराचार्य** होय. ह्याचा काल अजून निश्चयात्मक रीतीनें सिद्ध झाला नाहीं. तरी, तो इसवी सनाच्या आठव्या

शंकराचार्य.

---

[1] वंग देशाला हल्लीं बंगाल देश म्हणतात.

शतकांत झाला असावा, असें अनुमान आहे. हा **मलबार** देशांत जन्मला, आणि अगदीं लहान असतांना, म्हणजे आपल्या वयाच्या बत्तीसाव्या वर्षी मरण पावला. तथापि, केवळ अल्पवयांतच विद्यार्जन करून तो मोठा प्रचंड विद्वान झाला. तो षट्शास्त्रांत अगदीं निपुण असून, **धर्मशास्त्रांत** आणि **वेदांतविषयांत** तर त्याचा हात खंडाच. त्यानें अखिल **भरतखंडभर** पर्यटन केलें; व ठिक-ठिकाणीं धर्मविषयावर हम्मेश व्याख्यानें देऊन, **वेदप्रणि-तधर्म**च खरा आहे, असें त्यानें साधार शाबीत केलें.

त्यानीं लाविलेली उपनिषत्सिद्धांतांची संगति.

ह्यानें दुसरें एक विशेषच महत्वाचें काम केलें. तें असें कीं, **उपनिषदांत** इतस्ततः जो विसंवाद दृष्टिगोचर होत होता, त्याची त्यानें योग्य संगति लावून दिली. त्यामुळें, सकृद्दर्शनीं भासत असलेला सर्व विपर्यास अगदीं नाहींसा होऊन, **उपनिषदांतील** हरएक प्रकारच्या सिद्धांताची एकवाक्यता झाली, आणि सर्वच गोष्टींचा मेळ लागला.

त्यांचा कोटिक्रम.

अशा प्रकारचें महत्कृत्य साधण्यासाठीं, **श्रीमत् शंकराचार्यांनीं** विलक्षण कोटिक्रम लढविला. तो असा कीं, **उपनिषद्** भागाचे त्यांनीं दोन विभाग कल्पिलेः—

**१ निर्गुणविद्या किंवा पारमार्थिकी अवस्था,आणि**
**२ सगुणविद्या अथवा व्यावहारिकी अवस्था.**

जे ज्ञाते आहेत, त्यांजकरितां पहिली विद्या होय. कारण, त्यांजला परमेश्वराच्या निराकारत्वाचें आकलन होतें, व त्या निरंजन आणि निर्विकार अशा आदिकारणाचें ध्यान करण्याचें देखील त्यांस सुलभ वाटतें. परंतु इतरांस तें दुःसाध्य असल्या कारणानें, त्यांजला ईश्वराच्या साकार रूपाचीच विशेष अवश्यकता भासमान होते. आणि ह्मणूनच, भजनपूजनादि विधि ते विशेष श्रेयस्कर मानतात. तेव्हां अशा लोकांकरितां त्यांनीं सगुणविद्येची योजना केली.

त्यामुळें पाश्चात्यांनीं केलेली शंकराचार्यांची वाहवा.

याप्रमाणें, उपनिषदांतील परस्पर विसंगत विधानांची एकवाक्यता झाल्याचें पाहून, कांहीं कांहीं पाश्चात्य तत्त्ववेत्त्यांनीं तर माना डोलवून टाळ्यांचा एकच गजर केला, आणि त्या आनंदभरांत शंकराचार्यांची फारच वाहवा करून, त्यांनीं त्यांची एकदम पाठ थोपटली.

तत्संबंधीं प्रोफेसर ड्युसेनचें मत.

प्रोफेसर ड्यूसन[1] यानें एके प्रसंगीं असें म्हटलें आहे कीं, ' माझ्यामतें उपनिषदें व त्यावरील शंकराचार्यांचीं भाष्यें, हीं पाश्चात्य देशांतील तत्त्वज्ञानांच्या ग्रं-

[1] हे जर्मनी येथें कील नामक विश्वविद्यालयांत तत्वविद्येचे अध्यापक आहेत. त्यांनीं बॉम्बेब्रांच रॉयल एशियाटिक सोसायटींत वेदांतविषयावर तारीख २५ फेब्रुवारी सन १८९३ रोजीं व्याख्यान दिलें होतें.

2 And the system of the Vedànta, as founded

थांची सहज बरोबरी करतील. उपनिषदांतील प्रत्येक वाक्य प्रमाणभूत मानलें गेल्यामुळें, त्यांत जागोजाग आढळून येणाऱ्या परस्पर विसंगत विधानांची एकवाक्यता करणें फार कठिण होतें. तथापि, इतक्याही अडचणींतून पार पडून, त्यांनीं फार विलक्षण रीतीनें व विशेष खुबीनें ती एकवाक्यता केली आहे. ह्या बाबतींत ख्रिस्ती मतवाद्यांनीं शंकराचार्यांचा अवश्य कित्ता घ्यावा,' इत्यादि.

हिंदुधर्मांत बरेच अद्वैतमतवादी, व थोडे द्वैतमत-

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

on the Upanishads and Vedanta Sutras, and accomplished by Sánkara's commentaries on them,—equal in rank to Plato and Kant—is one of the most valuable products of the genius of mankind in his researches of the eternal truth;— * * * Sankara in these difficulties created by the nature of his materials, in face of so many contradictory doctrines, which he was not allowed to decline and yet could not admit altogether,—has found a wonderful way out, which deserves the attention, perhaps the imitation of the Christian dogmatists in their embarrassments."

( Dr. Paul Deussen on the philosophy, of the Vedanta.)

1 " And of hundred Vedántins ( I have it from a well informed man, who is himself a zealous adversary of Sánkara and follower of Ràmánuja ) fifteen

( पुढें चालू. )

हिंदुधर्मातील द्वैताद्वैतमतवादी.

**वादी** आहेत. पहिल्यांची संख्या शेंकडा पाउणशें, किंबहुना त्याही-पेक्षां जास्त होईल. दुसऱ्यांची संख्या शेंकडा पंचवीस, किंवा त्याहून देखील कमी होईल. सर्व अद्वैतमतवादी **शांकरानुयायी** आहेत. आणि बाकीचे **माध्व, रामानुज, वल्लभ,** इत्यादि पंथांतले आहेत.

अद्वैतमताचें खरें तत्त्व, व

आतां, सदरहू दोन्हीं मतांपैकीं **अद्वैत** मतांतच किती खरें तत्व आहे, व त्याचें सामर्थ्यही कसें आहे, याविषयीं थोडें दिग्दर्शन करितों. अति प्राचीन **वैदिक** काला-पासून तों थेट अलीकडील प्रेमळ **भगवद्भक्तांपर्यंत**, यच्चावत् सर्व **हिंदुधर्म** पंथांचें आणि अखिल मतसांप्रदायांचें पर्यवसान केवळ **अद्वैतांतच** होतें. धर्माच्या चिरस्थायि-त्वाला, स्थितिस्थापकतेची निरंतरच मोठी अवश्यकता आहे. आणि ही अद्वैतमतांत पूर्णपणें दिसून येते. त्यामुळें इतर सर्व संप्रदाय नष्ट होत जाऊन, राहिल्यासाहिल्यांस-ही हळूं हळूं हरताळच लागत चालली आहे. अनेक धर्म-पंथ भिन्न भिन्न काळीं उद्भवून लयास देखील गेले. परंतु

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

perhaps adhere to Rámánuja, five to Mádhva, and seventy-five to Sánkaráchárya."

( Dr. Deussen's lecture on the Philosophy of the Vedanta. )

त्याचा प्रसार.

अद्वैतमत अजूनही जिवंत आहे. इतकेंच नव्हे तर, तें देशांतरीं आणि अखिल भूतलावर अगदीं झपाट्यानें प्रसृत होत चाललें आहे. ह्या अद्वैतमताच्या सिद्धीमुळेंच, धर्मांतराच्या प्रचंड झंझावातांतही आमचा हिंदुधर्म आजपर्यंत टिकून, तो जशाचा तसाच कायम राहिला. आणि ह्या भूमंडलावरील यच्चावत् राष्ट्रांच्या अगोदर कित्येक शतकें, किंबहुना हजारों वर्षे, हिंदु लोक जे सुधारणेच्या अत्युच्च शिखराप्रत पोहोंचले, त्याचें बीज देखील हिंदुधर्मांतर्गत अद्वैतमतच होय.

ईशस्वरूपाच्या संबंधानें पौरस्त्य आणि पाश्चात्यांच्या ज्ञानांकुराची तुलना.

वेद अथवा उपनिषदें, महाकाव्यें किंवा पुराणें, आणि गद्यपद्योदधि अथवा कथानकें, या सर्वांत अद्वैतमताचेंच प्रतिबिंब त्या पूर्वकालीन तत्त्ववेत्त्या महर्षींनीं व कविपुंगवांनीं पाडलें असल्याचें दिसतें. आतां, एतद्विषयक साद्यंत निरूपण पूर्वार्धांतील एकविसाव्या भागांत केलें असून, त्यांत भिन्नभिन्न मतें व षड्दर्शनें यांचेंही यथावकाश दिग्दर्शन झालें आहे. सबब तत्संबंधीं प्रस्तुतस्थळीं जास्त ऊहापोह न करतां, किंवा पाल्हाळ न लिहितां, पाश्चात्य तत्त्ववेत्त्यांचे या महत्वाच्या विषयावर कशा प्रकारचे विचार आहत, त्यांचें तात्पर्य आम्ही

परमात्म्याविषयींची आमच्या वैदिक ऋषींची कल्पना फारच उदात्त होती. एका ऋचेंत त्यांनीं असें म्हटलें आहे कीं,

परमात्म्याविषयीं ऋग्वेदांतील उदात्त विचार.

को अद्धावेद कइह प्रवोचत्कुत आजाता कुत इयंविसृष्टिः । अर्वाङ्देवा अस्य विसर्जनेनाथा कोवेद यत आबभूव ॥१॥

( ऋग्वेद. मं. १०, सू. १२९, ऋ ६.)

ह्याचा भावार्थ असा आहे कीं, हें अखिल जगत् ज्या परब्रह्मापासून निर्माण झालें, त्याचें यथार्थ ज्ञान कोणाला असेल ? अर्थात् तें कोणालाही नाहीं.

दुसरे एके ठिकाणीं त्या महर्षींनीं आपलें अज्ञान आणि आश्चर्यही प्रकट केलें आहे.

यईं चकार न सो अस्य वेद यईं ददर्श हिरुगिन्नु तस्मात् । स मातुर्योना परिवीतो अंतर्बहुप्रजा निर्ऋतिमा विवेश ॥ ३२ ॥

(ऋग्वेद. अ.२, अ. ३, व २०, मं. १, अ. २२, सू. १६४.)

ज्यानें ह्या प्राण्याला उत्पन्न केलें तो त्याला जाणत नाहीं; व ज्यानें याला पाहिलें त्याच्या हा दृष्टीस पडत नाहीं. तो आईच्या उदरांत झांकलेला असतो;

जन्ममरणाविषयीं आर्यांची कल्पना.

आणि त्यानेंच ह्या अनेक जन्माच्या दुःखयात्रेंत प्रवेश केला आहे; असा ह्या ऋचेचा शब्दशः अर्थ झाला. परंतु त्याचा इंगितार्थ असा आहे कीं, मनुष्याची उत्पत्ति त्याच्या बापापासून होते. तरी त्या बापाला तो मुलगा कोण आहे, हें खरोखर समजत नाहीं. व हा प्राणी आपल्या मातेच्या उदरांत येऊन, अनेक जन्ममरणाची अति दुःखदायक अशी दुर्घट याला मात्र कंठतो.

मनाच्या उत्पात्तिविषयीं त्यांचा तर्क आणि

**अवः परेण पितरं यो अस्यानुवेद पर एनावरेण । कवीयमानः क इह प्रवोचद्देवं मनः कुतो अधि प्रजातम् ॥ १८ ॥**

(ऋग्वेद. अ. २, अ. ३, व १८, मं. १, अ. २२, सू. १६४.)

ह्या त्रैलोक्याचा कोण जनक आहे ? व तो कोणाला ठाऊक आहे ? आणि तो ज्या ऋषीला किंवा कवीला माहीत असेल, त्याला तो कसा समजला ? व हें सर्व समजण्याला जें दिव्य मन पाहिजे आहे, तें कोठून बरें उत्पन्न झालें ?

स्वतःच्या अज्ञानाविषयीं त्यांची समज.

**इनो विश्वस्य भुवनस्य गोपाः स मा धारः पाकमत्राविवेश ॥२१॥**

( ऋग्वेद. अ. २, अ. ३, व १८, मं. १, अ. २२, सू. १६४ )

जो ह्या अखिल जगाचा पालक आहे तो, मी मूढ आणि अज्ञान असूनही, माझ्यांत वास करून राहिला आहे.

सदरहू ऋचांवरून आमच्या पुराणआर्यांची, परमात्म्यासंबंधीं आज दहा हजार वर्षांपलीकडील कालांतहीं, किती यथार्थ, तथ्य, आणि उदात्त कल्पना होती, हें सहज लक्ष्यांत येण्यासारिखें आहे.

पाश्चात्यांची तद्विषयक कल्पना.

**यहुदी** लोकांचा कोपिष्ट **जोहोवा**, अथवा **ग्रीक** लोकांचा विलासी **ज्युपिटर**, किंवा **ख्रिस्ती** लोकांचा विकारवश असा आकाशवासी पिता, इत्यादि नानाविध देव अन्य धर्मीयांनीं स्वीकारिले. परंतु, ह्या सर्वांच्या ईश्वरविषयक किंवा मानसिक उन्नतीच्या कल्पना फारच कोत्या आणि क्षुद्र

१ जन्ममरणाच्या उपपत्तीविषयीं बायबलांतील रानटी कल्पना पहा.

" Yet among those ancient religions we seldom know, what after all is the most important, their origin and their gradual growth. The Jewish religion is represented to us as perfect and complete from the very first, and it is with great difficulty that we can discover its real beginnings and its historical growth. And take the Greek and the Roman religions, take the religions of the Teutonic, Slavonic, or Celtic tribes, and you will find that their period of growth has always passed, long before we know them, and that from the time we know them, all their changes are purely *metamorphic*—changes in form of substances ready at hand."

( India. What can it teach us ? p. 107.)

" It is this ancient chapter in the history of the human mind which has been preserved to us in

( पुढें चालू. )

द्विमतात. आणि ह्यांच्या तुलनेनें पाहतां, "**अधः स्विदासीदुपरि स्विदासीत्,**" असें जें अखिल विश्वव्यापी **परब्रह्माचें** वर्णन आमच्या **महर्षींनीं** केलें आहे, तें खरो-खरच अपूर्व भासतें.

युरोपखंडांतील द्वैताद्वैत भेद.

आतां, द्वैताद्वैत मतांच्या संबंधानें पाहूं गेलें तर, तत्संबंधीं जसा आमच्या **भरतखंडांत** मतभेद दृष्टीस पडतो, तसाच **युरोपखंडांत** देखील तो दृग्गोचर होतो. हा मतभेद प्रथमतः **प्लेटो** आणि **आरिस्टाटल्** या विद्वन्म-

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

Indian literature, while we look for it in vain in Greece, or Rome, or elsewhere."

( India. What can it teach us ? p. 109 ).

1 "Now let us look to the ancient inhabitants of India. With them, first of all, religion was not only one interest by the side of many. It was the all-absorbing interest; it embraced not only worship and prayer, but what we call philosophy, morality, law, and government,—all was pervaded by religion."

( India. What can it teach us ? p. 107).

"So it was with these names of the Vedic gods. They were all meant to express the *Beyond*, the Invisible behind the Visible, the Infinite within the Finite, the Supernatural above Natural, the Divine, Omnipresent, and Omnipotent."

( India. What can it teach us ? p. 201.)

णिद्वयांत सुरू झाला. हे ग्रीस देशांतले तत्त्ववेत्ते असून, त्या दोहोंत परस्पर गुरुशिष्याचें नातें होतें. तथापि, कित्येक गोष्टींत त्यांचीं मतें अगदींच भिन्न असत. **प्लेटो** अद्वैतमतवादी असून, जन्मांतर, कर्म, आणि, संसारमिथ्यत्व, इत्यादि गोष्टींवर त्याचा पूर्ण भरंवसा असे. पण, त्याचा शिष्य जो **अरिस्टाटल्** तो तसा नव्हता. तो द्वैती, जगत्-सत्यवादी, आणि तर्काचें अवडंबरच माजविणारा होता.

प्लेटो आणि आरिस्टाटल्, व

प्रथमतः बराच कालपर्यंत प्लेटोच्या मताचीच सरशी होती. तथापि, कालांतरानें तें सर्वच पारडें फिरून, **आरिस्टॉटल्**चे ग्रंथच **वेदवाक्य** होऊन राहिले.

इतर पंथ.

तदनंतर हजारो पंथ उद्भवून, अनेक मतांची लठ्ठा-लठ्ठी सुरू झाली. परंतु शेवटीं ह्या शुष्क वाग्जालांचा लोकांना आपो-आपच वीट आला, आणि त्यामुळें तत्वज्ञानाचा अर्थात्च उपहास होत चालला.

अर्वाचीन भौतिक शास्त्रवेत्ते व तत्त्वज्ञानी.

पुढें, अर्वाचीन भौतिक शास्त्रज्ञ व तत्वज्ञानी निपजले, आणि त्याकारणानें त्या दोन्ही शास्त्रांचा विशेष खल होत गेला. **फ्रान्सिस बेकननें** आधिभौतिक शास्त्रांचा पाया घातला, आणि

१ हा इ० स० पूर्वी ४२९ ह्या वर्षी जन्मला.
२ हा इ० स० पूर्वी ३८४ सालीं जन्मला.

**डेकार्टनें** अर्वाचीन पाश्चात्य तत्त्वज्ञानाचें द्वार खुलें केलें. **डेकार्ट** हा द्वैतमतवादी होता. तरी, त्याला **प्लेटोच्या** स्वयंभू कल्पना ( Innate Ideas ) चें मत मान्यच होतें.

त्यांचीं मतें.

**डेकार्टच्या** मागून जे कांहीं कांहीं नामांकित तत्त्ववेत्ते झाले, ते सर्व अद्वैतवादीच होत. मात्र भेद कायतो त्या **आदिकारणाच्या** विशिष्ट स्वरुपाविषयींचा. आणि म्हणूनच भिन्नभिन्न तत्त्वज्ञान्यांनीं त्याला पृथक् पृथक् नांवें दिलेलीं आढळतात.

**स्पिनोझा** त्याला सर्वव्यापक द्रव्य ( universal substance) म्हणतो. **कयांट** त्यालाच अपरिच्छिन्न (unconditional) म्हणतो. **शेलिंग** व **फिक्टी** हे त्याला अविकृत आत्मा अथवा कल्पना (absolute being or idea) असें नांव देतात. **हेगेल** त्यालाच नित्य व शुद्ध आत्मा ( universal and pure being ) म्हणतो. **शोपेनहोर** त्याला व्यापक इच्छा ( universal will ) म्हणतो. **हार्टमन्** हा त्याचेंच अव्याकृत ( unconscious ) असें नांव ठेवितो. आणि **हर्बर्टस्पेन्सर** तर त्या तत्वाला अज्ञात व अज्ञेय ( unknown and unknowable ) असें ठरवून, बिचारा निराशच होतो,एतावता, त्या तत्त्वाच्या लक्षणानुरूप, ज्यानें त्यानें आपापल्या समजुतीप्रमाणें त्याला भिन्नभिन्न संज्ञा दिलेली आढळते.

असो. आतां, आमचे **पौरस्त्य** तत्त्ववेत्ते आणि

त्यांचें पौरस्त्य तत्त्वमताशीं साम्य.

तिकडील **पाश्चात्य** तत्वज्ञानी, यांचें कोणकोणत्या गोष्टींत कितपतसें साम्य आहे, याविषयीं थोडासा विचार करूं. **हार्टमन्**च्या अव्यक्तमताचें **वेदान्तसिद्धांतां**शीं अतिशय साम्य दिसून येतें. तसेंच, **डेकार्ट**चे आणि **सांख्याचार्य कपिला**चेंही पुष्कळ गोष्टींत निकट साम्य असल्याचें भासमान होतें. **डेकार्ट**ची वासना ( मन ) आणि वस्तु ( उपादान ), म्हणजे mind and matter, हीं **सांख्यांची** प्रकृति व पुरुष ह्यांशीं अगदीं साम्य पावतात. **डेकार्ट**ला **सांख्यमत**वादी, किंवा **स्पिनोझा**ला सर्वास्तित्ववादी, अथवा **फिक्टी**ला विज्ञानवादी**बौद्ध**, असें म्हणण्यास हरकत नसून. वैशेषिक मताचा प्रतिष्ठापक **कणाद**, आणि अपरिच्छेद्यज्ञान किंवा वर्णन विषयातिक्रांत प्रज्ञा ( Transcendental reason ) शोधून काढणारा **क्यांट**, ह्यांचे देखील बरेंच साम्य आहे, असें एका **भारतवर्षीय** आधुनिक विद्वानाचें व प्राच्यांग्ल भाषाकोविदांचें मत आहे.

हिंदूंची मूर्तिपूजा, व तत्संबंधीं पाश्चात्यांची भ्रांतिमूलक समजूत.

आतां, आमच्या मूर्तिपूजेच्या संबंधानें जी **पाश्चात्यांची** भ्रांतिमूलक समजूत झाली आहे, तिजविषयीं थोडाबहुत विचार करून, ही **हिंदुधर्ममीमांसा** आटपती घेतों.

ह्या जगाचा प्रचंड विस्तार व नभोमंडलांतील अत्यु-

मूर्तिपूजेची उत्पत्ति.

उज्वल तेजोराशि, त्यांची नियमित गति व उदयास्त. ह्या त्रैलोक्याचें सृष्टिसौंदर्य व पदार्थमात्राचें अंगसौष्टव, समुद्रवेलापरिवर्तन आणि मेघवृष्टिप्रसाद, इत्यादि सर्व सृष्टचमत्कृतींच्या अवलोकनानें प्रत्येक मनुष्याला निस्सीम कुतूहल वाटतें, व ह्या अखिल विश्वाच्या **नियन्त्या**विषयींची कल्पना लागलीच उत्पन्न होते. ती होतांक्षणींच, त्या **जगत्प्रभू**चें विलक्षण वैभव मनांत येऊन, तो कसा असावा अशाबद्दल प्रत्येकाची तर्कशक्ति आपापल्या इच्छेनुरूप नानाप्रकारच्या कल्पनाजालांत काम करूं लागते, आणि तो दृग्विषय होऊन आपल्या मनाची हौस पूर्ण होण्यासाठीं, ती त्याला अत्यंत मनोहर रूप देते. तदनंतर, तीच मूर्ति त्या निराकार व निरंजन **परमात्म्याची** प्रतिमा बनून, ती प्राणिमात्राच्या आदरानें भाजन, उपासनेचें पात्र, आणि पूजाविधीचें अत्यंत रमणीय स्थान होऊन राहते.

ईशस्वरुपाची कल्पना, व तिची मीमांसा, आणि

अशा प्रकारें, **भिन्नरुचिर्हि लोकः** या न्यायानें, ह्या अखिलजगांत जंतुमतिवैचित्र्य जितक्या मानानें दृष्टीस पडतें, तितक्याच प्रमाणानें **ईश्वरस्वरुपाच्या** कल्पना देखील भिन्नभिन्न आढळतात **श्रद्धालूंचा** भक्तीकडेसच ओढा असल्याकारणानें, त्यांजला **ईश्वर** सगुण रूपानें भासतो.

**तत्त्वज्ञान्यांस** तो निराकार व अद्वैतरूपानें भासमान होतो. आणि **भौतिकशास्त्रवेत्त्यांस** तो त्रिकालाबाध्य अशा सृष्टिनियमाच्या रूपानेंच दृष्टीस पडतो.

आतां, वास्तविक पाहिलें तर ह्या सर्व कल्पना एकच **परमेश्वरस्वरूपाच्या** विभूति आहेत. आम्ही **पौरस्त्य** त्याला **आदिकारण** किंवा **चिच्छक्ति** म्हणतो, आणि **पाश्चात्य** त्यालाच **स्वयंभूकल्पना** असें नामधेय देतात.

तिचें वर्गीकरण.

असो. सदरीं निर्दिष्ट केलेले सगुणोपासक आणि अद्वैतवादी, किंवा भौतिक शास्त्रवेत्ते व निरीश्वरवादी, ह्या प्रत्येकांच्या **ईश्वराविषयींच्या** कशाही कल्पना असोत, तथापि, त्या सर्वांचें शास्त्रीय वर्गीकरण होण्याला कोणताही प्रत्यवाय दिसत नाहीं. सबब त्यांचे आपण तीन वर्ग करूं, आणि त्यांजला

१ श्रद्धामूलक किंवा विकारमय ( Emotional ),

२ बौद्ध ( Intellectual ), आणि

३ नैतिक ( Moral ),

अशीं विषयव्यवस्थेच्या सोईसाठीं पृथक् पृथक् नांवें देऊं.

पहिल्या वर्गांतले लोक सगुणोपासक असून, ते नानाविध उदात्त व अत्युत्तम गुण, **ईश्वराच्या** ठायीं कल्पितात; आणि त्याची करुणा भाकून, श्रद्धापूर्वक त्यालाच अनन्यभावें शरण जातात. दुसऱ्या वर्गांतले लोक निर्गुणोपासक असून, ते आपल्या बुद्धिवादानें तो जगत्कर्ता

निर्गुण, निराकार, आणि अपरिछिन्न आहे, असें सिद्ध करितात. सर्व **पाश्चात्य** तत्त्ववेत्त्यांचा ह्या दुसऱ्या वर्गांतच अंतर्भाव होतो. आतां, राहिलेला जो तिसरा वर्ग त्यांत नैतिकसृष्टिनियमोपासकांचा समावेश होत असून, ते असें प्रतिपादन करितात कीं, हें अखिल जगत् ज्या नैतिक किंवा सृष्टिविषयकनियमांनीं बांधलें गेलें आहे, व ज्या नियमांस अनुसरून हे सर्व सृष्टिव्यवहार चालतात, त्या त्रिकालाबाधित नियमांहून भिन्न असा दुसरा **परमेश्वर** मुळींच नाहीं. एक सृष्टिनियम हीच अनुल्लंघनीय वस्तु असून, तिचें अतिक्रमण झालें कीं हटकून शासन व्हावयाचेंच, असें ते सिद्ध करून दाखवितात. **बेंथाम्**चा नीतिनियम ( Moral Law ), आणि **ब्रह्मसृष्टीला** कारण मानून **काव्यप्रकाशकारांनीं** सांगितलेला **नियतिकृतनियम**, हे दोन्ही एकाच वर्गांतले होत.

सर्व कल्पनांचें तादात्म्य.

असो. वर जीं तीन भिन्न भिन्न प्रकारचीं मतें सांगितलीं, तीं वस्तुतः त्या अद्वैत **परब्रह्माचीच** पृथक् पृथक् झालेली विभूती असून, त्या सर्वांचें सम्मिलन हेंच **परमेश्वराचें** पूर्ण स्वरूप होय. आणि म्हणूनच, सदरहू त्रिवर्गांपैकीं अमुक एक कल्पनाच खरी, व त्याशिवायची दुसरी अजिबात खोटी, असें म्हणणें म्हणजे आपला

दुराग्रह व अज्ञान, असमदृष्टि व स्वमतासक्ति, एकदेशीयता व क्षुद्रबुद्धि, इत्यादि मात्र व्यक्त करणें होय.

आम्ही मूर्तिपूजक होण्याचें कारण.

आतां, आम्ही हिंदुलोक यवढे मोठे तत्त्ववेत्ते असून, मूर्तिपूजक कसे व कोणत्या कारणांनीं झालों, याविषयीं थोडेंसें दिग्दर्शन येथेंच केलें पाहिजे.

ब्रह्मदेवाचें पूजन.

आमच्या श्रुतीप्रमाणें, ब्रह्म हेंच सर्व वस्तूंचें व अखिल विश्वाचें उत्पत्तिकारण असून तें अव्यक्त आहे, आणि बाह्येंद्रियाला अगदीं अगोचर आहे. तथापि, तें नित्य आहे, म्हणजे उत्पत्तिविनाशरहित आहे; आणि ह्यापासूनच साकार ब्रह्मा अथवा ब्रह्मदेव उत्पन्न झाला; व ह्यानेंच सर्व चराचर वस्तू उत्पन्न केल्या, असें स्मृतींत वर्णन आहे. या प्रमाणें, सृष्ट्युत्पत्तीचें महत्वाचें काम ब्रम्हदेवाकडे असल्या कारणानें, तो सहजींच पूजनीय झाला.

विष्णूचें पूजन.

तदनंतर, उत्पन्न झालेल्या सर्व सृष्टीचें संरक्षण करण्याचें काम सुयंत्रित होत गेल्यामुळें. हें जो काम करणारा, त्यालाही साकार व पूजनीय मानून. त्याचें नांव विष्णु ठेविलें.

---

१ एतदात्म्यमिदं सर्वामिति !

२ यत्तत्कारणमव्यक्तं नित्यं सदसदात्मकम् ।
तद्विसृष्टः स पुरुषो लोके ब्रह्मेति कीर्त्यते ॥ ११ ॥
( म. स्मृ. अ. १ ).

पुढें संहाराच्या कामीं अन्य देवाची नेमणूक होऊन,
महादेवाचें पूजन. त्याला **महेश** असें नांव दिलें, आणि तोही पूजनीय झाला.

आतां, कधीं कधीं हे तिन्ही देव एकाच ठायीं एकवटलेले दिसतात. उदाहरणार्थ, **दत्ता-**
त्रिमूर्तीचें पूजन. **त्रयाच्या** ठिकाणीं **ब्रह्मा, विष्णु,** आणि **महेश**, असे तिन्ही देव आविर्भूत झालेले दृष्टीस पडतात; आणि हीच आमची सुप्रसिद्ध त्रिमूर्ति होय.

असो. आमच्या पुराणांतरीं **ब्रह्मदेवाला** चार तोंडें ( चतुराननः ), **विष्णूला** चार हात ( चतुर्भुजः ), **महादेवाला** तीन डोळे ( त्रिनेत्रः ), आणि **दत्तात्रयाला** तीन डोकीं ( त्रिमूर्तिः ), वगैरे असल्याचें वर्णन आहे; परंतु ह्या सर्वांत कांहींना कांहीं तरी विशेष गूढार्थ असल्याचें निःसंशय वाटतें. सबब, त्याचा आपण विचार करूं.

प्रथमतः, **ब्रह्मदेवाला** चतुरानन बनविला. याचा हेतु इतकाच कीं, त्यानें चाऱ्ही दिशां-
त्रिमूर्तीचा गूढार्थ. कडे निरीक्षण करून, सृष्ट्युत्पत्तीचें काम सर्व बाजूंनीं करावें तदनंतर **विष्णूला** चतुर्भुज बनविला. तो अशा हेतूनें कीं, सृष्टीचें संरक्षण करण्याचेंच त्याचें काम असल्यामुळें, कोठूनही संकट आलें तरी त्यानें तें चाऱ्ही दिशांनीं निवारण करावें. पुढें **महादेवाला** त्रिनेत्र केलें. त्याचा तरी हाच हेतु कीं, भूत,

वर्तमान, आणि भविष्य, ह्या तिन्ही काळावर त्यानें आपली योग्य नजर ठेवून, संहाराचें काम बजावावें. आतां, दत्तात्रयाला तीन डोकीं असून तो त्रिमूर्ति आहे; त्यावरून, प्रत्येकाचें उत्पत्तिस्थितिसंहाराचें काम एकमेक करितो, एवढाच भावार्थ समजण्याचा आहे.

याप्रमाणें, सदर्हू देवांच्या शक्तीच्या मानानें आह्मीं त्यांस साकार मानून पूजनीय ठरविलें, व त्यांस भजूं लागलों. आणि पुढें दिवसानुदिवस मूर्तिपूजेचा हाच प्रचार जास्त वाढत गेला.

मूर्तिपूजेचें रहस्य.

तथापि, मूर्तिपूजा करणाऱ्या हिंदू लोकांस केवळ एवढ्याच कारणासाठीं, अगदीं वेडगळ किंवा अक्कलशून्य समजून, त्या सर्वांची पशुकोटींतच गणना करणें ह्मणजे, मोठाच प्रमाद होय. कारण, जर सर्व चराचर वस्तूंत ईश्वर आहे, आणि तो " **अणोरणीयान् महतो महीयान्** " असा आहे, तर तो पाषाणाच्या किंवा अन्य मूर्तींत देखील अवश्य असलाच पाहिजे. आणि तो तेथें आहे असें कल्पून जर त्या मूर्तीची पूजा हिंदू लोक करीत आहेत तर, तशी मूर्तिपूजा करण्यास कोणताही प्रत्यवाय दिसत नाहीं.

याविषयीं, एका सुप्रसिद्ध महाराष्ट्र तत्त्ववेत्त्या कवीनें[१]

---

१ हा साधुश्रेष्ठ तुकाराम होय. त्याचें जन्म शके १५३०-३१, ह्मणजे सन १६०८-९ च्या सुमारास झालें असावें. हा आपल्या बेचाळिसाव्या वर्षीं मरण पावला.

तद्विषयक अर्वाचीन मत, दिलेलें उदाहरण खरोखर ध्यानांत ठेण्यासारखें आहे. तो आपल्या एका सुरस अभंगांत, असें प्रेमळपणें सांगतो कीं,

**अवघें ब्रह्मरूप । रिता नाहीं ठाव ॥**
**पाषाणीं[1] तो देव । कैसा नव्हे ॥**

ह्या त्रिभुवनांतील यच्चावत् वस्तूंत जर परब्रह्म कोंदलेलेंच आहे तर, तें प्रतिमेंत किंवा मूर्तींत देखील सदैव विराजमान आहेच. आणि ह्मणूनच तें अमुक एक ठिकाणीं नाहीं, असें ह्मणणेंच संभवत नाहीं.

ईशव्यापकत्वाविषयीं दुसऱ्या एका महाराष्ट्र कवि कुलावतंसानें देखील असेंच ह्मटलें आहे.

**भूजल तेज समीरख रविशशिकाष्ठादिकीं असे भरला। स्थिरचर व्यापुनि अवघा तो जगदात्मा दशांगुले उरला ॥**

तेव्हां, प्रतिमेंत सुद्धां देवपणा असल्या कारणानें मूर्तिपूजाही सशास्त्रच आहे.

व अति प्राचीन मत. [2]ह्या आदिकारणाची कितपत आणि कशी व्याप्ती आहे, हें आमच्या पुराणआर्यांस

---

१ " प्रतिमा तो देव कैसा नव्हे. " असाही पाठ आढळतो.

२ हा मयूर कवि होय. हा शके १६५१ सालीं जन्मून शके १७१६ त मरण पावला. सदरीं लिहिलेली आर्या, " सभूमिं विश्वतो वृत्वाऽत्यतिष्ठद्दशांगुलम् " । ह्या स्मृतिवाक्याचें मराठी सार होय.

देखील उत्तम प्रकारें आणि पूर्णपणें माहीत होतें. कारण तें आदिकारण जें **विराट्स्वरूप**, त्याचें **पुरुषसूक्तांत** संपूर्ण वर्णन दिलेलें आढळतें. म्हणून त्यांतील अवश्य तितकें अवतरण या खालीं देतों.

**सभूमिं विश्वतों वृत्वा ।**
**ऽत्यंतिष्ठद्दशांगुलम् ॥**[1]

( ऋग्वेद संहिता. अ ८, अ ४, मं १०, अ. ७. )

याप्रमाणें, ईशव्यापकता सर्वत्र असल्याकारणानें, त्याचें मनोहर स्वरूप ह्या चर्मचक्षूला उपलब्ध होण्यासाठीं, सगुणोपासकांनीं त्या **निराकार वस्तूच्या** ठायीं आकार कल्पून, त्याची प्रतिमा स्थापन केली, आणि **मूर्तिपूजा** अमलांत आणिली. आणि तसें करण्यांत पूर्वी सांगितल्याप्रमाणें, आमची कांहीं चूकही दिसत नाहीं.

हिंदुलोकांच्या आणि पाश्चात्यांच्या तत्वज्ञानाची तुलना.

आतां, आम्हीं **हिंदुलोक** जरी मूर्तिपूजक आहोंत तरी, तत्त्वज्ञानाच्या संबंधानें आम्हीं कोणाला देखील हार जाणार नाहीं. आणि तत्वान्वेषणाच्या कामांत आम्हीं जितके परिश्रम व शोध केले आहेत,

१ ह्याचा अर्थ असा आहे कीं, यच्चावत् सर्व विश्व व्यापूनही तो परमात्मा दहा बोटें उरला आहे. आतां, सर्वत्रच त्याची व्याप्ति झाल्यावर त्याला शिलक राहण्याला मुळींच अवकाश रहात नाही, ही गोष्ट खरी आहे. तथापि, त्याचें संपूर्ण व्यापकत्व दाखविण्यासाठीं हा अतिशयोक्त्यलंकार वापरला आहे.

तितके आजपर्यंत कोणीही केले असल्याचें आढळून येत नाहीं.

प्राचीन राष्ट्रांत ग्रीक लोक हे तत्त्वज्ञानाच्या संबंधानें बरेच पुढें सरसावलेले होते. परंतु त्यांजला देखील हिंदूंच्या प्रमाणें खरें आत्मज्ञान[1] झालें असल्याचें दिसत नाहीं. या पारमार्थिक विषयांत हिंदूंच्या इतकी मजल कोणीही केली नाहीं, आणि सद्यःस्थितींत ते तत्त्वज्ञानाच्या शिखरास[2] जाऊन पोहोंचलेले दिसतात, किंबहुना, आत्मज्ञानासंबंधीं विचार हिंदूंच्या प्रकृतींत खिळले[3] जाऊन, धर्मात-

1 "The highest wisdom of Greece was 'to know ourselves;' the highest wisdom of India is 'to know our self."

( India. What can it teach us ? p. 104.)

2 "Their ( Hindu's ) general learning was much more considerable ; and in the knowledge of the being and nature of God, they were already in possession of a light, which was but faintly perceived even by the loftiest intellects in the best days of Athens."

(Elphinstone's India p. p. 94-95.)

3 "If I were asked to indicate by one word the distinguishing feature of the Indian character, as I have here tried to sketch it, I should say, it was *transcendent.*"

(India. What can it teach us ? p. 105104.)

( पुढें चालू. )

बोधाविषयीं त्यांचा स्वभावतःच कल असतो, असें म्हणण्यासही कांहींच हरकत नाहीं.

यूरोपखंडांतील मतविरोध, व भारतीयांची प्रगति.

भिन्न भिन्न कल्पनांचें वर्गीकरण करून, त्या सर्वांचा एकंदर तीन कोटींत समावेश होत असल्याचें पूर्वीं सांगितलेंच आहे. आतां, **यूरोपखंडांत** ह्या तिन्ही कल्पनांचा परस्पर विरोधच असल्याचें दिसतें. आणि त्या तिन्ही मतांतले लोक अगदीं भिन्नभिन्न दिशेनेंच पाहत असल्याकारणानें, त्यांचें बिलकूल मतैक्य नाहीं. इतकेंच नव्हें तर, केवळ मतवैपरीत्यामुळें प्रसंगानुसार ते एकमेकाला गालिप्रदान देखील करीत सुटनात. त्याकारणानें, धर्माच्या तत्त्वांत **यूरोप व अमेरिका** खंड अजून सुद्धां पुष्कळच मागें असल्याचें भासतें; आणि तितक्याच मानानें आमचें **भरतखंड** हें विशेष रीतीनें पुढें सरसावलेलें दिसतें. कारण, येथें ह्या तिन्ही कल्पनांचें एकीकरण व सम्मिलन होऊन, **अद्वैतमताचें श्रेष्ठत्व** सर्वमान्य झालें आहे.

येवढें असाध्य व महत्कार्य संपूर्ण रीतीनें सिद्धीस

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

" The transcendent temperament acquired no doubt a more complete supremacy in the Indian character than any where else."

(India. What can it teach us ? p. 106.)

शंकराचार्यांचा दीर्घोद्योग, व त्याचें श्रेय.

नेल्याचें श्रेय केवळ एकट्या **शंकराचार्यांकडेसच** आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. कारण, त्यानें श्रुत्यंतर्गत हरएक विसंगत सिद्धांताची एकवाक्यता केली; आपल्या प्रासादिक बुद्धिप्रभावानें त्यानें सर्वांचा मेळ लावून दिला; आणि

**'श्रुतिर्विभिन्नास्मृतयश्चभिन्नानैकोमुनिर्यस्यमतंप्रमाणम्'**

अशी जी बेबंदनगरी आणि झोटिंग पादशाहीची हिंदुधर्मस्थिति झाली होती, ती त्यानें अजिबात मोडून टाकून, तिची सुरळीत व्यवस्था लाविली. तसेंच, त्यानें सर्व श्रुतींचा समन्वय आणि स्मृतींचा अविरोध उत्तम प्रकारें स्थापित केला. याप्रमाणें, त्यानें हा जो विलक्षण खटाटोप केला, तो लागलींच फळास, येऊन त्यामुळें लोकांच्या हृदयांत तावडतोब उजेड पडूं लागला. तेव्हां अर्थात्च

**भिद्यते हृदयग्रंथिश्छिद्यंते सर्वसंशयाः ॥**

अशी सर्वांची स्थिति होऊन गेली, आणि **अद्वैतमताचा** आपोआपच पगडा बसला.

कोणत्याही तत्त्ववेत्त्यांचीं मतें आपण पाहिलीं, तरी

आधुनिक पाश्चात्यांच्या मतांचा अद्वैतांत अंतर्भाव.

बहुतकरून त्या सर्वांचा अंतर्भाव प्रत्यक्ष किंवा पर्यायानें अद्वैतमतांतच होण्यासारखा आहे. निदान अद्वैत मताचें पूर्णावलंबन केल्याशिवाय, मृ-

ष्टिविषयक जे नानाविध प्रश्न उत्पन्न होतात, त्यांची समाधानकारक तडजोडच लागत नाहीं, असें म्हटलें तरी चालेल. **मीमांसकांचा** चोदनाविधि; किंवा **बेंथामचा** नीतिनियम (Moral Law); अगर सर्व चराचर वस्तु एका व्यापक द्रव्याचेच विकार आहेत म्हणून **स्पिनोझाचें** मत; अथवा त्या व्यापक द्रव्याच्या इतर वस्तु छायाच आहेत म्हणून **फिक्टीचें** प्रतिपादन; तसेंच त्या व्यापक इच्छेचीं तीं कार्यें आहेत ह्मणून **शोपेनहोरचे** विचार; आणि ही सर्व सृष्टि अव्याकृत तत्वानें आपलें व्याकरण करण्याकरितांच उत्पन्न केलेली आहे, ह्मणून **हार्टमन्‌नें** लढविलेली कल्पना; इत्यादि सर्वांचा अंतर्भाव अद्वैत सिद्धांतांतच होतो, असें म्हणण्यास कांहींच प्रत्यवाय नाहीं.

सदर्हू घटपटादि खटपटीविषयीं आमच्या आधुनिक संतमंडळींनीं व्यक्त केलेला तिटकारा.

असो. ह्या घटपटादि खटपटींत, आमच्या आधुनिक **संतमंडळीस** बिलकूल तात्पर्य वाटेना; आणि त्या नानाविध कल्पनाव्यापारांनीं त्यांचें यत्किंचित् समाधानही होईना. तेव्हां, त्यांनीं **भक्तिमार्ग** स्वीकारून, मुक्तीप्रत जाण्याचा दृढ निश्चय केला. कारण, **भक्ति** हेंच **मुक्तीचें** खरें साधन असून त्या शिवायचे इतर खटाटोप अगदींच व्यर्थ आहेत, अशी त्यांची बालंबाल खात्री होत गेली; व भक्ति आणि मुक्ति यांचा अत्यंत निकटसंबंध आहे असें त्यांस वाटूं लागलें.

त्यांची भक्ति किंवा श्रद्धा, व तदनुसारी मुक्ति.

**भक्ति**, किंवा **भाव**, अथवा **श्रद्धा**, हीं पूर्णत्वानें असलीं म्हणजे तिजपासून कसा व कितपत कार्यभाग होतो, आणि त्यामुळें हा प्राणी परमेश्वराचा किती लाडका होतो, हें हिंदूंच्या कोणत्याही आधुनिक धर्मविषयक ग्रंथांत चांगल्या प्रकारें व्यक्त होण्यासारखें आहे. सबब त्यांपैकीं, अगदीं निवडक आणि उत्तमोत्तम असे दाखले वाचकांपुढें ठेवितों.

एकनाथ.

**एकनाथी** ग्रंथांत तर तत्संबंधीं प्राचुर्यच दृष्टीस पडतें. हा भगवद्भक्तिपरायण साधुवर्य आपल्या अभंगांत एके ठिकाणीं असें म्हणतो कीं:—

**भक्तीच्या पोटीं मुक्तिपैं आली ।**
**भक्तीनें मुक्तीतें वाढविलें ॥ १ ॥**
**भक्ती ते माता मुक्ती ते दुहिता ।**
**जाणोनी तत्वता भजन करी ॥ २ ॥**
**भाव तोचि देव, भाव तोचि देव ।**
**ये अर्थी संदेह धरूं नका ॥ ६ ॥**
**भावची कारण, भावची कारण ।**
**या परतें साधन नाहीं नाहीं ॥ ४ ॥**
**एका जनार्दनीं भावची कारण ।**
**सच्चिदानंदावरील दावी खूण ॥ ५ ॥**

मूर्तिपूजा व अद्वैत, यांचा अविरोध.

**एकनाथी भागवतांत** ह्या भगवद्भक्तिचें कांहीं विलक्षण सामर्थ्य सांगितलें आहे.

**ज्यासी भगवद्भक्तीची गोडी । त्यावरी भगवंताची आवडी ॥ त्यास भेटी होय रोकडी । जैं पुण्याच्या कोडी तुष्टती ॥ २३० ॥**

( अध्याय २ रा. )

आमचे सर्व **संतमंडळ** पूर्ण मूर्तिपूजक असून, **देवतार्चन, भक्ति,** व **मुक्ति,** यांजवर त्यांची उत्कट श्रद्धा असे. आणि इतकें असून देखील ते परिपूर्ण **अद्वैतमतवादी** होते, अशाविषयीं त्यांचे ग्रंथच साक्ष देतात. यावरून **मूर्तिपूजा व अद्वैत** यांचा तिळमात्रही विरोध नाहीं, असें कोणाच्याही लक्ष्यांत आल्यावांचून खचित राहणार नाहीं.

ज्ञानेश्वर.

**ज्ञानेश्वर**[1] हा आपल्या **अमृतानुभवांत** असें लिहितो कीं,—

**जया एके सत्तेचें बैसणें। दोघां एका प्रकाशाचें लेणें। जें अनादि एकपणें। नांदती दोघे ॥ ८ ॥**

---

१ हा आळंदी येथें शके ११९७ साली, श्रावण वद्य अष्टमीच्या दिवशीं जन्मला, आणि शके १२१८ साली कार्तिक वद्य अष्टमीस समाधिस्त झाला.

भेदु लाजोनी आवडी । एकरसीं देत बुडी ।
तो भोगणें याथावकाढी । अद्वैताचा जेथें ॥ ९ ॥

(प्रकरण १ लें.)

जैशा आकारादि अक्षरा । भेटती पन्नासही मात्रा ।
तैसें यां चराचरा । दुसरें नाहीं ॥ २९ ॥

( अध्याय १० वा.)

हें विश्वची माझें घर । ऐशी मती जयाची स्थिर ॥
किंबहुना चराचर । आपण जाहला ॥ २९ ॥
मग यावरी ही पार्था । माझ्या भजनीं आस्था ॥
तरी तयातें मी माथां । मुकुट करीं ॥ ३० ॥

( ज्ञानेश्वरी, अध्याय १२ वा. )

मुकुंदराज

मुकुंदराज हा देखील अद्वैताचें अशाच प्रकारें वर्णन करतो.

ते घटमठ दोन्ही भंगतां । ठाईंचें ऐक्य तत्वता ॥
तैसें जीवेश्वर उपाधी निरसतां। स्वस्वरूप एक ॥१७॥

( परमामृत, प्रकरण ३ रें. )

दृष्ट द्रष्टा दर्शन । या तिहीं भावा विलक्षण ॥
येकलेंची आपण । ज्ञप्ति मात्र ॥ १० ॥
दृश्यदर्शन हारपें । तेथें उरीजे स्वस्वरूपें ॥
अखंडित आपेंआप । निरामय ॥ ११ ॥

( परमामृत, प्रकरण ११ वें. )

ह्या त्रैलोक्यांतील यच्चावत् चराचर वस्तु शुद्ध व नि-

ब्रम्हज्ञानाची गुरुकिल्ली.

ळ्वळ अद्वैतांतच कशी मुरून राहिली आहे, हें **एकनाथानें** फार मार्मिकपणानें आणि थोडक्यांतच सांगितलें असून, नितांत कठीण असें जें **ब्रह्मज्ञान** त्याचीही **गुरुकिल्ली** दोन शब्दांतच मुमुक्षु जनापुढें, त्यानें मोठ्या खुबीनें ठेविली आहे.

**एकपणीं अनेक । कीं अनेकीं दावी एक ॥**
**नवल कैसें कौतुक । दुजेनीविण ॥ ३ ॥**
**ब्रह्मज्ञानाची किल्ली । मी सांगेन एकेची बोली ॥**
**ज्याची कल्पना निमाली । तो प्राप्तपुरुष ॥४१८॥**

( एकनाथकृत स्वात्मसुख. )

कल्पनेचा विकार व जगाचा मिथ्याभास.

हें जें अखिल जगत् भिन्नभिन्न रूपानें भासमान होत आहे, तें वस्तुतः तसें नसून केवळ कल्पनेचा विकारच सर्व वस्तूला कारणीभूत झाला आहे; तें **परब्रह्म** तर अगदींच निर्विकार आहे; आणि ही सर्व सृष्टि निव्वळ कल्पनेचाच बाजार आहे; असा सर्व तत्त्ववेत्त्यांनीं सिद्धांत केला आहे. ह्याविषयीं **एकनाथ** असें लिहितो कीं,

**दोर दोर पणें असे ।**
**दोर कांहीं सर्प झाला नसे ॥**
**दोर सर्पत्वें भ्रांतांशीं भासे ।**
**अपभ्रांति करूनी ॥ १२४ ॥**

तेंचि ब्रह्मत्व ब्रह्मत्वेंचि असे ।
ब्रह्म कांहीं प्रपंच झालें नसे ॥
ब्रह्म प्रपंचत्वें अज्ञानाशीं भासे ।
अपभ्रम जाणिजे ॥ १२५ ॥
तेंवी ब्रह्म उगेंची असे ।
संकल्पें प्रपंचाकार होतसे ॥
संकल्पानिमितां कांहींच नसें ॥
ब्रह्मा वेगळें ॥ १२८ ॥
तूं ह्मणसीं ब्रह्मीं संकल्प नसे ।
तरी कोणापासून होतसे ॥
जो भावी तया होतसे ।
एऱ्हवीं नाहीं ॥ १२९ ॥
आपुलीच कल्पना ।
विविधरची स्वप्नें नाना ॥
ते करितां दिसे रचना ।
प्रबोधीं कांहींच नाहीं ॥ १३२ ॥
तेंवी संकल्पें रचिलें दिसे ।
निर्विकल्पीं कांहीं न दिसे ॥
रचे खचे संकल्प वसे ।
कल्पनानाशी दोन्ही नावी ॥ १३३ ॥
(एकनाथकृत आनंदानुभव ).

रामदासस्वामी हे सर्व प्रकारें सगुणोपासक असू-

रामदासस्वामी.

नहीं पूर्ण अद्वैत वादी होते. ते रामभक्त असल्याकारणानें, अहर्निशीं रामचंद्राचीच सेवा व भक्ति करण्याविषयीं, त्यांनीं आपल्या मनाच्या श्लोकांत अखिल जनास सुबोध केला आहे.

**मनारे जनीं मौन्य मुद्रा धरावी**
**कथा आदरें राघवाची करावी ।**
**नसे राम तें धाम सोडोनि द्यावें**
**सुखालागिं आरण्य सेवीत जावें ॥ ४४ ॥**

तथापि, त्यांनीं आपल्या अन्य ग्रंथांत अद्वैताचें देखील सुरेख प्रतिपादन केलें आहे, आणि हें **परब्रह्म** सर्वत्र कसें कोंदलेलें आहे, तें फारच मार्मिकपणें दाखविलें आहे.

**जिकडे तिकडे जेथें तेथें ।**
**विन्मुख होतां सन्मुख होतें ॥**
**सन्मुख होतां चुकेना तें ।**
**कांहीं केल्या ॥**

( दासबोध. )

तुकाराम.

पंढरीच्या विठोबावर तुकारामाचें किती प्रेम होतें आणि कसली विलक्षण निष्ठा होती, हें आबालवृद्धांस माहीत असून, तें त्याच्या अभंगांत तर ठायीं ठायीं व्यक्त होत आहे.

**गाईन ओंवीया पंढरीचा देव ।**
**आमुचा तो जीव पांडुरंग ॥ ३६७१ ॥**

पण ह्या सगुण उपासनेबरोबरच त्या परमेश्वराची सर्वत्र व्यापकता असल्याचें त्याच्या लक्षांत पूर्णपणें येऊन चुकलें होतें.

गोडीपणें जैसा गुळ ।
तैसा देव झाला सकळ ॥ २७४ ॥

भक्तिभावाचें, व वेदान्तमताचें ऐक्य,

याप्रमाणें १ देवतार्चन, २ भक्ति, आणि ३ मुक्ति; किंवा १ कर्म, २ उपासना, आणि ३ ज्ञान; यांचें साधनच आमच्या संतमंडळींच्या हातीं लागल्याकारणानें, त्यांनीं त्याच मार्गाचें अवलंबन केलें, व त्यापासूनच त्यांचा कार्यभागही झाला.

आणि सच्चिदानंद स्वरूपाची ओळख.

आतां, वेदांत्यांची सर्व भिस्त म्हटली म्हणजे "तत्त्वमसि," "सच्चिदानंदस्वरूपोहम्," "सत्यंविज्ञानमानंदंब्रह्म,"[1] ह्या महावाक्यावर होय. तथापि, त्यांची देखोल भक्तिमार्गावर अश्रद्धा नाहीं. कारण, ते ज्ञानी असल्याकारणानें, त्यांजला हें पक्केपणीं समजून चुकलें आहे कीं, ह्या सर्वांचा अंतर्भाव अस्ति, भाति, आणि प्रिय, यांतच होत असून, वर नमूद केलेल्या कल्पनावर्गत्रयांतही त्यांचा समावेश होण्यासारखा आहे. सत् शब्दानें नैरंतर्याचा बोध होतो. इतकेंच नव्हे तर, अव्याहत क्रमानें

१ बृह. ३, ९, २८.

सर्व सृष्टिव्यवहार चालविणाऱ्या ह्या जगदाधार भूततत्त्वाचें आविष्करण होतें. **सत्**, **असि**, आणि **अस्ति**, हे तिन्ही शब्द एकार्थव्यंजकच होत. त्या ज्ञानरूपी **चिन्मय** पण अव्यक्त स्वरूपाचा बोध **चित्**, किंवा **त्वम्**, अथवा **विज्ञान** शब्दानें होतो. आणि मनोवृत्तीला आल्हाद देणारें असें जें **ब्रह्मस्वरूप**, त्याची प्रभा **तत्** किंवा **आनंद** शब्दानें व्यक्त होते. व ह्या स्वरुपाची ओळख जितक्या अंशानें **वेदान्त्यांस** होते, तितक्याच अंशानें ती भगवद्भक्तपरायण अशी जी **संतमंडळी**, त्यांसही होते.

**सत् चित् आणि आनंद ।**
**हा अतद्व्यावृत्तीचा भेद ॥**
**परि वस्तु नव्हे त्रिविध ।**
**तें एकविध निजानंद ॥ ३२ ॥**

( एकनाथकृत स्वात्मसुख. )

हिंदुधर्मामृत.

**हिंदुधर्मांतील** हा महानंद व ही विलक्षण मजा, त्यांतील शांति व नम्रता, सहनशीलता आणि परोपकारबुद्धि, भूतदया आणि समता, तादात्म्य व निर्विकल्पता, ऐक्य आणि सिद्धी, अशीं अन्य कोणत्याही धर्मांत इतक्या पराकाष्ठेच्या कोटीप्रत पावलेलीं असल्याचें अगदींच दिसत नाहीं. मग

1 " Speaking of an Indian Missionary's lament

( पुढें चालू. )

हें सुंदर अमृत व अशा प्रकारचें अपूर्व मिष्टान्न टाकून, अन्य धर्मांतील नीरस फोल, व खाटी आणि तुरट फळें चाखण्यासाठीं, कोण हिंदू सुखानें प्रवृत्त होईल, व आपला सुखाचा जीव अगदीं निष्कारणच दुःखांत घालील ! अर्थात् कोणीच घालणार नाहीं.

परधर्मीय आह्मांला लालूच दाखवून, त्यांचा ध

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

that so few Brahmans are Converted to Christianity, Mrs. Besant says, how could it be otherwise? What can the ablest Missionary offer to the Brahman that he does not already possess in his own religion, and how can he hope to win him in modern presentments of spiritual truths already familiar to him in subtler and profounder ancient dicta? Nothing deeper and lofter can be offered to him in religious philosophy than his vedànta, nothing more sublimely spiritual than his Upanishads, nothing more nobly moral than his Bhagwat Gita and other teachings in his Mahà-Bhàrata, nothing more exquisitely satisfying to the religious emotions than the Avatàras of Ráma and Krishna, and the austerer glories of Maheshwar. Why then seek to convert him? He seeks not to convert the Christian from his own faith, but gives to men of other creeds the same toleration he claims for himself."

व त्याचा परधर्मियांनीं घेतलेला स्वाद.

स्वीकारण्यासाठीं प्रसंगीं आमच्यावर जुलूम देखील करतात. तथापि आमच्याकडून धर्मसंबंधीं सक्ती किंवा नैष्ठुर्य कोणावरही होत नाहीं. इतकेंच नव्हे, तर आह्मी त्यांच्या कळपांत देखील कधीं जात नाहीं. परंतु विशेष आश्चर्य हेंच कीं, आमच्या **हिंदुधर्मांत** येण्याची परधर्मियांस अजिबात मनाई असून सुद्धां, ते लोक आमचा **हिंदुधर्म** चांगला असें पूर्णपणें समजून घेऊन, तो यथेष्ट स्वीकारतात. **ब्लाव्हाट्स्कीबाई**, **बिझांट्बाई**, **करनल् आल्कॉट्**, इत्यादि पाश्चात्य रत्नें अशाच मासल्याचीं उदाहरणें होत. आणि ह्यावरूनच, आमच्या **हिंदुधर्मांतील** मजा व रहस्य हीं सहजीं लक्षांत येण्यासारखीं आहेत.

हिंदुधर्मांतील मुख्य पंथ, व त्याचे पोटभेद.

असो. आतां, **हिंदुधर्मांतील** मुख्य पंथ व त्याचे पोटभेद, यांविषयीं दोन शब्द लिहून, हा भाग पुरा करितों.

**हिंदुधर्मांत १ स्मार्त** आणि **२ भागवत** असे दोन मुख्य पंथ असून, त्यांतही खालीं लिहिल्याप्रमाणें दुसरे अनेक पोटभेद आहेत. ह्मणजे **१ शैव, २ वैष्णव, ३**

---

1 "The Hindus are among the most tolerant religionists in the world."

(Dr Hunter's Indian Empire. P. 227.)

**गाणपत्य**, ४ **भैरव**, आणि ५ **शाक्त** अथवा देवी उपासक, इत्यादि. ह्याशिवाय ज्या ज्या विद्वान लोकांनीं आपलीं मतें स्थापित केलीं, त्या त्या मतांचेही अनेक अनुयायी असल्या कारणानें, तेही पंथ जारीनें सुरू आहेत. उदाहरणार्थ **शंकराचार्य**, **रामानुज**, **कबीर**, **चैतन्य**, **वल्लभ**, आणि **नानक**, इत्यादि महात्म्यांनीं जे मार्ग लावून दिले, त्यांचेंच अवलंबन करणारे पुष्कळ लोक आहेत. परंतु, सूक्ष्म विचाराअंतीं, असें दिसून येईल कीं, ह्या सर्व पंथाचा **हिंदुधर्ममहोदधींतच** पूर्ण समावेश होतो.

आतां, आमच्या **भरतखंडांतील** एकंदर लोकसंख्या २८,७२,२३,४३१ असून, त्यांपैकीं आह्मी **हिंदू** व २२,७४,६८,०२६ आहोंत. ह्मणजे इतर लोकसंख्येच्या मानानें, फक्त हिंदूंचीच लोकसंख्या शेंकडा सुमारें ८० आहे. त्यावरून, आमच्या धर्माच्या व्यापकतेचें सहजीं दिग्दर्शन होण्यासारखें आहे.



# भाग ४० वा

## झरथुष्ट्रधर्म.

झरथुष्ट्रधर्म.

प्रस्तुत भागांत झरथुष्ट्रधर्मासंबंधीं दोन शब्द लिहिण्याचें योजिलें आहे. तथापि, ह्या धर्माचें यथावकाश विवेचन करण्यापूर्वी, हा धर्म हल्लीं कोण लोक पाळतात, व त्यांचा आह्मां **आर्यहिंदूराष्ट्राशीं** कितपत, व कोणत्या प्रकारचा, आणि कसा निकटसंबंध आहे, याविषयींचें प्रथमारंभींच थोडेंसें दिग्दर्शन केलें पाहिजे. कारण, तसें केल्याशिवाय, तद्विषयक संदर्भ अगदींच कळणार नाहीं, किंवा त्यांची आणि आमची पूर्वपरंपराही बिलकूल ध्यानांत येणार नाहीं. सबब, हें सर्व साद्यन्त अवलोकनांत येण्यासाठीं, त्याबद्दलचा थोडासा मजकूर येथें लिहितों.

त्याचा वेदकालीन आर्यांशीं संबंध.

**पूर्वार्धाच्या** दुसऱ्या पुस्तकांतील दहाव्या भागांत,[1] अखिल जगत्तलावरील सर्व श्रेष्ठ आणि सर्वमान्य जे **आर्यलोक**, त्यांचें मूलनिवासस्थान कोणतें असावें, याविषयींचें थोडेंसें दिग्दर्शन केलेलेंच आहे. त्यावरून

[1] भारतीय साम्राज्य, पु. २, भा. १०, पान १ ते २१ पहा.

**उत्तरहिंदुस्थानाच्या** वायव्येकडील प्रदेश, **अफगाणिस्थान**, किंवा त्याच्या आसमंतांतील प्रांत, वगैरे ठिकाणीं, ( अथवा कदाचित् त्यांच्याही पलीकडे **मध्यआशियांतील** विस्तीर्ण पठारावर ), हे कांहीं कालपर्यंत तरी खचित एकत्र राहिले असावेत, असें आतां नूतन शोधांवरून अनेक प्रमाणांनीं बहुतेक सिद्धवत ठरल्यासारिखेंच आहे.

आर्यांची वस्ती व तिची फाटाफूट.

या ठिकाणीं **आर्यांचा** बराच काळ लोटल्यावर, त्यांचें लक्ष्य कारणपरत्वें सामाजिक व धार्मिक सुधारणेकडे वेधलें जाऊन, ते समाजोन्नतीच्या व्यवसायांतच निमग्न झाले असल्याचें भासमान होतें. कारण, ह्यावेळीं, त्यांच्या मनांत एतद्विषयक विचारच वारंवार घोळत असल्यामुळें, समाजाची कोणती व्यवस्था केली असतां तो सुधारेल; अथवा समाजघटनेंत कोणत्या प्रकारें फेरफार केला असतां तो पुढें सरसावेल; किंवा धार्मिक संस्थांस कशा प्रकारचें वळण लाविलें असतां त्या चिरकाल आणि अबाधित राहून, अत्मोन्नतीला कारणीभूत होतील; याविषयींच त्यांच्या मनाची विशेष प्रवृत्ति झाली असावी.

ही फाटाफूट होण्याचें कारण.

ह्या वेळीं, समाजघटनेच्या व्यवस्थेंत आणि धार्मिक संस्थांत जो जो ह्मणून फेरबदल व्हावयाचा; त्यासंबंधानें आपापसांत बराच ऊहापोह होऊन, शेवटीं

भिन्नरुचिर्हि लोकः या ह्मणीप्रमाणें, आमच्या पुराणतम आर्यांच्या कंपूंत बराच मतभेद झाला. आणि त्याचा अखेरीस असा परिमाण झाला कीं, त्यांच्यांत भांडण व तंटे सुरू होऊन, सरते शेवटीं त्यांची फाटाफूट होण्याची देखील वेळ आली.

फाटाफूट झाल्यानंतर झालेलें स्थलांतर.

याप्रमाणें ज्यांचा मतभेद झाला, त्यांचा कंपू संख्येच्या परिमाणानें अगदीं लहानच असल्या कारणानें, त्यांचा इतरांबरोबर निभाव लागेना. तेव्हां अर्थातच त्यांनीं आपला गाशा गुंडाळला, आणि पश्चिम दिशेकडे काटशह काढण्याचा विचार केला. तदनंतर, ह्या कंपूपैकीं कांहींनीं वीरखंडांत[1] ( ब्याक्ट्रियांत ) आक्रमण केलें, आणि कित्येक अक्षय्या[2] व जगत्सरित्[3], या दोन नद्यांच्या दरम्यानच्या प्रदेशांत शिरले.

---

१ ह्याचाच अपभ्रंश 'वीरखंड' असा होऊन, त्याचें पुढें 'वीरकधा' असें रूप झालें असावें, असें वाटते. आणि ह्याचेंच कालान्तरानें बाक्ट्रिया ( Bactria )झाल्याचें दिसतें. झरथुष्ट्राचें हेंच वसतिस्थान असल्याविषयीं, गाथा आणि वन्दिदाद म्हणून जीं पारशी लोकांचीं धर्मपुस्तकें आहेत, त्यांत वर्णन आहे. ( Vide Martin Haug's Essays on the Parsi religion. P. 253 )

2 Oxus.

3 Yaxartes.

पुढें, आह्मांपासून विभक्त झालेल्या ह्या आर्य वंशजांनीं, अथवा आर्य वंशाच्या शाखेनें पुष्कळ स्थलान्तरें केलीं, आणि असें पर्यटन करीत करीत ते सांप्रतच्या इराणांत गेले. तेथें त्यांनीं आपल्या नांवांत थोडासा फेरबदल केला, व आपणां स्वतःस आर्य न ह्मणवितां, इराणी म्हणवूं लागले; आणि ज्या देशांत त्यांनीं आपलें राहण्याचें कायमचें वसतिस्थान केलें, त्याला इराण म्हणण्याचा परिपाठ पाडला.

आर्यइराणींचें इराण,

आतां, ही फाटाफूट झाल्यावर, बाकीचे जे आर्यलोक राहिले, ते पूर्वाभिगामी होऊन वायव्य कोपऱ्यानें पंजाबांतून उत्तर हिंदुस्थानांत उतरले; आणि त्यांनीं येथेंच आपली कायममची स्वती करून, आपल्या निवासस्थानास आर्यावर्त असें नामधेय दिलें. याप्रमाणें; आर्यहिंदूंचा सुप्रसिद्ध आर्यावर्त देश असून, आर्य इराणी लोकांचा इराण असल्याविषयीं सर्वांस महशूर आहे.

व आर्य हिंदूंचें आर्यावर्त.

आमच्या बंधुवर्गांत, ह्मणजे आर्य हिंदु आणि आर्य इराणी यांच्यांत आपापसांत, ही जी ताडातोड झाली, तिचा उल्लेख पारसिकांच्या गाथा नामक धर्मपुस्तकांत अगदीं प्रत्यक्ष रीतीनें

ह्या फाटाफुटीचें झरथुष्ट्र धर्मपुस्तकांत दिग्दर्शन.

केलेला असल्याचें दिसून येतें. कारण, एके ठिकाणीं त्यांत असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, आम्हीं आतां कोणत्या प्रदेशांत जावें, आणि कोठें आश्रय घ्यावा ? आमच्या पुरस्कर्त्यांस व त्यांच्या अनुयायिजनांस आतां कोण पाठबळ देईल ? कारण, देशाधिपति, सत्ताधीश, किंवा नोकरचाकरसुद्धां, आम्हां कोणासही मान देत नाहींत.

ह्यांनींच आणखी असाही उद्गार काढिला आहे कीं, ' आह्मांला असें पक्कें ठाऊक आहे कीं, आह्मीं निराश्रित आहोंत. कारण, आमच्या परिवारांस आह्मी मुकलों असल्याचें दिसतें. किंवा, निदान, त्यांनीं तरी आह्मांला सोडून दिलेलें आहे. '

असो. याप्रमाणें आह्मीं विभक्त झाल्यावर, आमच्या पारसीक बंधूस आम्हां पेक्षांही जो ज्यास्त त्रास सोसावा लागला, त्याचें कारण असें दिसतें कीं, त्यांचा कंपू लहान पडल्या कारणानें, त्यांच्याकडे मनुष्यांचें पाठबळच कमी होतें. यामुळें, त्यांचा आणि आमचा जेव्हां जेव्हां ह्मणून सामना होई, तेव्हां तेव्हां ते पराजय पावत; आणि दुसरें असें कीं, देशान्तर करण्याच्या संबंधानें अवश्य लागणारा मनुष्यांचा भरणा, किंवा भरपूर सामग्री देखील त्यांच्याजवळ नव्हती.

ह्यावरून, वाचकांच्या लक्ष्यांत इतकें सहजीं येऊन

---

१ उस्तवैति गाथा. ( ४. ४६ ). मार्टिन् हौरुत, पारसीक धर्मपुस्तक, पान १५५ पहा.

हिंदू आणि इराणी लोकांचें एकच मूळ.

चुकेल कीं, **आर्यहिंदू** आणि **इराणी** यांचें मूळ किंवा यांचा वंशवृक्ष एकच असून, त्याच जरठवृक्षाच्या आह्मी दोन शाखा आहोंत. व ह्यांचीच कालवशात् मतवैचित्र्यामुळें फाटाफूट होऊन, त्या भिन्नभिन्न देशांत पसरल्या. इतकेंच नव्हें तर, त्यांनीं आपल्या पराक्रमतेजानें व बाहुबलानें अनेक देश पादाक्रान्त करून, त्या त्या ठिकाणीं आपापला धर्मही स्थापिला.

झरथुष्ट्र धर्म.

हेच प्राचीन **इराणी** लोक सांप्रतचे **पारसीक** किंवा **पारशी** होत; आणि पुराण **आर्य-हिंदू** तर आम्ही हल्लीं स्वयंभूच

---

1" * * * The Zoroastrian religion arose in consequence of a serious conflict of the Iranians with those Arian brother tribes which immigrated into Hindustán Proper, and whose leaders became in later times the founders of Bràhmanism." * * *

" The causes, which led to the schism, may readily be learnt from the more ancient pieces of the Zend Avesta, chiefly from the Gáthas. They were both of social, and political, and religious nature."

ह्याच इराणी लोकांनीं अक्षय्या (ऑक्सस्), आणि जगत्सरित् ( यग्झार्टीज् किंवा जग्झार्टीज् ), या दोन नद्यांच्या दरम्यानचा प्रदेश, व वीरखंड ( वीरखंड किंवा ब्याक्ट्रिया ) च्या प्रांतांनलीं मोठमोठीं मैदानें, अथवा पठार, व्याप्त केल्याविषयीं सुप्रसिद्ध पाश्चिमात्य पंडित मार्टिन् हौ यांचें म्हणणें आहे.—( मार्टिन-हौचें पार्शीधर्मसंबंधीं पुस्तक. सन १८६२. पान२४८।२४९ पहा. )

आहेत. तेव्हां, त्यांचा व आमचा इतका निकटसंबंध असल्या कारणानें, **हिंदुधर्माचें** विवेचन केल्यानंतर, त्याच्या मागोमाग, कालक्रमास अनुसरून **पारसीकांचा** धर्म जो **झरथुष्ट्र**, त्याबद्दलही दोन शब्द लिहिणें अगदीं उचित असल्यामुळें, तोच विषय आतां हातीं घेतों.

झरथुष्ट्र शब्दाचा अर्थ.

**झरथुष्ट्र** म्हणजे मुख्यपुरोहित, आचार्य, किंवा धर्माध्यक्ष होय. आणि म्हणूनच सर्व पारशांच्या धर्माध्यक्षांस **झरथुष्ट्र** म्हणतात. ह्याचाच **झरदोष्ट** = **जरतोस्त** = **दस्तूर**, असा अपभ्रंश झाला आहे. व **पारशांच्या** उपाध्यांस **दस्तूर** म्हणण्याचा अजून देखील परिपाठ आहे.

ज्यानें **पारसीकांच्या** धर्माची प्रतिष्ठापना केली, तो सुद्धां **झरथुष्ट्र** म्हणजे धर्माध्यक्ष वर्गापैकींच होता. परंतु तो **स्पितम** गोत्रांतला असल्या कारणानें, त्याला **झरथुष्ट्र स्पितम** असें म्हणत.

**झरथुष्ट्र** हा शब्द **संस्कृत** ( जरत=पुराण; + उत्तर= उत्तम; या दोन ) शब्दांपासून, झालेला असून त्याचा अर्थ, सर्व झरथुष्ट्रांत म्हणजे धर्माधिकाऱ्यांत पुराण व उत्तम, असा जो **झरथुष्ट्रस्पितम**, तो होय.

असो. **पारसीकांच्या** धर्माचा प्रवर्तक **झरथुष्ट्रस्पितम** असल्याविषयीं, तद्धर्मियांची सर्वत्र समज आहे. परंतु, ह्या-

---

१ मार्टिन् होरुत पारसीक धर्माचें पुस्तक, पान २५२ पहा.

पारशी धर्माचे झरथुष्ट्राच्या पूर्वीचे प्रवर्तक.

च्या पूर्वीही दुसऱ्या कित्येक धर्माधिकाऱ्यांनीं एतद्विषयक दिशेचें दिग्दर्शन केलेलें असून **झरथुष्ट्रस्पितमानें** फक्त कित्येक बाबतींत थोड्याबहुत अंशानें फरफार मात्र केल्याचें दिसतें.

**पारसीकांत अग्निदेवता** अति पूज्य मानिलेली आहे.

वेदान्तर्गत त्याची पूर्वपीठिका.

परंतु ह्याचें मूळ किंवा खरें इंगित पाहूं गेलें तर, तें आमच्या **आर्यहिंदूंच्या** धर्मातच सांपडतें. ह्मणजे तें प्रत्यक्ष **ऋग्वेदांतच** दृष्टिगोचर होतें.

अग्नि व अंगिरस.

आमच्या **ऋग्वेदांत**[1] अग्नीचा स्तुतिपाठ गातांना त्यास अनुलक्षून असें म्हटलें आहे कीं, हे अग्ने तूं **अंगिरांचा** मूळ पुरुष असून, देवांचाही देव आणि प्रियसखा आहेस. व तुझ्या आश्रयाखालींच मेधावी, कुशल, आणि तेजःपुंज असे **मरुत्** जन्मले.

दुसऱ्या एके ऋचेंत असें म्हटलें आहे कीं,

**त्वमग्ने प्रथमो अंगिरस्तमः कविर्देवानांपरिभूषासि व्रतम्। विभुर्विश्वस्मै भुवनाय मेधिरो द्विमाताशयुःक तिधाचिदायवे ॥ २ ॥**

(ऋ सं. अ १, अ. २, व ३२, मं. १, अ. ७, सू. ३१).

---

[1] अ. १, अ. २, व ३२, मं. १, अ. ७, सु. ३१.

हे अग्ने, तूं **अंगिरांचा** अगदीं मूळ पुरुष असून, देवांच्या साठीं आम्हांकडून यज्ञयागादि कर्मे करवितोस. तूं शक्तिमान् आणि बुद्धिवान् आहेस. तूं दोन[1] आयांपासूनच झाला आहेस, व अखिल प्राणिमात्रांच्या हितासाठीं तूं सर्वत्र गुप्त राहतोस.

अंगिरस, अथर्वण, व सोष्यन्त, यांचें साम्य.

**अंगिरस** आणि **अथर्वण** नांवाचे ऋषी तर अग्नीचीच पूजा करीत असत, व हेच **अथर्वण** नांवाचे ऋषी, **पारसिकांतील** अग्निपूजक जे **सोष्यन्त**, त्यांच्यांशीं अगदीं निकट साम्य पावत असल्याबद्दल, **प्रोफेसर मार्टिन् हौचें** मत[2] आहे. ह्यांनींच **वैदिक** धर्मांत थोडा-

---

१ दोन मातांचा पुत्र, असें विशेषण अग्नीला वेदांत ठिकठिकाणीं लाविलेलें असल्याचें आढळतें. अग्नीला दोन आयांचा मुलगा म्हणण्याचें कारण असें दिसतें कीं, 'अरणी' हें विस्तव पाडण्याचें एक महत्वाचें उपकरण असून, अशा दोन अरण्यांच्या घर्षणानेंच तो उत्पन्न होतो. आणि म्हणूनच त्याला द्विमाता म्हणतात.

2 "The Soshyantas or fire-priests, who seem to be identical with the Atharvans, are to be regarded as the real predecessors of Zarathustra Spitama, who paved the way for the grand religious reform, carried out by the latter.

* * * "These ancient sages, therefore, we must regard as the founders of the Ahura re-

( पुढें चालू. )

बहुत फेरबदल करण्याचें योजिलें, व त्याजवरच **झरथुष्ट्रस्तिमानें पारसीक** धर्माची इमारत बांधिली, असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

अहुरधर्म आणि वेदधर्म.

**अहुरधर्म** चांगला असल्याविषयीं, **पारसीकांचें यस्न**[2] नांवाचें जें धर्मपुस्तक आहे, त्यांत उल्लेख असून, हा धर्म **सोष्यन्त** नांवाचे जे पूर्वी निर्दिष्ट केलेले धर्माधिकारी सांगितले, त्यांजला प्रथम प्रकट केला; आणि तदनंतर **वेद** धर्माचा ( म्हणजे **देव** धर्माचा ) पाडाव करण्याकरितां, त्यांनींच तो प्रचारांत आणिला, अशाविषयीं त्याच धर्मपुस्तकांत वर्णन आहे. पुढें **झरथुष्ट्रानें**

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

ligion, who first introduced agriculture, and made it a religious duty, and commenced war aganist the Deva religion."

( Mortin Haug on the Parsi-religion. P. 251 ).

१ हा शब्द संस्कृत 'यज्ञ' शब्दाचाच अपभ्रंश आहे. व 'इझेष्ण' हें ह्याचें पेहेलवी भाषेंतील रूप होय.

२ यस्न. ( ५३,२. १२,७. )

3 " In the Gathas we find Zarathustra alluding to old revelations ( yas. 46, 6 ), and praising the wisdom of the Soshyantas, *i. e.* firepriests. ( 46, 3· 48, 12 ). He exhorts his party to respect and revere the *Angra* ( 43, 15. ), *i. e.* the Angiras of the Vedic

( पुढें चालू. )

देखील ह्याच मार्गाचें अवलंबन केलें, आणि आमच्या वैदिक धर्माविरुद्ध बरीच चळवळ चालविली.

आतां, अनंत कालापासून चालत आलेल्या वैदिक धर्माचा पाडाव करून, तदुद्भूत एक नवीनच धर्म कांहीं फेरफारानें स्थापन करण्याचा, आमच्या पुराण बंधूंचा काय हेतु असावा, याविषयींचेंही थोडेंसें दिग्दर्शन केलें पाहिजे.

त्यांच्या पूर्वकालीन इतिहासाचें दिग्दर्शन.

आमचे आर्यलोक हे प्रथमतः सर्वत्र एकत्र व एकजुटीनें असून, त्यांच्यांत कालान्तरानें दुफळी झाली असल्याविषयीं पूर्वीं सांगितलेंच आहे. आतां, ही दुफळी कित्येक महत्वाच्या सामाजिक आणि धर्मविषयक गोष्टींत, केवळ आपापसांत मतभेद झाल्याकारणानचें होऊन, तिचा शेवटीं इतका कांहीं अनिष्ट व शोचनीय परिणाम भोगावा लागला कीं, त्यामुळें आम्हांला कायमचे विभक्त होण्याचाच प्रसंग आला.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

Songs, who formed one of the most ancient and celebrated priestly families of the ancient Arians, and who seem to be more closely connected with the ante Zoroastrian form of the Parsee religion, than any other of the late Brahmanic families. "

( Martin Haug. P. 250. )

परंतु इतक्यावरच सर्व मजल येऊन राहिली नाहीं.

त्यांचा मतभेद.

तर ह्या विघातक मतभेदाचा प्रभाव यापेक्षांहीं दूरवर जाऊन, या दोन्हीं पक्षांत कालवशात् मोठें वितुष्ट पडलें, आणि त्यामुळें कांहीं दिवसांनीं त्या दोघांसही एकमेकाचें वर्चस्व सहन होतनासें झालें.

पुढें, ते आपापसांत एकमेकांचा पाडाव करण्याविषयीं

त्याचा परिणाम.

दीर्घ प्रयत्न करूं लागले, आणि दोघेही अगदीं अणीबाणीवर आले. परंतु शेवटीं आर्यहिंदूंचा पक्ष प्रबल असल्याकारणानें, ह्यांसच यश येऊन ह्यांचीच उत्तरोत्तर सरशी होत गेली. व यांच्या समोर सामनेवाल्यांचा बिलकूल टिकाव लागेनासा होऊन, त्यांचा अखेर पाडावच झाला.

ह्यामुळें, आर्यहिंदू हे त्यांचे उघडच शत्रू बनले; इतकेंच नव्हें तर, ते आमच्या वैदिक धर्माची अगदीं उघडपणें अवहेलना करूं लागले, आणि त्यावर त्यांनीं होतीं नव्हतीं तेवढीं निवडक विशेषणेंही लादलीं.

सामनेवाल्यांची, ह्मणजे आर्य इराणी लोकांची

आर्य हिंदुंचे मंत्र आणि यज्ञदाक्षिण्य, यांचा प्रभाव.

दुसरी आणखी एक अशी समज झाली होती कीं, मंत्र आणि यज्ञदाक्षिण्य, यांच्या योगानेंच आर्य हिंदूंस विजयश्री प्राप्त होते. सबब, यामुळेंही ते त्याज्य

आणि निंद्य आहेत; आणि अतएव त्यांचा कोणत्याही कारणानें संग करूं नये; असा त्यांनीं कायमचा निश्चय केला.

याप्रमाणें साम्नेवाल्यांचें आह्मां विषयींचें, व आमच्या धर्माविषयींचें भ्रांतिमूलक मत, दिवसानुदिवस अगदीं निष्कारण दूषित होत चाललें, आणि आह्मांवर असलेलें त्यांचें प्रेम अजिबात उडालें. त्यामुळें, ते आमच्या धर्माला अनेक प्रकारें नांवें ठेवूं लागले. इतकेंच नव्हे तर, आम्हीं ज्यांस सन्माननीय समजत असूं, त्यांस तें त्याज्य मानूं लागले, आणि आमच्या मतें जे निंद्य, त्यांस त्यांनीं पूजनीय ठरविलें. एतावता, आमच्या धर्मावर कांहींना कांहीं तरी आक्षेप घालून, त्यांनीं आमचा धर्म निंद्य ठरविला, आणि कित्येकांच्या नांवांत फेरबदल करून त्यांनीं आपल्या मनाचें कसें तरी समाधान करून घेतलें; व शेवटीं, आपला धर्म वैदिक धर्माचेंच एक लहानसें पिलूं किंवा प्रतिबिंब आहे, असें ते पक्केपणीं समजत असतांही, तो ह्या धर्माहून अगदीं भिन्न आहे, असें ते उघडपणें प्रतिपादन करूं लागले.

त्यांच्या धर्मावरील आक्षेप.

आमच्या **वैदिक** धर्माला, आम्हांपासून विभक्त झालेल्या प्रतिपक्षांनीं **देवांचा धर्म** असें नामधेय देऊन, आम्हां **आर्यहिंदूंस** ते देवपूजक अथवा देवांचे उपासक म्हणूं लागले,

वैदिक किंवा देवधर्म.

आणि खुद्द आपणांस **असुरधर्मानुयायी** असें नांव त्यांनीं दिलें. कारण, **झेन्द अविस्त** आणि इतर **पारशीधर्म** पुस्तकांत, **देव** शब्दाचा अर्थ पिशाच किंवा राक्षस असल्याचें दिसतें.

आम्ही देवादिकांची पूजा करितों, व त्यांजला वंद्य मानतों. त्याचप्रमाणें त्यांच्यासारखे यच्चावत् प्राणीमात्रावर परोपकार करणारे जे जे प्रचंड महात्मे आहेत, त्यांची देखील देवादिकांतच आम्ही गणना करितों. तसेंच, जेवढे जेवढे ह्मणून दुष्ट बुद्धीचे आहेत ते राक्षस कोटींतले समजून त्यांची आम्ही अवहेलना करितों, व त्यांस निंद्यही मानतों.

असुर किंवा झरथुष्ट्रधर्म.

याप्रमाणें, पहिल्या कोटींतल्या वर्गास महात्मे समजून, आम्ही त्यांजला **देव** अशी संज्ञा दिली. आणि दुसऱ्या कोटींतल्या वर्गास क्षुद्रधी मानून, त्यांजला आम्ही **असुरे** ह्मणूं लागलों.

अनादिकालीं, व **ऋग्वेदांत**, **असुर** शब्द हा स-

---

१ "असुराचाच" "अहुर" असा झेन्द भाषेंत अपभ्रंश झाला.

२ असुर हा शब्द कसा प्रचारांत आला, याविषयीं रघुवंशांत खालीं लिहिल्याप्रमाणें एक श्लोक आढळतो. त्यावरून, सुरापान किंवा मदिरापान ज्यांनीं केलें, त्यांजला सुर ह्मणूं लागले. आणि जे तिच्यापासून अलिप्त राहिले, ह्मणजे ज्यांनीं तिचा स्विकार केला नाहीं, ते असुर झाले.

( पुढें चालू. )

असुर शब्दाचा ऋग्वेद कालांतील व तदनंतरचा अर्थ.

न्मानवाचक आणि आदरार्थी असे. परंतु ऋग्वेद कालानंतर तो शब्द द्रोहबुद्धीनें, किंवा विपक्षवृत्तीनें, अथवा वैरभावानें लाविलेला असल्याचें आढळतें; आणि विशेषतः त्याचा अशा अभिप्रायाचा अर्थ अथर्ववेदांत व त्यानंतरच्या काळांत केलेला असल्याचें, उघड रीतीनें व्यक्त होतें.

ह्यावरून ऋग्वेदकालाच्या उत्तरार्धांत किंवा कदा-

---

( मागील पृष्टावरून पुढें चालू चालू. )

सुराप्रतिगृह्यादेवाः सुरा इत्यभिविश्रुताः । अप्रतिगृह्णातस्यादैतेया श्चासुरातस्तथा ॥ ३ ॥ स. ५४ श्लो ॥

ह्यावरून सुरापानाच्या संबंधानें भेदाभेद होण्यापूर्वी, असुर शब्द देवादिकांसही लावीत असत, असें दिसतें.

1 Dr Martin Haug, on the Parsee religion· ( P- P 226-227 ).

२ वेदकालाचा पूर्वार्ध, इसवी सनापूर्वी दहा बारा हजार वर्षांपासून समजला पाहिजे. मोक्षमुल्लरभट्ट असें म्हणतात कीं, भाषेच्या इतिहासावरून पाहतां, आर्य लोकांच्या अति प्राचीन अस्तित्वाचा काल इ० स० पूर्वी दहा हजार वर्षे पोहोंचविण्यास हरकत नाहीं. ( लंडन् प्राच्य परिषद. तारीख ५ सप्टेंबर सन १८९२ ).

आनीबिझांट म्हणते कीं, आर्यांच्या उत्पत्तीला समारें दहा लाख वर्षे होऊन गेलीं. ( भारतीय साम्राज्य. पूर्वार्ध. पु. २. पान १६।११६ ).

( पुढें चालू. )

विभक्त होण्याचा अनुमानिक काल.

पारसीकांनीं आमचा केलेला तिरस्कार.

चित् अखेरीस, आमचे **इराणी** बंधू आमच्यापासून विभक्त झाले असावेत; आणि तेव्हांपासूनच, **असुर** शब्दाचा निन्दाद्योतक अर्थ जारीनें प्रचारांत आला असावा, असें अनुमान होतें.

असो. तात्पर्य इतकेंच कीं, आम्हांस ( **आर्य-हिंदूंस** ) निन्द्य व तुच्छ समजून, आमचे **पारसीक** बंधू आम्हांला देवधर्मानुयायी म्हणूं लागले. आणि आम्ही ज्यांस नीच व क्षुद्र समजत असूं, त्या **असुरांस** त्यांनीं वन्द्य मानून त्यांचेंच नामधेय स्वीकारलें, व

---

( मगील पृष्ठावरून पुढं चालू. )

कित्येक विद्वान शोधकांचें आणखी असेंही ह्मणणें आहे कीं:—

"Thus the Rigveda, the most ancient work that exists in any language known at present, must have been composed between 6,000 and 4,0C0 B.C."

" The period from 10,000 to 6,000 B. C. is also not too much for the development of that primitive Aryan language which afterwards blossomed in the Rigveda hymns, and branched off in several dialects, such as Greek, Zend and Sanskrit."

१ वेदांत आणि आमच्या यच्चावत् दुसऱ्या धर्मग्रंथांत देव शब्दाचा अर्थ श्रेष्ठ किंवा अमानुषिक प्राणी असा आहे. परंतु पारसी धर्माच्या **विन्दिदाद** ग्रंथांत, देव म्हणजे पिशाच किंवा

( पुढें चालू. )

आपल्या स्वतःला देखील असुर[1] धर्मानुयायीच म्हणण्याचा परिपाठ पाडला. पुढें झेन्द भाषेंत असुराचाच **अहुर** हा अपभ्रंश झाला.

तद्विषयक झरथुष्ट्रधर्म पुस्तकांतील उल्लेख.

आमच्या **वैदिक** धर्माचा तिरस्कार करून तो सोडून दिल्याबद्दल, **यस्नं**[2] नांवाच्या **पारशी** धर्मपुस्तकांत स्पष्ट उल्लेख आहे. कारण, त्यांत एके ठिकाणीं अगदीं

---

( मागील पृष्ठावरून पुढ चालू. )

राक्षस होय. ' **विन्दिदाद** ' हा ' **वी दैवो दात** ' याचा अपभ्रंश असून, त्याचा अर्थ देवांच्या विरुद्ध किंवा त्यांच्या उत्सारणार्थ दिलेला, ( अथवा केलेला ग्रंथ ), असा होतो आणि झरथुष्ट्रधर्म तरी ' **वीदैवो** ' म्हणजे देवांच्या विरुद्ध असलेला धर्म, अशा अर्थानें मानण्याविषयीं त्या धर्मप्रतिष्ठापकांची आज्ञा आहे.

झरथुष्ट्रधर्माची अशी समजूत आहे कीं, देव शब्दांत जितकें म्हणून अमंगल, अपवित्र, आणि अशुभ आहे त्याचा समावेश होत असून, देवांची नेहमींच अन्याय व पाप करण्याची बुद्धि असते. परंतु, त्याच्या उलट असुर किंवा झरथुष्ट्रधर्माची स्थिति असल्याविषयीं ते मानतात.

१ " असुरा "चाच " अहुर " हा अपभ्रंश आहे. संस्कृतापासून ज्या इतर पोटभाषा निघाल्या आहेत, त्यांपैकीं कित्येकांत " स " च्या ठिकाणीं " ह " चा आदेश केलेला दृष्टीस पडतो. सोम ( रसाच्या ) ऐवजी पारशीधर्मांत होम शब्दाचा उपयोग केलेला असल्याचेंही आढळून येतें.

२ यस्न शब्द यज्ञ शब्दाचा अपभ्रंश आहे.

उघड रीतीनें, व कोणत्याही प्रकारचा पडदा न ठेवितां, असें साफ म्हटलें आहे कीं, अतःपर मी देवधर्माचा त्याग करून देवांशीं शत्रुत्वानें वागेन. आणि झरथुष्ट्राचा अनुयायी होऊन, अहुर (असुर) धर्माचा स्वीकार करीन.

नांवाचा सदर मोबदला व त्यांच्या मनाचें समाधान.

एतावता, आर्यहिंदूंचें तेवढें वाईट, आणि आर्य-इराण्यांचें तेवढें चांगलें, इतक्याच हेतूनें, किंवा अशा प्रकारचा मनावर कांहींना कांहीं तरी संस्कार व्हावा एतदर्थच, आमच्या साम्नेवाल्यांनीं ( आर्य इराण्यांनीं ) फक्त नांवाचाच सदर मोबदला करून, आपलें तातपुरतें समाधान करून घेतलें असल्याचें दिसतें.

हिंदु आणि झरथुष्ट्र धर्माचें साम्य.

असो. इतकें झालें तरी, आमचे पारसीक बंधु आमच्याच शाखेंतले असल्याकारणानें, त्यांच्या आणि आमच्या (हिंदु) धर्मांत, अन्य कित्येक गोष्टींत बरेंच साम्य राहिलें असल्याचें दिसून येतें.

आतां, हें साम्य म्हटलें म्हणजे १ पौराणिकआख्या-

---

१ यस्न ( १२, १. )

" I cease to be a Deva *worshipper*. I profess to be a Zoroastrian Mazdagasna ( worshipper of Ahuramazda,) an enemy of the Devas, and a devotee to Ahura. „ * * *

( Dr Martin Haug, on Parsee religion. P.P. 163/164.)

यिकांत, २ यज्ञविधींत, आणि ३ कर्मकांडांत दृष्टिगोचर होतें, सबब त्याबद्दलचा क्रमशः विचार करूं.

## पौराणिक आख्यायिकांतील साम्य.

वेदकालांत इन्द्राला देवांचा देव अथवा देवाधिपति मानीत असत. परंतु झरथुष्ट्रधर्मांत देवाला पिशाच्च समजत असल्याकारणानें, हा आमचा देवाधिदेव तद्धर्मियांचा **पिशाचाग्रणी** झाला, यांत नवल तें कोणतें ?

इन्द्र.

आमचा जो **शर्व** ( शिव ) तो त्यांचा **शैर्वदेव** होय.

शर्व.

आमचे **अश्विनीकुमार** जे **नासत्य**, त्यांचें साम्य **नौनहैथ्य** देवांशीं असल्याचें दिसून येतें. हे देवांचे वैद्य असल्याविषयीं सुप्रसिद्धि आहे.

नासत्य.

आमच्या **झरथुष्ट्र** बंधूंनीं **आर्यहिंदूंच्या** देवगणास पिशाच्च कोटींत घातलें खरें. तथापि, कांहीं कांहींस ते देव कोटींतलेच समजत असून, त्यांस ते **यजत** ( यजत्र ) म्हणत. हेच **झिंद अविष्टेंतील**[1] ( इझेड ) किंवा स्वर्गदूत होत.

त्यांपैकीं सर्वांत श्रेष्ठ असा **मित्र** होय. हाच सर्व

---

१ ज्ञानावस्था हा यांतील मूळ शब्द होय. ज्ञा, व जा, हे संस्कृत शब्द असून, त्यांचा अर्थ जाणणें किंवा व्याख्या असा होतो. आतां अविष्टा हा शब्द " अवस्था " शब्दापासूनच झाला असून, त्याचा अर्थ संहिता होय. ( मार्टिन् हौकृत पारसीक धर्म. पान १३२ पहा.)

मित्र. जगाचा नियंता आणि अखिल विश्वाचा चालक असून, तो आमच्या वेदकालांतील मित्राशीं साम्य पावतो. ह्यालाच अनुलक्षून असलेली ऋग्वेदांतील ऋचा महत्वाची व ध्यानांत ठेवण्यासारखी आहे, सबब ती याखालीं देतों.

मित्रोजनान् यातयति प्रजानन्
मित्रोदाधार पृथिवी मुतद्याम्
मित्रः कृष्टी रनि मिषा भिचष्टे * * *
प्रसामित्रमर्तो अस्तु प्रयस्वान्यस्त
आदित्य शिक्षति व्रतेन
नहन्यते नजीयते त्वोतोनैनमहो
अश्नोत्यंति तो न दूरात् ॥

( ऋग्वेद. मं. ३.५९. )

सदरहू ऋचांचा भावार्थ असा आहे कीं, मित्र हा त्याचा प्रभाव. प्राणिमात्रास आपापल्या उद्योगाला लावितो. तो पृथ्वी आणि स्वर्ग यांचा केवळ आधारस्तंभच आहे. कारण, त्याच्या आकर्षणानेंच आकाशांतील गोलांची सुखरूप गति चालते, व यात्रा होते. आणि म्हणूनच त्याला घृताचा हविर्भाव द्यावा. हे मित्रा, जो मनुष्य तुझ्या नियमांस अनुसरून वर्ततो, आणि त्याचें

यत्किंचित् देखील उल्लंघन करीत नाहीं, त्याला त्रिपुल सुख प्राप्त होतें. कारण, त्याला कोणी मारीत नाहीं, व तो कोणाकडून जिंकलाही जात नाहीं. आणि म्हणूनच त्याला लांबचें किंवा दूरचें, म्हणजे कोणत्याही बाजूकडून, दुःखच प्राप्त होत नाहीं.

अर्यमा.

आमच्या **वेदांतील अर्यमा** नांवाची जी देवता आहे, ती **झिन्दअविष्टा** नामक **झरथुष्ट्रधर्म** पुस्तकांतील **ऐर्यमा** नांवाच्या देवतेशीं निकट साम्य पावते.

भग.

**भग** नांवाची दुसरी एक देवता देखील पूजनीय असल्याविषयीं, **ऋग्वेदांत** उल्लेख आहे. ही **मित्र, अर्यमा,** आणि **अदिति,** यांच्या वर्गांतील असून, **झरथुष्ट्र** धर्मांत ह्या **भगदेवतेला** देव, किंवा दैव, असें मानतात.

अरमति,

**अरमति** आणि **अर्मैति** या दोन्ही देवतांचें देखील असेंच साम्य आहे.

आमची **वायु** देवता हीच **झिन्द अविष्टेंतील वयु** देवतेशीं साम्य पावते.

वृत्रघ्न.

**वेदकालांतील** आमचा **वृत्रघ्न** हाच **झरथुष्ट्र** धर्मांतील **विरिथ्रेघ्न** होय. आणि तो शत्रूंचा नाश करणारा किंवा जय देणारा, अशा प्रकारच्या सद्भावानें या ठिकाणीं मानलेला आहे.

---

१ बद्रीराम. पृष्ट २१.

येथें दुसरी एक गोष्ट विशेष ध्यानांत ठेवण्यासारखी असून, ती फार महत्वाची आहे. ती ही कीं, वृत्रघ्न हें नांव इन्द्राचेंच असतांही, झरथुष्ट्र धर्मांत इन्द्रावर यच्चावत् वाईट गुणांचा, व सर्व दोषांचा आरोप करून, त्याला पिशाचराजा म्हणून ही संज्ञा दिली. परंतु तोच इन्द्र जेव्हां वृत्रघ्न नांवानें पुढें आला, तेव्हां तो लागलीच सन्मानाप्रत पावला, आणि त्याची देवकोटींत सुद्धां गणना झाली.

यमराजा.

आमचा यमराजा हा पारशीधर्मांत यिमक्षेत्त यां नांवानें सुप्रसिद्ध असून, ह्याचाच जामशिद् असा अपभ्रंश झाला आहे.

तृत.

तृत ह्याचें कथन अथर्ववेदांत केलेलें दिसत असून, तो व्याधींचें उपशमन करीत असल्याविषयीं, त्याची सुप्रसिद्धि आहे. तोच मनुष्यांस दीर्घायुषी करितो, आणि यच्चावत् दुष्कृतांचेंही निवारण करून टाकतो. झिन्दअविस्तेंत ह्यालाच थ्रित अशी संज्ञा आहे, व अहरिमानें जेवढे म्हणून रोग उत्पन्न केले, त्या सर्वांस बरें करणारा असा साम कुलांतील हा प्रथमचाच वैद्य होय.

वैवस्वत हा विवस्वत् याचा पुत्र असून, विवंध्वत्

१ मं. ६. ११३–१.

२ यजुर्वेद. तैत्तिरीय संहिता. १, ८, १०, २.

३ ऋग्वेद. ८, ४७, १३.

वैवस्वत आणि विवस्वत्.

आणि विवन्हौ हीं त्याच शब्दांचीं रूपांतरें झालेलीं असल्याचें झिन्द-अविस्तावरून दिसून येतें.

त्रैतन अप्त्य.

वेदांत त्रैतन म्हणून ज्याचें वर्णन आहे, त्यानें एक प्रचंड राक्षस मारिला असल्याविषयीं आख्यायिका आहे. ह्याचें उपनांव किंवा गोत्र अप्त्य असें होतें. आणि झिन्दअविस्तांत थ्रैतोन अथ्व्यो हें ह्याच शब्दांचें रूपान्तर झाल्यासारिखें दिसतें.

दानव.

दानव शब्दाचा उपयोग, वेदांत आणि झिन्द-अविस्तांत, एकाच अर्थानें केलेला असून, दोन्ही ग्रंथांत दानवांस शत्रू म्हणूनच मानिलेलें आहे.

असो. याप्रमाणें, पौराणिक आख्यायिकांत आणि नामधेयांत, अनेक प्रकारचें साम्य दृष्टिगोचर होतें.

## यज्ञविधींतील साम्य.

इष्टि.

इष्टि म्हणजे हवन किंवा नैवेद्य होय. हा शब्द " यज् " धातूपासून निघाला असून, तो झिन्द अविस्तांतील ईस्टि शब्दाशीं साम्य पावतो.

आहुति.

त्याचप्रमाणें आहुति शब्दाचेंही आझूइति शब्दाशीं अगदीं निकट साम्य आहे.

---

१ वन्दिदाद. भाग २ पहा. वन्दिदाद हा शब्द " वी देवो दात " यावरून झाला असून, त्याचा अर्थ देवांविरुद्ध, म्हणजे राक्षसांविरुद्ध, दिलेलें किंवा म्हटलेलें, अथवा लिहिलेलें, असा होतो.

तसेंच, याज्ञिक क्रिया चालविणारा पुरोहित आणि ऋत्विज् वर्ग, यांच्या नांवांतही दोन्ही धर्मांत विशेष साम्य दिसून येतें. कारणं, आमच्यांतील होता हाच झरथुष्ट्र धर्मांतील झौता असून, अध्वर्यु हा रथ्वी होय. ह्या रथ्वीलाच हल्लीं रस्पि ह्मणतात.

होता आणि अध्वर्यु.

शिवाय, अग्निपात्र धरणारा जो अग्निध्र तोच त्यांचा अतरीवक्षो या नांवानें सुप्रसिद्ध आहे, व त्याच्याकडे देखील हेंच काम सोंपलेलें असतें.

अग्निध्र.

आमच्या ज्योतिष्टोम आणि अग्निष्टोम यज्ञविधींतील कित्येक क्रिया झरथुष्ट्र धर्मांतील इझ्नेष्णे नामक विधीशीं बहुतेक साम्य पावतात. आणि आमचा पुरोडाश हाच त्यांचा दरुण असून, आमची उदकशान्त हीच त्यांचा झौथ्रविधी होय. पुरोडाश म्हणजे यज्ञांत देवतांस अर्पण करण्याकरितां केलेल्या एका प्रकारच्या भाकऱ्या किंवा चपात्या होत. ह्या प्रत्येक देवतेस दोन दोन मंत्र म्हणून देण्याच्या असतात.

ज्योतिष्टोम, अग्निष्टोम, पुरोडाश, व उदकशान्त.

आमची दर्शपूर्णमासेष्टि ही पारसीकांच्या दरुण विधीशीं पुष्कळ प्रकारें मिळती आहे.

दर्शपूर्णमासेष्टि.

त्याचप्रमाणें, चातुर्मास्येष्टींत देखील जो कांहीं विधि आम्हां ब्राह्मणांस करावा लागतो,

चातुर्मास्येष्टि.

तोच पारसीक हे **गहान्बर** नामक विधींत करतात. मात्र भेद म्हणून इतकाच कीं, आमचे **ब्राह्मण** हे मेध्यपशूची वपा, किंवा अन्य भाग, अग्नीला अर्पण करितात; आणि **पारशी** लोक तसें करीत नाहींत. ते मेध्यपशूचा कोणताही भाग अग्नींत न टाकतां, तो फक्त पवित्र समजून ते भक्षितात. असो. अशा प्रसंगीं, मेध्यपशूचें मांस भक्षण करण्याविषयीं **ब्राह्मणांस** सुद्धां परवानगी आहे.

## कर्मकांडांतील साम्य.

अग्निपूजा.

आम्ही **हिंदू** लोक ज्याप्रमाणें **अग्नीला** पवित्र मानून त्याची पूजा करितों, त्याचप्रमाणें **पारशी** लोक देखील त्याला अति पवित्र मानतात; त्याची अनेक प्रकारच्या सुगंध द्रव्यांनीं पूजा करितात; त्यांत खंडोगणती चंदन जाळतात; आणि तो आपल्या घरांतून नाहींसा न होण्याविषयीं, किंवा तो न विझण्यासाठीं हरएक प्रकारें तजवीज राखतात.

गोमातापूजन व पंचगव्य.

**आम्हीं** ज्याप्रमाणें **गाईला** पवित्र मानून, तिला पुजितों, व **गोमाता** समजतों, त्याचप्रमाणें **पारशी** लोक देखील समजतात. आम्ही गाईचें मूत्र आणि शेण पवित्र मानून, त्यांनीं घरांत सडा सारवण करितों, तसें तेही लोक करितात. गाईचें दूध, दही, तूप, मूत्र, आणि शेण, हे पांच

पदार्थ एकत्र करून, त्यांचें आम्ही **पंचगव्य** बनवितों, आणि एकंदर बाह्य व अन्तःशरीरशुद्ध्यर्थ तें पोटांतही घेतों. आमचे **पारसीक** बंधु देखील गाईच्या मूत्राचा पोटांत घेण्याकडे, किंवा शरीरशुद्ध्यर्थ अंगाला लावण्यासाठीं, उपयोग करितात. ह्या गोमुत्राला ते **गोमेझ्** असें म्हणतात.

पंचगव्याचा युरोपखंडांत उपयोग.

हा पंचगव्याचा प्रकार पाहून, व आम्हीं **आर्य** लोक गोमूत्राचें प्राशन करितों असें ऐकून, **पाश्चात्यलोक** आणि त्यांचें सूक्तअसूक्त गोष्टींत केवळ अविचारानेंचअनुकरण करूं इच्छिणारे कित्येक आमचे स्ववर्गीय बंधुजन, हे सखेदाश्चर्य तोंडांत बोटें घालतील. परंतु ह्या बरोबर त्यांनीं हें देखील लक्षांत ठेवावें कीं, गोमय आणि गोमूत्र हीं शरीरशुद्धी साठीं, सांप्रतकाळीं एकोणिसाव्या शतकांत, सुधारलेलें म्हणून म्हणविणाऱ्या **यूरोपखंडांत** सुद्धां, तिकडील जानपद-वैद्य अगदीं जारीनें प्रचारांत आणितात.

**यज्ञोपवीत** धारण करण्याविषयीं ज्याप्रमाणें आम्हांला

---

१ वन्दिदाद. फरगर्द ( स्कन्द ) नववा पहा. हा प्रकार युरोपांत देखील सुरू आहे.

" Such means as cow-dung, and cow-urine, are applied also on the Continent of Europe by peasant physicians, up to our time. "

( Martin Haugh. Dr. Phil. vide His Parsee religion. P. 242 ),

यज्ञोपवीत. धर्माज्ञा आहे, त्याचप्रमाणें पारशी लोकांसही असल्या कारणानें, तें यज्ञोपवीत किंवा जानवें घालितात, आणि त्याला ते कुस्ती म्हणतात. तें पांचव्यां किंवा आठव्या वर्षांपासून तों सोळाव्या वर्षांपर्यंत धारण करण्याविषयींची मर्यादा आम्हां हिंदूंस सांगितलेली असून, पारशीधर्मांत हा उपनयनविधि सातव्या वर्षीच होतो.

आतां, झरथुष्ट्राचा काल, आणि त्यानें प्रतिष्ठापित केलेल्या धर्मांतील मुख्य ग्रंथ, यांविषयींचें थोडेंसें विवेचन करून, हा लेख आटपता घेतों.

झरथुष्ट्राचा काल. झरथुष्ट्राच्या कालाच्या संबंधानें बराच मतभेद असल्याचें दिसतें. ग्रीक आणि रोमन लोकांच्या मतें तो फारच प्राचीन असावा. कारण लिडियाचा रहिवाशी झान्थॉस हा अगदीं प्राचीनतम ग्रीक लेखक असून, तो इ० स० पूर्वी ४७० व्या वर्षी उदयास आला होता. हा झरथुष्ट्राच्या कालाविषयीं असें लिहितो कीं, तो ट्रोजन लढाईच्या पूर्वी सहाशें वर्षे उदयास आला असावा. म्हणजे ह्याच्या मताप्रमाणें त्याचा उदयकाळ इ० स० पूर्वी १९०० वर्षे, किंवा त्या सुमारास असल्याचें होतें.

---

१ भारतीय साम्राज्य. पूर्वार्ध. पुस्तक सहावें. भाग ३५ वा. पान १ लें. टीप १–२–३ पहा.

२ झरथुष्ट्राचाच झरदोष्ट, किंवा जडदोस्त, अथवा दुस्तूर, असा अपभ्रंश झाला आहे.

आरिस्टॉटल् आणि युडोक्सस् यांच्या समजुती-प्रमाणें, तो प्लेटोपूर्वी देखील सहा हजार वर्षे झाला असावा; व कांहींच्या मतें तो ट्रोजन युद्धांपूर्वी पांच हजार वर्षे उदयास आला असावा.

विरोसोस् हा बाबिलोनिया देशाचा इतिहासकार होऊन गेला. तो असें म्हणतो कीं, झरथुष्ट्र हा बाबिलो-नियाचा राजा असून, एका राजघराण्याचा मूळपुरुषही होता. ह्यांनीं इ० स० पूर्वी २२०० वर्षांपासून २००० वर्षेपर्यंत राज्य केलें.

याबाबतींत पारशी लोकांची अशी समजूत आहे कीं, झरथुष्ट्र हा डरायस्चा बाप जो हिस्टास्पीस् त्याच्या वेळीं, म्हणजे इ० स० पूर्वी ५५० वर्षे उदयास आला होता. परंतु ही समज चुकीची असल्याविषयीं, कित्येक शोधक पंडितांचें म्हणणें आहे.

सुप्रसिद्ध विद्वन्मणि मार्टिन्हौ यांच्यामतें तो इ० स० पूर्वी १००० वर्षे होऊन गेला असावा, व ह्यानंतरच्या काळांत तो झालाही नसावा. इतकेंच नव्हें तर, तो मोझेस्-चाही समकालीन असल्याविषयीं त्यांचा पूर्ण अभिप्राय आहे.

पारसी लोकांचीं धर्मपुस्तकें.

पारसीकांच्या धर्मपुस्तकांस झिन्दअविष्टा म्हणतात, व पल्लवी भाषेतल्या पुस्तकांत तर हा शब्द उलटा, म्हणजे अविष्टा-झिन्द असा लिहिण्याचा प्रचार आहे.

यासंबंधानें **पारशी** धर्माधिकाऱ्यांची अशी समज आहे

झिन्दअविष्टा.

कीं, **अविष्टा** म्हणजे मूळग्रंथ असून, **झिन्द** म्हणजे **पल्लवी** भाषेंत त्याचें केलेलें भाषांतर होय. आतां ही कल्पना फक्त कांहीं अंशानें मात्र बरोबर आहे.

परंतु **झिन्दअविष्टे**चा खरा अर्थ म्हटला म्हणजे मूल-

त्याचा अर्थ.

ग्रंथाचें ज्ञान, अथवा त्याजवरील टीका, असा होय. कारण, **झिन्द** हा शब्द 'ज्ञा' (जा= जाणणें, या) धातूपासून झाला असून, **अविष्टा** हा शब्द 'अवस्था' शब्दाचें रूपान्तर आहे. तेव्हां "**अवस्था**" शब्दाचा अर्थ, मूळअवस्थेंत दिसणारा किंवा असणारा ग्रंथ, असा असल्या कारणानें, "**झिन्दअवस्था**" म्हणजे मूळ ग्रंथावरील टीका, प्रदीपिका, किंवा व्याख्या होय.

ज्याप्रमाणें आमच्या हिंदूंच्या धर्मग्रंथांत **श्रुति** आणि

पारशी धर्मांतील श्रुति आणि स्मृति.

**स्मृति** असा भेद आहे, त्याचप्रमाणें **पारसिकांच्या** धर्मग्रंथांतही आहे. **श्रुति** शब्दानें **वेदांचा** बोध होतो, व **स्मृति** शब्दानें **धर्मशास्त्र** समजण्याचें आहे.

**विस्परद्** आणि **यस्न** हे **पारसिकांचे** **वेद** किंवा

---

१ श्रुतिस्तुवेदो विज्ञेयो ।
२ धर्मवाक्यं तुवै स्मृति ॥

यस्न आणि विस्परद् हे पारसिकांचे श्रुतिग्रंथ असून, वन्दिदाद हे त्यांचे स्मृति ग्रंथ होत.

यस्न व विस्परद् किंवा, श्रुतिग्रंथ आणि वन्दिदाद किंवा स्मृतिग्रंथ.

श्रुतिग्रंथच होत. झिन्द भाषेंतील विस्पेरॅतवो या शब्दांपासूनच विसपरद् हा शब्द झाला असून, त्याचा अर्थ सर्वांत श्रेष्ठ किंवा मुख्य असा होतो. ह्याचे एकंदर तेवीस अध्याय आहेत, आणि यस्नांत सांगितल्याप्रमाणेंच यज्ञविधि, उदकशान्त, हविर्भाग, पुरोडाश, होम ( किंवा सोम ) पान, इत्यादि प्रकार ह्यांतही दिसून येतात.

आतां, ऋतूंला[1] मुख्य मानण्याचें कारण असे कीं, ह्या सृष्टीच्या उत्पत्तिक्रमांत प्रथमतः आकाश ह्मणजे अवकाश किंवा काल हाच निर्माण झाला असून, तदनंतर वायु, अग्नि, आप् (पाणी), आणि पृथ्वी, वगैरे क्रमशः उत्पन्न झाले. आणि ह्मणूनच कालाला मुख्य अथवा श्रेष्ठ अशी संज्ञा दिली, व ऋतु हा कालाचाच विभाग असल्या कारणानें, त्यालाही श्रेष्ठ मानिलें.

सदरीं लिहिल्याप्रमाणेंच विश्वाच्या उत्पत्तीचा क्रम असल्याविषयीं, खालीं लिहिलेल्या श्रुतिवाक्याचें प्रमाण आहे:—

**आत्मनः आकाशः संभूतः ।**
**आकाशाद्वायुः । वायोरग्निः ।**
**अग्नेरापः । अद्भ्यः पृथिवी ।**
**पृथिव्या ओषधयः ।** ( उपनिषद्. )

[1] हा शब्द संस्कृत ऋतु शब्दापासून झालेला आहे.

अस्मो. पारसिकांचा दुसरा श्रुतिग्रंथ म्हटला म्हणजे

यस्न ग्रंथाचे पौराणत्व.

यस्न[1] होय. हा शब्द संस्कृत "यज्" धातूपासून झाला असून, त्याचा अर्थ पूजा किंवा हवन करणें, असा होतो. ह्याचे बहात्तर अध्याय आहेत, आणि हा विस्परद्पेक्षां, किंबहुना पारसिकांच्या सर्व धर्मग्रंथांतही विशेष पुराणा असल्याविषयीं, प्रसिद्ध जर्मन् पंडित मार्टिन् हौग यांचें मत आहे.

गाथा.

यस्नांत कांहीं प्राचीन व कांहीं अर्वाचीन असे ग्रंथ आहेत; आणि पारसीक धर्मग्रंथांत गाथांच्या इतका पुराणतम ग्रंथच नसल्याविषयीं कित्येक शोधकांची समजूत असल्या कारणानें, त्या प्राचीन ग्रंथांतच मोडतात.

त्यांचे छन्द.

"गै" म्हणजे गाणें, या संस्कृत धातूपासुन गाथा हा शब्द झाला असून, ह्यांतील छन्द वेदांतल्या ऋचांच्या छंदाप्रमाणें आहेत. ह्या गाथा मुख्यत्वेंकरून पांच आहेतः १ गाथा अहुणवैति, २ गाथा उस्टवैति, ३ गाथा स्पेंटमैन्युस्, ४ गाथा वोहुक्षत्रेम्, व ५ गाथा वहिस्टोइस्टिस्.

यष्ट.

यष्ट नामक ग्रंथांत एकाच ईश्वराची प्रार्थना सांगितली आहे. हा शब्द आमच्या इष्टि

---

[1] यज=यज्ञ करणें. आणि 'न' हा भाववाचक नाम साधण्याकरितां, आगम शब्दाला लावण्याचा झिन्द भाषेंत परिपाठ आहे.

शब्दापासूनच झाला असून, होमयष्ट म्हणून जो एक यस्नाचा भाग आहे, त्यांतील होम शब्द हा आमच्या वेदांत वारंवार आढळणाऱ्या सोमशब्दाशीं, अर्थानें व क्रियेनें, साम्य पावतो. ह्या यष्टाचे चोवीस भागच हल्लीं उपलब्ध आहेत.

वन्दिदाद किंवा धर्मशास्त्र.

वन्दिदाद हा पारसिकांचा स्मृतिग्रंथ[1] किंवा त्यांचें धर्मशास्त्र होय. ह्यांत आचार, विचार, संप्रदाय, धर्मसंहिता, कार्याकार्यनियम, दंड, शिक्षा, व प्रायश्चित्त, इत्यादींचा विचार केलेला आहे.

वन्दिदाद व त्यांतील विषय.

वन्दिदादचा कांहीं भाग नष्ट झाला असून, त्याच्या अवशिष्ट राहिलेल्या भागाचे फक्त बावीस अध्याय मात्र उपलब्ध आहेत, व त्यांस फर्गर्द असें म्हणतात. ह्याचे झरथुष्ट्रस्पितमाशिवाय आणखीही अनेक प्रवर्तक असल्याचें दिसतें.

वन्दिदादचे पहिले तीन अध्याय प्रस्तावनेदाखल असून, त्यांत बहुतकरून पौराणिक कथाभाग आहे.

---

1 "Whilst Yâsna and Visparad represent the Vedas of the Parsees, their Vendidad corresponds exactly to the *Smritis* or collections of customs, observances, laws, penalties, and fines, which form the groundwork of the so-called Dharma Shastra."

( Professor Martin Haug, on the Parsee religion. P. P. 220/221 ).

ह्यांत आर्यांच्या ज्या मोठ्या देशांत झरथुष्ट्रानें आपल्या धर्माचा प्रसार केला, त्यांचें वर्णन आहे. तसेंच ह्यांत यिमराजाचें ( ह्मणजे यमधर्मराजाचें ) ही थोडेंसें कथानक आहे, आणि शेतीची विशेष महत्वी चांगल्या प्रकारें सांगितली आहे. चारपासून सतरापर्यंतच्या अध्यायांत, व्यवहार, विधिनिषेध-नियम, धर्मव्यवस्था, नित्य-नैमित्तिक कर्म, आश्रमधर्म, आणि आन्हिकाचार, इत्यादि सांगितले आहेत. व अठरापासून बावीसपर्यंतचे अध्याय परिशिष्टादाखल जोडलेले आहेत.

पारसिकांचे फौजदारी व दिवाणी कायदे.

चवथ्या फर्गर्दांत ( अध्यायांत ), दिवाणी आणि फौजदारी कायद्यांचें थोडेंसें दिग्दर्शन केलेलें दृष्टीस पडतें. आतां, ह्या दिवाणी कायद्याची हिंदुआर्यांच्या दिवाणी कायद्याशीं तुलना केली तर, फारच अन्तर दिसून येतें. कारण, आमच्या दिवाणी कायद्यांत पुष्कळ तपशीलवार विवेचन पद्धतशीर रीतीनें केलेलें असल्यामुळें, तो सुधारणेच्या उच्च शिखराप्रत जाऊन पोहोंचल्यासारखा भासतो. इतकें विवेचन वन्दिदाद ग्रंथांत आढळून येत नाहीं.

त्यांची तुलना.

तोंडचा करार मोडला असतां, त्याला तीनशें फटक्यांची शिक्षा सांगितली आहे. ही अपराधाच्या स्वरूपाच्या मानानें भारी दिसते. तसेंच दुसऱ्या कांहीं अपराधांसही अशाच प्रकारच्या वाजवीपेक्षां

फाजील कडकपणाच्या शिक्षा सांगितल्या आहेत. त्याव-रून फौजदारी कायद्यांत हिंदुधर्मशास्त्राप्रमाणेंच ह्यांतही विशेष गौणत्व भासमान होतें.

अमो.* आतां, झरथुष्ट्रानें ज्या धर्माची प्रतिष्ठापना केली, त्याचें मुख्य तत्त्व कोणतें होतें, याबद्दलचाच विचार करणें राहिला आहे. सबब तद्विषयक थोडेसें विवेचन करून, हा भाग पुरा करितों.

झरथुष्ट्र स्पितमाच्या धर्माचीं मूलतत्वें.

झरथुष्ट्र स्पितम हा एकेश्वर मतवादी असे. तथापि, त्याच्या पूर्वी जे सोष्यन्त नांवाचे अग्निपूजक होऊन गेले, ते अनेक देवतांस मानीत, व त्यांची पूजाही करीत. ह्या सर्व देवतांस त्यांनीं अहुर असें नामधेय दिलें होतें. आणि अहुर ( असुर ) ह्मणजे देवां-विरुद्ध असलेले प्राणी, अशी त्यांची समज असे.

त्याचा अद्वैत वाद.

पुढें, अशा प्रकारचा अनेक देवतार्चनविधि झरथुष्ट्राला पसंत न होऊन, त्यानें हें बव्हीश्वर मताचे अजिबात बंडच मोडून टाकिलें, आणि त्या ऐवजी एकेश्वरी मताची संस्थापना केली. तदनंतर, त्यानें ह्या जगत्प्रभूला अहुरो मझ्‌दौ, ह्मणजे मझ्‌दौ नामक अहुर, असें नांव दिलें. व याचाच पुढें अहुरमझ्‌द, ओरमझ्‌द आणि होरमझ्‌द असा अपभ्रंश होऊन, सांप्रतकाळीं होरमस्‌जी असेंच त्याचें रूपान्तर झालेलें

त्यानें ईश्वराला दिलेलें नामधेय.

आहे; व ज्याप्रमाणें देवादिकांचीं नांवें आपण आपल्या मुलांबाळांस ठेवितों, त्याचप्रमाणें **पारसी** लोकांत देखील **होरमसजी** हें ईश्वराचें नांव समजून, तेंच ठेवण्याचा सर्वत्र प्रचार आहे.

**अहुरमझ्द** हें संयुक्त नांव **असुरमेधा** या **संस्कृत** शब्दांपासून झालेलें आहे. आणि त्याचा अर्थ **देवांवि-रुद्ध** असणारा बुद्धिमान् ( **प्रभु** ), असा होतो.

**झरथुष्ट्रस्पितम** हा एकेश्वरी मतांतला होता खरा.

या जगांतील असमतेविषयीं त्याचें मत.

तथापि, त्याचें दुसरें असें एक मत असें कीं, ह्या अखिल सृष्टीची रचना किंवा उत्पत्ति, केवळ दोन तत्त्वांच्या संयोगानेंच झालेली आहे. इतकेंच नव्हे तर, हीं दोन्हीं तत्त्वें विपरीत गुणधर्मी आहेत; ह्मणजे एक वाईट असून दुसरें चांगलें आहे. आणि त्याच कारणानें, या जगांत विषमता, सुख, दुःख, पुण्य, पाप, श्रीमान्, गरीब, धट्टाकट्टा, लंगडापांगळा, इत्यादि नानाप्रकारची असमता, ठिकठिकाणीं, किंबहुना सर्वत्रच दृष्टिगोचर होते.

---

# भाग ४१ वा.

## बौद्धधर्म.

बौद्धधर्म म्हणजे वेदांचें एक लहानसें पिलूं.

बौद्धधर्म हा वेदधर्माचेंच एक लहानसें पिलूं[1] होय. किंबहुना निरीश्वरमताशिवाय ह्यांतील बाकीचीं यच्चावत् नीतितत्त्वें वेदधर्मांतूनच उचलून, तीं पर्यायानें बौद्धधर्मांत सामील केलीं आहेत, असेंही म्हणण्यास बिलकूल प्रत्यवाय नाहीं.

नूतन मत व कर्मकांडाचा तिटकारा.

आमच्या वेदकालीन आर्यांचा भर विशेषतः कर्मकांडांतच असे. कारण, त्यांच्या प्रथमावस्थेंत, किंवा तत्कालीन समाजाच्या त्या बाल्यावस्थेंत, ह्या भासमान होणाऱ्या पंचम-

---

1 "Oldenberg had proved, out of the Buddhist scriptures, that Buddhism was a true product of Bràhman doetrine and discipline. Jacobi shows that both 'Buddhism and Jainism must be regarded as religions developed out of Bràhmanism not by a sudden reformation, but prepared by religious movement going on for a long time.'". (Dr. Hunter's Indian Empire .P. 161).

"It (Buddhism) started from Bràhmanical doctrines."

(Do. Do. P. 148 secood Edn.)

**द्याभूतांचा** प्रभाव त्यांच्या दृष्टिगोचर वारंवार होई; आणि अतएव तज्जनित संस्कार त्यांच्या हृत्पटिकेवर क्षणोक्षणीं घडून येत. त्यामुळें, होम किंवा हवन, मेध किंवा इष्टि, स्तोम अथवा सोम, इत्यादि नानाविध विधींनीं ते ह्या **पंचमहाभूतांचें** अहर्निशीं तर्पण करीत, आणि अनेक **दिक्पालांस** सदैव संतुष्ट राखीत.

त्यामुळें वैदिकधर्मांत झालेली दुफळी, व त्याचा परिणाम.

परंतु, हा निरंतरचा कर्मविधि, किंवा हें रोजचें कर्मकांड, आमच्या पूर्वजांपैकीं कित्येकांस अगदीं नापसंत झालें. इतकेंच नव्हें तर, ते ह्या नेहमींच्या कर्मकटकटीला बरेच कंटाळले. सबब, तत्संबंधानें ते नाराजी होऊन, त्यांनीं आपलें अंग त्यांतून अजिबात काढून घेण्याचा विचार केला. त्यामुळें, अर्थात् सनातन **आर्यधर्मांत** बराच घोंटाळा होण्याचा रंग दिसूं लागला, आणि **वैदिक** यज्ञविधींत देखील दुफळी माजली. तसेंच, एकंदर कर्मविधीचा खटाटोप करण्याची अवश्यकता आहे कीं नाहीं, याविषयीं बराच खल होत जाऊन, तार्किकज्ञानाचा पुष्कळच फैलाव झाला.

अशा स्थितींत, कित्येक **ऋषिवर्य** निरीश्वरवादी बनले. कित्येक असें प्रतिपादन करूं लागले कीं, त्रिविधतापांची

---

१ "**अथ त्रिविधदुःखात्यंत निवृत्तिरत्यन्त पुरुषार्थः**"
"**यद्वातद्वातदुच्छित्तिः पुरुषार्थस्तदुच्छित्तिः पुरुषार्थः**"
( कपिलकृत सांख्य प्रवचन. )

निरीश्वरवाद, कार्यवाद, व कारणवाद.

निवृत्ति हाच कायतो परम पुरुषार्थ असून, त्या व्यतिरिक्त इतर यच्चावत् खटपट अगदीं निरर्थक आहे. त्यामुळें, कित्येक सत्कार्यवादी झाले; आणि कित्येकांनीं तर परिणामवादाचेंच अवलंबन केलें.

सांख्यदर्शन.

याप्रमाणें **निरीश्वर** मताची चर्चा एकदां सुरू झाल्यावर, तें मत हळू हळू फैलावत चाललें. तदनंतर, ह्या सिद्धान्ताची सार्थकता दाखविण्याकरतां, **कपिलमुनीनें सांख्यप्रवचन** नांवाचा एक ग्रंथ केला, व त्यांतील तत्त्वें आपल्या **आसुरिनामक** शिष्याला शिकविलीं. पुढें शिष्यपरंपरेनें हें मत विशेष प्रसृत होत गेलें, आणि त्याला **सांख्यदर्शन** असें नांव पडलें.

त्याचा प्रवर्तक कपिल मुनि.

ह्यावरून, वाचकांच्या लक्षांत इतकें सहजींच येऊन चुकेल कीं, निरीश्वर मताचा मुख्य प्रवर्तक **कपिल** होय. ह्या मतांत **कपिलासारखे** महान् ऋषि **परमात्म्याला** मुळींच मानीत नाहींत. तथापि, त्यांतही कित्येक सेश्वरवादी असल्या कारणानें, त्यांच्या मतास **सेश्वर सांख्यप्रवचन**, किंवा **योगदर्शन** म्हणतात. ह्या **षड्दर्शनांचें** साद्यंत विवेचन चवथ्या पुस्तकाच्या एकविसाव्या भागांत केलें आहे. सबब, प्रस्तुत प्रसंगीं, त्याविषयीं जास्त विवेचन करण्याचें कारण नाहीं.

त्याचा काल.

आतां, **कपिल** मुनीचा काल इसवी सनापूर्वी सुमारें एक हजार वर्षे असल्याविषयीं, कांहींनें

मत आहे. तेव्हां, बुद्ध उदयास येण्यापूर्वी अजमासें पांचशे वर्षें, किंबहुना त्याही पूर्वी, हें निरीश्वर मत भरतखंडांत प्रसृत होतें, असेंही म्हणण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं.

वेदप्रणितमार्ग व श्रौतमार्गें मतान्तर.

वेदकालांत उपनिषदादि ग्रंथांनीं आर्यांची मूळचीच असलेली कुशाग्रबुद्धि ज्यास्त तीव्र होऊन, हा जीव, ही सृष्टि, आणि हें भासमय होणारें मायाजाल, यांविषयीं अनेक कोटिक्रमाचा विलक्षण उपक्रम सुरू झाला; आणि ब्रह्म सत्य किंवा जगत् सत्य; तसेंच परमेश्वर आहे किंवा नाहीं; व कर्मविधि पाहिजे किंवा नको; यासंबंधानें अगदीं कडाक्याचा वाद मातला. तेव्हां अर्थातच, वेदप्रणितमार्गांत सहजींच दुई झाली. आणि कालांतरानें त्यांतील मतें गौतमबुद्धास संमत न होऊन, सरतेशेवटीं त्यानें आपलीं तत्संबंधीं मतें कायमचीं प्रदर्शित केलीं, व एक निराळाच धर्मपंथ काढला.

---

1 " I have also already remarked that the Buddhist doctrine was originally of purely philosophical tenor, identical with the system afterwards denominated the Sânkhya, and that it gradually grew up into a religion, in consequence of one of its representative having turned with it to the people, "

( History of Indian Literature. By Professor Weber. P. 284 )

**बौद्धधर्माची प्रतिष्ठापना, आणि त्याचा प्रसार.**

ह्या धर्माची प्रतिष्ठापना गौतम नांवाच्या बुद्धानेंच केली असल्या कारणानें, त्याला बौद्धधर्म म्हणतात. हा धर्म कालान्तरानें इतका पसरला कीं, तो ह्या भूतलावरील पन्नास कोटी प्रजेनें प्रस्तुतकाळीं स्वीकृत केला असल्याचें, खालीं लिहिलेल्या कोष्टकावरून चांगलें व्यक्त होईल.

| उत्तर बौद्धधर्मानुयायी. | दक्षिण बौद्धधर्मानुयायी. | एकूण. |
|---|---|---|
| चीन. ...४१,४६,८६,११४ | आनाम ...१,२०,००,००० | सर्व बौद्धधर्मानुयायी प्रजा पन्नास कोटी आहे. |
| जपान. ...३,२७,१४,८१७ | सायाम....१,००,००,००० | |
| मांचूरिआ. ...३०,००,००० | ब्रह्मदेश ......५४,४७,८३१ | |
| मोंगोलिया...२०,००,००० | सिंहलद्वीप ...१५,२०,५७५ | |
| कोरिआ......८०,००,००० | | |
| तिबेट........६०,००,००० | | |
| नेपाळ.........५,००,००० | | |
| भुतान,सिकिम१०,००,००० | | |
| काश्मीर.......२,००,००० | | |
| लूसेन बेटें....१०,००,००० | | |
| रूस वसाहती...६,००,००० | | |
| इंग्रजी वसाहती.५,००,००० | | |
| डच वसाहती आणि बाली. ...५०,००० | | |

Rhys Davids on Buddhism. p.p. 4/5

त्याची संख्या. आतां, स्थूल मानानें, नानाविध धर्मपंथानुयायांची संख्या खालीं दाखल केल्याप्रमाणें मानली तर, एकंदर पृथ्वींतील लोकसंख्येच्या एक त्रितीयांशापेक्षांही बौद्ध धर्मांतील प्रजा ज्यास्त प्रमाणानें सांपडेल.

**या भूतलावरील नानाविध धर्मांतील तपशीलवार लोकसंख्या.**

| धर्म अथवा पंथ. | लोकसंख्या. |
|---|---|
| बौद्ध. ... ... ... | ५०,००,००,००० |
| हिंदु. ... ... ... | १६,००,००,००० |
| शीख ... ... ... | १२,००,००० |
| इस्लाम. ... ... ... | १५,५०,००,००० |
| रामनकॅथालिक. ... ... | १५,२०,००,००० |
| ग्रीककॅथालिक. ... ... | ७,५०,००,००० |
| इतर खिस्ती. ... ... | १०,००,००,००० |
| ज्यु. ... ... ... | ७०,००,००० |
| पारशी. ... ... ... | १,५०,००० |
| इतर धर्मानुयायी.... ... | १०,००,००,००० |
| एकूण पृथ्वीवरील लोकसंख्या. | १,२५,०३,५०,००० |

(Rhys Davids on Buddhism. p.6).

त्याचा प्रवर्तक,व तेव्हां, अशा प्रकारें विस्तृत असलेल्या बौद्ध धर्माचा प्रवर्तक जो गौतमबुद्ध, त्याचा इतिवृत्तांत सांगितला असतां, तो थोडाबहुत तरी खचित बोधप्रद होईल, असें समजून तो येथें देतों.

खिस्ती शकापूर्वी सहाशें वर्षांच्या सुमाराला, **मगध**
मगध देश. देशाचा चांगला उर्जितकाळ येऊं
लागला असून, तो त्यावेळीं बराच पुढें सरसावला होता
असें दिसतें.* हा **मगध** देश म्हटला म्हणजे सांप्रतचा
दक्षिण **बहार** प्रांत होय.

ह्याच्या उत्तरेस **लिच्छवि** लोकांचा देश असून,
त्यांच्या राजधानीचें ठिकाण **वैशालि** येथें होतें. दक्षिणेस
**काशी**प्रांत असून, त्याची राजधानी **बनारस** येथें असे.
आणि कोसलदेश, पश्चिमेस **कोसलां**चें विस्तीर्ण राज्य
यांचा उर्जित काळ. असून, त्याची राजधानी **श्रावस्ति**
येथें होती. **अयोध्या** किंवा **साकेत**, येथील प्राचीन शहर
मोडूनच त्याचें **श्रावस्ति** येथें नूतन स्थलांतर केलें असल्याचें
दिसतें. येथें **प्रसेनजित** नांवाचा राजा राज्य करीत
होता; व ह्याचाच प्रतिनिधी **काशी** प्रांताचा राज्यकार-
भार पहात असे. पूर्वेस **अंगदेश** होता, व त्याच्या
राजधानीचें ठिकाण **चंपा** येथें होतें. **मगध** देशाची
राजधानी **राजगृही** येथें असून, तेथें **बिंबिसार** या
नांवाचा राजा राज्य करीत असे.

आतां, **कोसल** आणि **मगध**, या दोन्ही देशांचे राजे
शाक्य लोक, व बलाढ्यच असल्याकारणानें, त्यांच्यांत
कोलियन लोक. आपआपसांत पुष्कळच प्रतिस्पर्धा आ-
णि मत्सर असे. त्यामुळें, त्या दोहोंच्या दरम्यान जीं दोन

लहान संस्थानें असत, तीं एकप्रकारचें यथेच्छ व सुखेनैव अर्धें मुर्धें स्वातंत्र्य उपभोगीत. हीं दोन संस्थानें ह्मटलीं ह्मणजे **शाक्य** आणि **कोलियन** जातीचीं होत. ह्यांची वस्ती **रोहिणी**[1] नामक नदीच्या दोन्ही तटांवर असे. एक बाजूला **शाक्य** नांवाचे लोक रहात, आणि दुसऱ्या तीरावर **कोलियन** लोक वास्तव्य करीत. आणि ह्या नदीच्या पात्रांतील पाण्यावरून, जरी त्या दोघांत हम्मेश तंटे बखेडे उत्पन्न होऊन बरीच यादवी माजे, तरी प्रस्तुत प्रसंगीं त्यांच्यांत परस्पर ऐक्य व स्नेहभाव असल्याकारणानें, **कोलियन** लोकांच्या राजानें आपल्या दोन आवडत्या कन्या **शाक्यांचा** राजा जो **शुद्धोदन**, याळाच विवाहविधीनें अर्पण केल्या होत्या.

गौतमाचें कुल. **शाक्यांच्या** अधिपतीनें आपली राजधानी **कपिलवस्तु** नामक नगरींत केली होती. हें शहर **श्रीकाशीक्षेत्रा**पासून सुमारें पन्नास कोसांवर ईशान्य दिशेला आहे. ह्या राजाला सदरीं लिहिलेल्या दोन्ही स्त्रियांपासून मुळींच संतती नसल्याकारणानें, तो फारच खिन्न आणि उद्विग्न असे. परंतु सुदैवेंकरून, कालांतरानें त्याच्या एका स्त्रीस डोहाळे होऊं लागल्यामुळें, पोटीं संतान होण्याची आशा वाटली, आणि सुचिन्हेंच दृष्टिगोचर होत चाललीं.

---

[1] ह्या नदीला हल्लीं कोहाण असें म्हणतात.

पुढें, **शुद्धोदनाची** वडील गर्भिणी स्त्री, प्रसूत होण्या-

त्याचें जन्म.

करितां आपल्या माहेरीं जाऊं लागली, त्यावेळीं ती मार्गांतच एका उपवनाच्या वृक्षवाटिकेंत बाळंतीण होऊन, तिला एक सुलक्षण व दैदीप्यमान पुत्ररत्न झालें. हाच भावी **गौतमबुद्ध** होय.

ह्याच्या जन्माच्या वेळेस, नानाप्रकारचे चमत्कार आणि

त्यावेळीं घडून आलेल्या अद्भुत गोष्टी.

अद्भुत गोष्टी घडून आल्याविषयीं, **बौद्धधर्मग्रंथांत** पुष्कळ वर्णन आहे. इतकेंच नाहीं तर, त्या **गौतमाचा** प्रभाव आणि त्याचे गुण, इत्यादींचा विलक्षण देव्हारा तत्कालीन धार्मिक लोकांनीं निष्कारण माजविला, आणि त्याचीं मनमानेल तशीं लांबलचक नांवेंही ठेविलीं. कोणी त्यांला **शाक्यसिंह** ह्मणत. कोणी **सिद्धार्थ**, कोणी **शाक्यमुनि**, कोणी **सुगत**, कोणी **जिन** ( जिंकणारा ), कोणी **सर्वज्ञ**, व कोणी **लोकनाथ**, इत्यादि अनेक नांवांनीं त्यास हाक मारीत. आणि कोणी तर त्यास **धर्मराज** अशीही संज्ञा देत.

असो. **गौतम** हा **रजपूत** कुळांतील असून, तो इ० स०

जन्मकाल.

पूर्वी ६२२ व्या वर्षी जन्मला.[1] त्याचें जन्म झाल्यावर, बाळ व बाळंतीण यांजला **कपिलवस्तू**मच परत नेलें. परंतु तेथें पोहोंचल्यानंतर, सुमारें सात

---

१ डाक्तर हंटरचा हिंदुस्थानचा इतिहास. आवृत्ति दुसरी पान १३३.

दिवसांनींच त्याची मातुःश्री निवर्तली, आणि त्यामुळें तें पोर उघडें पडलें. तथापि, ह्याची सापत्न माता जिवंतच होती. आणि ती ह्याच्या आईची सख्खी बहीण असल्याकारणानें, तिनें ह्याचें पुत्रवत् पालन केलें, व हरएक तऱ्हेनें उत्तम प्रकारची काळजी घेतली.

दिवसानुदिवस हें पुत्ररत्न मोठें होत चाललें. त्याची

गौतमाची बाल्यावस्था व युवावस्था.

शैशवावस्था जाऊन, त्याला बाल्यावस्था प्राप्त झाली. आणि बाल्यावस्था पुरी झाल्यावर, त्याजवर तारुण्याची झांक मारूं लागली. वृद्धावस्थेंत हा पुत्रोत्सव, व त्यांतही विशेषतः हें एकुलतें एकच पुत्ररत्न असल्या कारणानें, शुद्धोदनासारख्या पित्याला आपल्या मुलाचें लौकर लग्न होऊन, त्याचा सुखसोहळा मोठ्या आनंदानें पहावा, अशी लालसा होणें अगदीं साहजीक होतें. त्यामुळें गौतमाचें लवकरच लग्न होऊन, तो ह्या संसारांतील क्षणिक परंतु अनुपम सौख्याचा अनुभव, त्याची धर्मचारिणी जी कोली राजाची कन्या[१], तिच्यासमवेत घेऊं लागला.

यापमाणें भरज्वानींत असून, ऐन तारुण्यभराचा मधुर

क्षात्रधर्माकडे त्याचें दुर्लक्ष्य, व तत्संबंधीं आरोप.

रसास्वाद घेण्यांत गुंग झाला असतां, व्यायाम, कुस्ती, तिरंदाजी, पट्टा, घोड्यावर बसणें, नेम मारणें, इत्यादि

१ हिचें नांव सुभद्रा किंवा यशोधरा असें होतें.

नानाविध जे **क्षात्रधर्म**, त्यांचें यथोचित परिशीलन करण्यांत **गौतमाचें** बरेंच दुर्लक्ष्य झाल्यासारिखें दिसतें. त्या कारणानें, **शाक्य** लोकांनीं ह्या युवराजाबद्दलचें गाऱ्हाणें खुद्द **शुद्धोदन** राजापर्यंत नेलें, आणि आपला भावीराजा अंतःपुरांतील युवतिजन कटाक्षांनींच मोहीत होऊन, तल्लीलासुखास्वादांतच तो सदैव निमग्न असतो, असें त्यांनीं त्यांस भासविलें.

तो दूर करण्याविषयीं त्यानें केलेला प्रयत्न.

अशा प्रकारें, कुसुमशराच्या पाशांत सांपडल्याबद्दलचा जो आरोप **गौतमावर** आला, तो त्याला बिलकूल सहन झाला नाहीं. त्यामुळें, त्यानें आपल्या राज्यांत लागलींच दवंडी पिटविली, आणि **क्षात्रविद्येच्या** नानाविध शाखेंत कुशल व निपुण असलेले, ठिकठिकाणचे लोक एकत्र होतील, अशी तजवीज केली. पुढें, सर्व समाज जमल्यावर **गौतमानें** स्वतःच सर्वांशीं सामना केला, आणि प्रत्येक बाबतींत आपला पटाईतपणा, खुबी, व अद्वितीय चातुर्य दाखवून, अखिल जनांस तोंडांत बोटें घालावयास लाविलें, अशी आख्यायिका आहे.

गौतमाच्या मनाची अस्वस्थता.

असो. इतकें झालें तरी, **गौतमाच्या** चित्तास प्रथमपासूनच समाधान म्हणून काडीमात्रही नव्हतें. त्याला हें यच्चावत् ऐहिकसुख अगदींच क्षणभंगूर व नाशवंत वाटे. त्यामुळें,

तो नेहमीं एकांतवासांत जाऊन, ह्या जगांतील सुखदुःखा-विषयीं पुष्कळ विचार करी. उत्पन्न झालेल्या प्राणि-मात्रास अहर्निशीं किती तरी दुःख भोगावें लागतें, या-बद्दलच्या विचारांत तो निरंतर निमग्न असे. राज्याचें ऐश्वर्य, संपत्तीचे विलास, तारुण्याची मजा, गृहसौख्याचें अमृतपान, युवतीजनांचें मनोहर कटाक्ष, मातापितरांचें अप्रतीम प्रेम, बंधुवर्गाचें सांन्निध्य, आणि प्रियभार्येचें साहचर्य, यांपैकीं एक देखील आपल्या अंतसमयीं उप-योगीं पडणारें नाहीं, असें त्यास वाटत असे. इतकेंच नव्हे तर, ह्या दुनियेंतील यच्चावत् सौख्य निःसंशय अशाश्वत आहे, असें तो निश्चयपूर्वक मानी.

विरक्तिचें कारण.

**गौतमाला** ही जी विरति झाली, ती एका वृद्ध मनु-ष्याची गलितावस्था, दुसऱ्या एकाची व्यथितावस्था, आणि तिसऱ्या एकाचें विशीर्यमाण असें प्रेत पाहून झाली असल्याविषयीं, एक चमत्कारिक आख्या-यिका आहे.

त्याला पुत्ररत्नाची प्राप्ति.

अशा प्रकारच्या विरतावस्थेंत **गौतम** असतां, त्याला एक पुत्ररत्न झालें. ह्या पुत्रजन्माची खबर त्याला एका उद्यानांत मिळाली असून, त्या वेळीं तो पारमार्थिक विषयांत अगदीं निमग्न होऊन गेला होता. त्यामुळें, त्याला तद्विषयक आनंद न होतां. त्यानें उलट असे उद्गार काढिले कीं, " हें एक

नूतन व बलवत्तर बंधन प्राप्त झालें आहे, व त्याचा छेद लवकरच करणें अगदीं इष्ट आहे."

तिचा परिणाम.

पुढें, स्वगृहीं गेल्यावर गौतम हा एके दिवशीं रात्रीं आपल्या रंगमहालांत शिरला. तेथें आपल्या प्रियभार्येच्या कुशींत तें नूतन झालेलें चिमुकलेंसें पुत्ररत्न पाहून, त्याला फार आनंद वाटला. पण त्या आनंदासरसाच त्याला पुष्कळ गहिंवरही आला, आणि तें अर्भक आपल्या करकमलांत घेऊन त्याचें शेवटलें चुंबन घ्यावें, असें त्यास वाटूं लागलें. परंतु तसें करून त्याचे मनोरथ परिपूर्ण होण्याला कांहींच इलाज नव्हता. कारण, त्या बालकाच्या आईनें त्याच्या डोक्यावर हात ठेवून, त्याला आपल्या कुशींत घेऊन शयन केलें होतें. त्यामुळें, तिला जागें केल्याशिवाय, त्या अर्भकाला घेण्याचा सर्वच मार्ग खुंटला होता.

गौतमाच्या मनाची द्विधा वृत्ति.

अशा स्थितींत असतां, गौतमाचें चित्त द्विधा झालें, आणि एकीकडे आड व दुसरीकडे विहीर, अशी त्याची अवस्था होऊन गेली. पुत्रप्रेमानें त्या बालकाचें चुंबन घेण्याविषयींची तर त्याला अत्युत्कट इच्छा झाली. परंतु त्याचें चुंबन घेणें ह्मणजे आपल्या प्राणेश्वरीला जागृत करणें होय; व तीं जागी झाली ह्मणजे आपला इष्ट हेतु सिद्धीस जाईल किंवा नाहीं, अशाविषयीं तो अगदींच साशंक होता. कारण,

तिच्या देखत, किंवा तिच्या इच्छेविरुद्ध, तिला सोडून जाण्याचें त्याच्या मोठें जिवावर आलें होतें. इतकेंच नव्हे तर, हा संसार सोडून तपोवनांत जाण्याचा जो आपला बेत, तोही ती गोष्ट तिला कळल्यावर जेथल्या तेथें तसाच थिजणार, असें त्याला खचितच वाटत होतें.

तिचें कार्य.

कारण, तिचें तें कमनीय वपु, तें मनोहर मुखकमल, ते आकर्ण नेत्र, तें अंगसौष्ठव, व ती हृदयद्रावक आणि चित्ताकर्षक मुद्रा, इत्यादि पाहून, कोणाच्याही अंतःकरणाला पाझर सुटल्याशिवाय राहणारच नाहीं. मग अशा सुशील कांतेनें आपल्या प्रियपतीकडून, संसारत्याग व अरण्यवास करण्याविषयींचें त्याचें मनोगत ऐकिलें असतें तर, तिची काय अवस्था झाली असती, आणि त्यामुळें तिच्या नेत्रकमलांत अश्रुबिंदु येऊन, त्या आश्रुधारांचा, किंवा तिच्या म्लान वदनाचा, अथवा तिच्या त्या करुणस्वराचा, व त्या सविनय प्रार्थनेचा, ह्या शाक्यसिंहावर कोणता आणि कसा परिणाम झाला असता, याची सहजींच कल्पना होण्यासारखी आहे. सबब, त्याबद्दल जास्त वर्णन न करितां, तत्संबंधीं विचार करण्याचें काम मी वाचकांकडेसच सोंपतों.

गौतमाचें धैर्य व

अशा प्रकारच्या मनाच्या चंचल अवस्थेंत, गौतमानें आपला सर्वसंगपरित्याग करण्याविषयींचा जो निश्चय, तो अगदीं दृढतर केला. आणि

पुत्रवात्सल्य व पत्नीप्रेम या दोहोंवरही कायमचें पाणी सोडून, तत्संबंधीं अक्षय्य उदासीनत्व त्यानें मोठ्या धैर्यानें धारण केलें.

अस्तो. हीच वेळ कायती कठिण आणि परम दुःसह होती. व हिच्या तडाक्यांतून वटावण्याचेंच महत् संकटाचें होतें. परंतु, त्या अलौकिक **नरश्रेष्ठाला** धैर्याचें चांगलेंच पाठबळ असल्याकारणानें, तो त्यांतून अचानक पार पडला. आणि त्यामुळें, पुढील मार्ग चोखाळण्यास त्याला फारशी अडचणच पडली नाहीं. त्यानें लागलींच पत्नी व पुत्र, माता आणि पिता, बंधु व स्वजन, घर आणि दार, संपत्ति व ऐश्वर्य, सौख्य आणि विलास, इत्यादींचा त्याग करून, त्याच रात्रीं एकदम वनाचा रस्ता पकडला.

वानप्रस्थाश्रमाचें अवलंबन.

त्याच्या बरोबर प्रथमतः **चन्न** नांवाचा त्याचा एक अत्यंत विश्वासूक परिचारक असून, त्याला त्यानें **कोली** प्रदेशाच्या हद्दीपलीकडील **अनोमा** नामक नदी ओलांडून जाईपर्यंत, आपल्यापाशीं ठेवून घेतला होता. ही नदी ओलांडून गेल्यावर, **गौतमानें** आपल्या अंगावरील सर्व वस्त्रालंकार काढून ते **चन्नाजवळ** दिले, आणि त्याला आपल्या पित्याकडे जाण्यास सांगितलें. **चन्नानें** **गौतमाच्या** सन्निध राहण्याविषयीं पुष्कळ आग्रह केला,

चन्न नांवाच्या विश्वासूक परिचारकास रजा.

परंतु तो चन्नाला ह्मणाला कीं, जर तूं परत गेला नाहींस तर, हें वैराग्य धारण करून हा जो **वानप्रस्था-श्रम** मीं स्वीकारला, त्याची खबर माझ्या घरच्या माण-सांस कशी कळेल? सबब तूं जा, आणि त्यांजला इत्थंभूत वर्तमान सांग.

याप्रमाणें कांहीं तरी सालापाला लावून, **गौतमानें** चन्नाला रजा दिली; आणि आपण क्षौरविधि करवून, भगवीं वस्त्रें परि-धान केलीं. तदनंतर त्यानें **राजगृहीचा** मार्ग धरला. हें स्थळ **गौतमाला** विशेष रमणीयसें भासलें. कारण, तें पवित्र अशा **मंदाकिनीच्या** एका सुंदर दरींत असून, त्याच्या सभोंवतीं पांच बाजूला अरण्यावृत असे विचित्र शैलपाद होते. त्यामुळें, ज्याला म्हणून एकांतवासाची विशेष प्रीति आहे, त्याला तें अतीव मनोहर वाटण्या-सारिखें होतें.

गौतमाचा क्षौर-विधि.

शिवाय, या ठिकाणींच राहण्याचें **गौतमाला** दुसरें एक कारण झालें. तें असें कीं, येथें कित्येक विद्वान **ब्राह्मणांची** आणि पूजार्ह **महर्षींची** वस्ती होती. हे तपो-निधी या अरण्यांत निरंतर तपश्चर्या करीत, व ईश्वरसेवेंत आपला काळ सदैव आनंदानें घालवीत. आणि ह्यांजकडून **अध्यात्मज्ञान** प्राप्त व्हावें, एतदर्थच तो तेथें राहिला होता

राजगृहीची रमणी-यता, व ऋष्याश्रमाचें सानिध्य.

अलार आणि उद्रक हे यांपैकींच दोन प्रचंड तत्त्ववेत्ते होते. ह्यांच्याजवळ अनुक्रमानें गौतमानें षड्दर्शनांचा चांगला अभ्यास केला, आणि त्यांजकडून वेदान्त शास्त्र व हिंदूंची तत्त्वविद्या, हीं पूर्णपणें समजावून घेतलीं.

अलार व उद्रक, यांच्याजवळ गौतमाचा अभ्यास.

तथापि, ह्यांतील ज्ञानानें गौतमाचें काडीमात्र देखील समाधान झालें नाहीं; किंवा त्याच्या मनाला तिळभरही शांतता वाटली नाहीं. तेव्हां अर्थात्च त्यानें ही दिशा सोडली, आणि थोडे दिवसपर्यंत तपश्चर्या करून कांहीं अंतर्ज्ञान झालें तर पहावें, या हेतूनें तो उरुवेला नामक निबिड अरण्यांत गेला.

गौतमाची उद्विग्नता.

परंतु येथेंही, त्याला तथ्यांश ह्मणून कांहींच प्राप्त झाला नाहीं. सबब तो निरंजरा नदीच्या तटीं गेला, आणि सुप्रसिद्ध असा जो बोधिवृक्ष त्या खालीं तळ देऊन, तेथेंच त्यानें आपलें आसन मांडिलें. या ठिकाणीं त्याचें सत्वहरण करण्याच्या उद्देशानें, मारानें ( कामदेवानें ) आपल्याकडून लागेल तितका प्रयत्न केला. परंतु त्यांत त्याला यत्किंचित्ही यश न येतां, उलट गौतमाचीच सरशी झाली. आणि त्याच्या मनावर अकस्मात सत्याचा

त्याला एकदम प्राप्त झालेलें तत्वज्ञान.

१ सांप्रतच्या बुद्धगया नामक देवालयाजवळचाच हा वनप्रदेश होय.

प्रकाश पडून, त्याला एकाएकीं **तत्त्वज्ञान** प्राप्त झाल्या-सारिखें भासलें. त्याच्या सर्व शंका एकदम मावळल्या. व त्याला असें वाटूं लागलें कीं, **उपनिषत्श्रवण** किंवा **वेदान्तज्ञान, तत्त्वमीमांसा** किंवा **षड्दर्शनचिंतन, तपश्चर्या** अथवा **शारीरिक कष्ट,** यांपैकीं एकांत देखील यत्किंचित् सुद्धां तात्पर्य नसून, **१ मनाचा जय, २ वासने**चा **क्षय**, आणि **३ भूतानुकंपा** म्हणजे प्राणि-मात्रावर दया, ह्यांतच मनुष्यदेहाचा कार्यभाग, हेंच नृजन्मसाफल्य, व हीच मोक्षप्राप्ति होय.

गौतमाचें धर्मा-न्तर व धर्मोपदेश.

याप्रमाणें **गौतमाचें** अज्ञानपटल एकदम दूर होऊन, **ज्ञानसूर्याच्या** प्रदीप्तीनें त्याचा **भ्रां-तितमस** एका क्षणांत लयास गेला. तदनंतर त्यानें **काशी** क्षेत्राची वाट धरली, व तेथें **बौद्ध** धर्माचें जें **तत्वाष्टक,** त्याचें खरें इंगीत अखिल जनसमू-हास तो जाहीर करूं लागला. त्यामुळें, सुमारें पांच महि-न्यांच्या आंतच त्याच्या पक्षाला एकंदर साठ असामी मिळाले, व त्या सर्वांनीं धर्मान्तर करून **बौद्ध**धर्म स्वीका-रला. कोणी एका सावकाराचा **यश** नांवाचा मुलगा होता. त्याला ह्या संसाराचा आणि यच्चावत् विषयसुखाचा अगदीं वीट व तिटकारा आल्याकारणानें, तोही **गौतमाचा चेला** बनला होता. सबब त्याला **काशीक्षेत्रीं** ठेवून, **गौतम** हा **उरुबेला** नांवाच्या निवासस्थानाप्रत परतला.

येथें आल्यावर, सर्वांस बौद्धधर्मोपदेश करण्याचें काम त्यानें जारी ठेविलें. त्यामुळें, त्याच्या वाग्जालांत कश्यपगोत्रज असे तीन ब्राह्मण सांपडून, त्या बिचाऱ्यांनीं तत्काल धर्मान्तर केलें. ह्या कडकडीत तपोधनांनीं व कर्मनिष्ठ ब्राह्मणांनीं बौद्धधर्म स्वीकारल्या कारणानें, गौतमाचा बहुतेक मार्ग चोखाळल्या सारखाच होऊन, इतर बाजारबुणगें आणि अशिक्षित समाज हा देखील त्याच्या कळपांत हं हं म्हणतां शिरला. आणि अशा प्रकारच्या मतान्तरामुळें, एकंदर हजार लोक बौद्धधर्मानुयायी झाले.

त्याचा लोकसमाजावर, व प्रजेवर झालेला परिणाम.

इतका कार्यभाग झाल्यावर, गौतम हा आपल्या धर्मान्तर झालेल्या नूतन परिवारासहित राजगृहीस आला. येथें मगध देशाचा राजा श्रेनिय बिंबिसार हा राज्य करीत होता. त्याला ही बातमी कळतांच तो त्याच्या भेटीला सामोरा गेला, आणि कश्यपादि ब्रह्मर्षींनीं देखील धर्मान्तर केल्याचें अवलोकन करून, त्यानेंही आपल्या अनुयायिजनासहित बौद्ध धर्म स्वीकारला.

राजावर झालेला परिणाम.

याप्रमाणें, बौद्धधर्मसंस्थापक म्हणून गौतमाची कीर्ति चोंहोकडे पसरली, आणि तिचा परिमळ थेट त्याच्या जन्मभूमिकेपर्यंत जाऊन थडकला. त्यामुळें, आपल्या

ह्या अलौकिक पुत्राला मरणापूर्वी एकदां तरी पहावें, अशाविषयींची इच्छा त्याच्या बापाला झाली, व ती त्यानें साहजीकच प्रदर्शित केली. ही वार्ता **गौतमाच्या** कानीं पडतांच त्यानें तिकडे जाण्याचा निश्चय केला, आणि **कपिलवस्तूची** वाट धरली. येथें आल्यावर नगराबाहेरच्या एका आश्रमांत तो उतरला, आणि गांवांतून नित्यशः भिक्षा आणून, आपला उदरनिर्वाह करण्याचा त्यानें क्रम ठेविला.

पितापुत्राची भेट.

परंतु ही गोष्ट त्याच्या बापाला रुचली नाहीं, हें सांगावयासच नको. उघडच आहे कीं, ज्या ठिकाणीं त्याचा बाप राज्य करीत होता, त्या नगरांत एखाद्या भिकाऱ्याप्रमाणें जर त्याचा मुलगा बरोबर भिक्षा मागूं लागला, तर ती गोष्ट त्या पित्याला कशी म्हणून आवडावी ? अर्थातच नाहीं. तेव्हां **शुद्धोदनानें** तत्संबंधीं आपली अप्रीति व पराङ्मुखता प्रदर्शित करून तो **गौतमाला** बोलला कीं, आपण **क्षत्रिय** राजवंशांतले असून, आपणांपैकीं एकानें देखील आजपर्यंत कधींही भिक्षार्जन केलें नाहीं. असें असून, तूं ह्या भिक्षावृत्तीचें अवलंबन केलेंस, हें चांगलें नाहीं.

त्यावेळीं, आपल्या पित्याचें भाषण शांतपणें ऐकून घेऊन गौतमानें प्रत्युत्तर दिलें. " महाराज, आपण व आप-

त्या कुटुंबांतील माणसें राजवंशी असतील, परंतु मी सिद्ध असून बुद्ध वंशांतला आहे."

तदनंतर, त्या राजानें आपल्या पुत्रास राजवाड्यांत नेलें, व तेथें त्याला सर्व मंडळी भेटली. परंतु त्याची पत्नी यशोधरा त्याला भेटली नाहीं असें पाहून, गौतमच तिच्याकडे गेला, आणि तिला त्यानें बौद्धधर्माचा उपदेश केला. तथापि, तिनें धर्मांतर केलें नाहीं. पण राहुल (गौतमाचा मुलगा), हा जरी लहान होता, तरी त्यानें त्याचें धर्मांतर करविलें.

गौतमाची व त्याच्या पत्नीची भेट.

हें पाहून, गौतमाच्या बापाला फारच वाईट वाटलें, आणि अतीव विषाद झाला. सबब, त्यानें गौतमाला अशी सुचना केली कीं, मातापितरांच्या संमतीशिवाय पुनश्च कोणत्याही बालकाचें धर्मान्तर करूं नये. ती गोष्ट गौतमानें कबूल केली, आणि त्याप्रमाणें अमलांत येण्याकरितां एक नियम घालून, तत्संबंधीं धर्मबंधनच करून टाकिलें.

राहुलाचें धर्मांतर, व शुद्धोदनाचा खेद.

कालान्तरानें, त्यानें आपली पत्नी यशोधरा व सावत्र मातुःश्री प्रजापतिगौतमी, यांजला ही आपल्याच कळपांत घेतलें. कारण, गौतमाचा बाप नव्वद वर्षांचा वृध्द झाल्यावर निवर्तल्यामुळें, त्या अबलांचें संरक्षण करण्याला मागें कोणीच राहिलें

गौतमाच्या कुटुंबाचें धर्मान्तर,

नव्हतें. सबब, त्यांच्या इच्छेस अनुकूल होऊन, त्यानें त्यांचेंही धर्मान्तर करविलें.

धर्मान्तराच्या संबंधानें बौद्ध ग्रंथांत ज्या कित्येक गोष्टी सांगितलेल्या दृष्टीस पडतात, त्या केवळ बालिश असल्याकारणानें अगदींच भरंवसेलायक वाटत नाहींत. सबब, मी त्या येथें सांगीत बसतच नाहीं. मात्र, मुद्याच्या गोष्टींपैकीं एकही गोष्ट राहणार नाहीं, अशाविषयीं योग्य ती काळजी घेऊन, मी वाचकांची अवश्य ती सेवा करीन.

ब्राह्मण धर्माचें साम्राज्य, व बौद्धधर्माचा पगडा.

असो. अशाप्रकारें, या भरतखंडांत हा बौद्धधर्म दिवसानुदिवस पुष्कळच फैलावत चालला, व तो वृद्धिंगत होण्यासाठीं गौतमानें देखील पुष्कळ खटपट केली. तो नाना प्रदेश हिंडला. जागोजागीं त्यानें व्याख्यानें दिलीं. ठिकठिकाणीं त्यानें धर्मोपदेश केला, आणि विलक्षण चमत्कारही दाखविले. त्यामुळें, कांहीं शतकेंपर्यंत, बौद्धधर्मानें या भरतभूमीवर आपला बराच पगडा बसविला होता, असें म्हणण्यास बिलकूल हरकत नाहीं. तथापि, ह्या धर्माबरोबरच ब्राह्मणधर्मही आपलें डोकें वरच करून होता, असें कोणालाही कबूल करणें भाग आहे.

गौतमबुद्ध हा ऐंशी वर्षांचा वृद्ध झाल्यावर मरण

गौतमाचा निर्वाण काल.

पावला. तोंपर्यंत, त्यानें आपलें सर्व आयुष्य आत्मोन्नतींत व धर्मोपदेश करण्यांतच खर्च केलें. त्याच्या चरितांतील महत्वाच्या गोष्टी खालीं लिहिल्याप्रमाणें आहेत.

त्याचें जन्म....................इ० स० पूर्वी १२२ वर्षी.

त्याची बाल्यावस्था व

तरुणावस्था....................इ० स० पूर्वी १०१ पर्यंत.

त्याचा गृहस्थाश्रम.............इ० स० पूर्वी ९९३ पर्यंत.

त्याचा संसारत्याग ........इ० स० पूर्वी ९९२ व्या वर्षी.

त्याचा वानप्रस्थाश्रम.........इ० स० पूर्वी ९८८ पर्यंत.

त्याचें आत्मज्ञान..............इ०स०पूर्वी ९८८ व्या वर्षी.

त्याचा धर्मोपदेश..........इ० स० पूर्वी ९८१ पासून तों इ० स० पूर्वी ९४३ पर्यंत.

त्याचें निर्वाण.................इ०स०पूर्वी ९४३ व्या वर्षी.

गौतमाचें शिक्षण, व त्याचा त्याच्या मतावर झालेला परिणाम.

गौतमबुद्धाचें सर्व शिक्षण ब्राम्हणांच्या हातून, व त्यामुळें अर्थात ब्राह्मण पद्धतीस अनुसरूनच झालें असल्याविषयीं, ऐतिहासिक प्रमाणांवरून खात्रीपूर्वक कळून येतें. आणि त्यानें बौद्धधर्म नांवाचा जरी निरा-

विचार, आणि नीति व नय, हीं केवळ हिंदुधर्मतत्त्वांसच अनुसरून होतीं, असें ह्मणण्यास कांहींएक प्रत्यवाय नाहीं.

त्याचें अवस्थात्रय, व ब्राह्मणांचें गुरुमुख.

बाल्यावस्थेंत किंवा युवावस्थेंत, आणि गृहस्थाश्रमांत, किंवा वानप्रस्थाश्रमांत, त्याला जें जें **विद्यामृत** ह्मणून प्राप्त झालें, अथवा त्यानें ज्या ज्या तत्त्वविचारांची माहिती करून घेतली, किंवा त्यांनीं ज्या ज्या **वेदान्तविषयांचा** अभ्यास केला, त्या सर्वांत, त्याला **ब्राह्मणांचेंच** गुरुमुख प्राप्त झालें होतें. त्यामुळें, **गौतमाच्या** धर्मपद्धतींत यत्किंचित् देखील कल्पकता **दृष्टिगोचर** होत नाहीं. किंवा त्यांत एकादी अद्भुत नूत-

---

1 " Gautama was born, and brought up, and lived, and died a Hindu. "

(Rhys Davids, on Buddhism. P. 83.)

2 " There was not much in the Metaphysics and psychology of Gautama which cannot be found in one or other of the Orthodox systems, and a great deal of his morality could be matched from earlier or later Hindu Books. Such originality as Gautama possessed lay in the way in which he adopted, enlarged, ennabled, and systematized that which had already been well said by others; in the way in which he carried out to their logical conclusion, principles of equity and justice already acknowledged by some of the most prominent Hindu thinkers. "

बौद्ध धर्मांतील कल्पकतेचा अभाव.

नतामुद्धां भासत नाहीं. आणि त्यांत अदृष्टपूर्व असें कांहींच नसल्या कारणानें, त्याचा चमत्कारही वाटत नाहीं. इतकेंच नव्हे तर, हिंदूचीं धर्मविषयक आणि नीतिविषयक तत्त्वें, हीं प्रत्यक्ष अथवा पर्यायानें अखिल बौद्ध धर्मांत इतस्ततः व्याकीर्ण झालेलीं दृष्टीस पडतात, असेंही म्हणण्यास काडीमात्र बाध येत नाहीं.

गौतमबुद्धाच्या पंथाचीं मूलतत्त्वें, व

गौतमबुद्धाच्या पंथाचीं मूलतत्त्वें म्हटलीं म्हणजे १ आत्मोन्नति, आणि २ मनोनिग्रह, हीं होत. अहर्निशीं कष्ट करून आपली काया झिजवावी, षड्रिपूंचें दमन करून शांतिसुख संपादावें, आणि मनोनिग्रहानें आत्मोन्नति साधावी, येवढाच कायतो ह्या धर्माचा मुख्य हेतु होय.

हिंदुधर्माचें पर्यवसान.

आतां, हिंदुधर्माचें पर्यवसान देखील हेंच आहे. परंतु, ह्या दोहोंत भेद म्हणून इतकाच कीं, बौध्दधर्म निरीश्वरवादी असून, हिंदुधर्म सेश्वरवादी आहे.

असो. ही आत्मोन्नति प्राप्त होण्यासाठीं, गौतमानें खालीं लिहिल्याप्रमाणें आठ मार्ग सांगितले आहेत.

१ सच्छ्रध्दा. २ सद्वांछा.
३ सद्वाक्. ४ सदाचरण.

नांवानें त्या सुप्रसिद्ध आहेत. आणि धर्मशील गृहस्थाश्रम्यानें त्यांचें अवश्य अवलंबन करावें, अशी त्यांत शिफारस केली आहे.

सदरहू आठ अनुशासनाखेरीज

९ नर्तन, संगीत, गान, व रंगोपजीवन, यांपासून निवृत्ति, आणि

१० सोनें व रुपें याला न शिवणें,

या दोन अनुज्ञा असून, ह्या सर्वांस **दशशील** अशी संज्ञा आहे.

अन्य किरकोळ नियम. याशिवाय

१ मातापितरांचें मुलांस शिक्षण.

२ गुरूचा शिष्यास उपदेश.

३ पति आणि पत्नी यांचें परस्परांशीं वर्तन.

४ मित्र व सहचर यांचा अन्योन्यभाव.

५ धनी व चाकर यांचा परस्पर संबंध.

६ प्राकृतजन व दीक्षित यांचा परस्पर अनुषंग;

इत्यादि संबंधीं विवेचन देखील **गौतमानें** केलें आहे. तथापि, ह्या सर्वांचें तपशीलवार वर्णन **मनुस्मृतींत** चांगल्या प्रकारें दिसून येतें. सबब एकंदरीनें विचार करितां, **बौध्द धर्मांत** नवीन म्हणून कांहींच नाहीं, असें सहजींच लक्षांत येण्यासारिखें आहे.

**बौध्दधर्म** उदयास येण्यापूर्वीं **जैनमत** प्रचारांत होतें,

---

1 " Jacobi shows that both ' Buddhism and

( पुढें चालू. )

बौद्ध धर्मापूर्वीचें जैनमत. असा कित्येक पाश्चात्य विद्वानांचा अभिप्राय आहे. आणि हे दोन्ही पंथ ब्राह्मण धर्मापासूनच उद्भवले आहेत, असें ते प्रतिपादन करितात.

जैनमताचीं तत्त्वें. हिंदुधर्माप्रमाणेंच जैनधर्म देखील, आत्मा सर्वत्र आहे, असें मानतो. परंतु ही कल्पना बौध्द्धर्माला संमत नाहीं.

त्यांतील पंथ व ग्रंथसंपत्ति. जैनधर्मांत श्वेतांबर आणि दिगंबर असे दोन पंथ आहेत. जैनस्मृति व ग्रंथसंपत्ति इ० स० पूर्वी तीनशें वर्षांपासूनची असल्याचें कळतें.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

Jainism must be regarded as religions developed out of Brahmanism. ' * * * "

" And he brings forward evidence for believing that Jainism was the earlier outgrowth. "

* * *

" In doctrine, the Jains accepted the Brahman panthiestic philosophy of the Atman, or Universal Soul. Buddha made a further divergance. He combated the Brahman doctrine of the Universal Soul; and the Jain dogma, of the elements and mineral being endowed with souls, finds no place in Buddhist philosophy. "

( Dr. Hunter's Indian Empire. p. p. 161-162.)

1 Dr. Hunter's Indian Empire. P 162.

## बौध्दधर्मांतील ग्रंथसंपत्ति.

येथपर्यंत आपण **बौध्दधर्मां**तील ठळक ठळक गोष्टींचा विचार केला. आतां, या धर्मांतील ग्रंथसंपत्ति किती, व कशा प्रकारची आहे, याविषयीं कांहीं दाखला मिळाला तर पाहूं.

बौद्धधर्मांतील ग्रंथसंपत्ति.

**बौध्द**धर्मांतील ग्रंथसंपत्तीसंबंधीं हल्लीं जी माहिती उपलब्ध आहे त्यावरून, ती बरीच मोठी असल्याचें दिसतें. कित्येक **पाश्चात्य** गृहस्थांनीं शोध करून, या धर्माचीं अनेक हस्तलिखितें मिळविलीं, आणि कांहींनीं तर कित्येकांचीं भाषांतरें देखील केलीं. त्यामुळें, तद्विषयक साद्यंत हकीकत कळण्यास, हल्लीं बरेंच चांगलें साधन झालें आहे.

नेपाळांत मिळालेले ग्रंथ.

इंग्रजांच्या तर्फेचा **रेसिडंट** म्हणून, मिस्तर **हॉड्सन्** हा इ० स० १८३१ पासून १८४३ पर्यंत **नेपाळांत** होता. त्यावेळीं, प्रथमतः त्यानेंच **बौध्द**धर्माचीं उपलब्ध असलेलीं सर्व हस्तलिखितें गोळा करण्याचा प्रयत्न केला, आणि अनेक प्रकारचे हस्तलेखही मिळविले. पुढें त्यानें ८९ रुमाल ( कागदांचीं पुडकीं ) **बंगालच्या एशियाटिक् सोसायटीकडे** पाठविलीं; ८९ रुमाल **लंडन** येथील **रॉयल एशियाटिक सोसायटीकडे** पाठविले; ३० रुमाल **इंडिया आफीस लायब्ररींत** पाठविले; ७ रुमाल **ऑक्स**-

फर्ड येथील **बॉड्लीन** नामक **लायब्ररींत** पाठविले; आणि १७४ रुमाल **पारीस** येथील **सोसायटी एशियाटिक्** नामक संस्थेला, किंवा प्रत्यक्ष **मॉन्सियर बर्नाफ्**ला पाठविले.

हीं पुडकीं पोहोंचल्यावर **बर्नाफ्** स्वस्थ बसला नाहीं. त्यानें त्यानें मनःपूर्वक परिशीलन केलें; त्यांतील विषय काळजीपूर्वक समजावून घेतला; आणि एकंदर सर्व हकीकतीची सुसंगतवार व्यवस्था लाविली. तदनंतर इ० स० १८४४ सालीं त्यानें एक निबंध लिहिला, आणि त्याला " **भारतीय-बौद्धधर्मेतिहासविषयक** प्रस्तावना " अशा आशयाचें नामधेय दिलें.

तत्संबंधीं बर्नाफ्चें परिशीलन.

**बर्नाफ्**नें हा जो निबंध लिहिला, त्यांत **बौध्दधर्मा**चें विवेचन अगदीं **शास्त्रीय** पद्धतीनेंच केलेलें असल्याकारणानें, त्याची विशेष कीर्ति झाली. आणि त्यामुळें, त्या विषयाकडे **सर्व युरोपस्थ** पंडितांचें विशेष रीतीनें लक्ष्य लागून, या बाबतींत जास्त माहिती मिळण्यासाठीं त्यांनीं **हरतऱ्हेचे** प्रयत्न चालविले.

तद्विषयक युरोपस्थांचें कुतूहल.

**क्सोमा** नामक **हंगेरियन** पंडितानें देखील या कामीं पुष्कळ परिश्रम केले, आणि **बुखारेस्टपासून बगदाद, तेहेरान, खुरासान, बुखारा, काबूल, ल्यहोर, काश्मीर, लडक, सिमला, दारजि-**

क्सोमाचे प्रयत्न.

लिंग, तिबेट, वगैरे अनेक देशांत पर्यटन करून, ठिक-ठिकाणीं माहिती मिळविली.

बीलचे परिश्रम.

रेव्हरंड् साम्युअल बील यानें चिनी भाषेंत असलेले सर्व ग्रंथ मिळवून, ते एकत्र करण्याचें श्रेय घेतलें. त्याचप्रमाणें, जपानांत उपलब्ध असलेले सर्व बौध्द ग्रंथ मिळविण्याच्या हेतूनें अन्य रीतीनें तजवीज झाली. ती अशी कीं, प्रसंगविशेषीं इंग्लंडांत जपानचा वकील गेला असतांना, सदरहू ग्रंथ मिळवि-ण्याची तजवीज करून पाठवून देण्याविषयीं त्याला विनंति करण्यांत आल्यावरून, त्यानें ती गोष्ट कबूल केली. पुढें तो टोकियो येथें परत आल्यावर, तद्विषयक सर्व ग्रंथ गोळा करण्याचें त्यानें फर्माविलें; व त्यामुळें एकंदर बरेच ग्रंथ एकत्र झाले.

जपानांत, व चीन-देशांत मिळालेले ग्रंथ.

याप्रमाणें इंग्लंडास रवाना होण्याकरितां हा जो ग्रंथ-समूह जमविला, त्याला " पवित्र-कोषत्रय " असें नामधेय दिलें होतें. ह्यांत एकंदर दोन हजार ग्रंथ असून, अनेक शतकेंपर्यंत भरतखंडांतून चीन देशांत जी ग्रंथसंपत्ति लोटली, तीच ही होय.

भरतखंडांतून द्वी-पांतरीं गेलेले ग्रंथ.

अशोकबादशहाच्या वेळेस देखील भरतखंडांतून सिंहलद्वीपांत, इ० स० पूर्वी २४२ व्या वर्षाच्या सुमारास पुष्कळ ग्रंथ

गेले. आणि त्यांतच बौध्द्धर्मविषयक असे अनेक ग्रंथ होते. हे "**पीतकत्रय**" या नांवानें अजून देखील द्वीप मजकुरीं सुप्रसिद्ध आहेत.

ब्रह्मदेशांत मिळालेले ग्रंथ.

**बौद्ध**धर्मासंबंधीं माहिती **ब्रह्म**देशांतूनही बरीच मिळाली असून, **बिगान्डेट्कृत गौतमच**रित्रांत तद्विषयक इतिवृत्तांत आहे.

उत्तरस्थ महायान, व दक्षिणस्थ हीनयान नामक बौद्धस्मृति.

**नेपाळ, तिबेट, चीन,** आणि **जपान,** या उदीचीन देशांतील बौद्धधर्मास **उत्तरस्थ बौध्द्धर्म,** आणि **सिंहलद्वीप व ब्रह्मदेश,** येथें चालत असलेल्या बौद्धधर्मास **दक्षिणस्थ बौध्द्धर्म** ह्मणतात. उत्तरस्थ बौध्द्धर्मांत **महायान** नामकस्मृति पाळतात; आणि दक्षिणस्थ बौद्धधर्मांत **हीनयान** नांवाच्या स्मृतिवचनाला मान देतात.

बौद्धधर्मग्रंथाचा द्वीपांतरीं प्रसार.

**चीन** देशांत, **बौध्द्**धर्माचा शिरकाव इ० स० च्या पहिल्या शतकापासून झाला. तथापि, इ० स० च्या चौथ्या शतकापर्यंत तो राजधर्म झाला नव्हता. **सिंहलद्वीपांत** इ० स० पूर्वी तिसऱ्या शतकांतच ह्या धर्माचा फैलाव झाला, आणि तेथील **तिस्स** नामक राजानें तो धर्म इ० स० पूर्वी २४२ व्या वर्षी स्वीकारला. व एतन्निमित्तच, **अशोक** बादशहानें आ-

पल्या **महेन्द्र** नांवाच्या मुलास मोठ्या लवाजिम्यानिशीं त्या बेटांत पाठविला होता.

**अशोक** हा **बौध्द**धर्माचा मोठाच अभिमानी व पोषिंदा होता. त्यामुळें, **भरतभूमींत, आशियाखंडांत,** व **द्वीपांतरीं** देखील ह्या धर्माचा प्रसार व्हावा ह्मणून त्यानें आपल्या हयातींत एकसारखा प्रयत्न चालविला. **इतकेंच नव्हें** तर, **यूरोप** आणि **आफ्रिकाखंडांत** सुद्धां, तध्दर्म प्रसारार्थ त्यानें आपले धर्मोपदेशक पाठविले. आणि **त्याप्रमाणें सिंहलद्वीप, सीरिया, मासेडोनिया,** व **इजिप्त ( मिसरदेश ),** येथें त्यांनीं आपला कार्यभागही साधला,

आशिया, यूरोप, व आफ्रिकाखंडांतून तद्विषयक प्रसार.

**बुध्दा**चा निर्वाणकाळ झाल्यावर, पहिली **संगीति** ह्मणजे धर्मसभा, इ० स० पूर्वीं ५४३ व्या वर्षीं भरली असल्याविषयीं बहुमत आहे. ह्या परिषदेंत (१) **बुध्दानें** आपल्या चेल्यांस शिकविलेले पाठ, ( २ ) त्यानें त्यांस केलेला उपदेश, आणि ( ३ ) त्यानें अमलांत आणिलेलीं **नीतितत्त्वें**, यांविषयींचेंच विवेचन करण्यांत आलें, आणि त्यांसच पुढें **पीतकत्रय** असें नांव पडलें; व तीं १ **सूत्रपीतक**, २ **विनयपीतक**, आणि ३ **अभिधर्मपीतक**, या नामधेयानें

पहिली बौद्धधर्म सभा व पीतकत्रय.

१ सूत्रें. २ विनय. ३ अभिधर्म.

अजूनही सुप्रसिद्ध आहेत. ही पहिली **धर्मसभा राजगृह** येथें भरली होती.

दुसरी बौद्धधर्म सभा.

तदनंतर शंभर वर्षांनीं, म्हणजे इ० स० पूर्वी ४४३ सालीं, दुसरी **बौध्द्धर्म सभा (संगीति), वैशाली** येथें भरली. हींत **बौध्द्धर्मांत** असलेले अनेक मतभेद काढून टाकण्याविषयींची चर्चा झाली. परंतु इच्छित हेतु सिद्धीस न जातां, तींत उलट तटच पडले.

याप्रमाणें, आपापसांत अशी फाटाफूट झाली, तरी **बौध्द्धर्माची** वाढ ह्मणून बिलकूल खुंटली नाहीं. इतकेंच नव्हे तर, तो एकसारखा वृद्धिंगतच होत चालला; आणि पुढील दोनशें वर्षांच्या मुदतींत, त्यानें बहुतेक **उत्तरहिंदुस्थान** व्यापून टाकिलें.

तिसरी बौद्धधर्मसभा, व धर्मस्तपुकांचा प्रसार.

पुढें, अशोक **बादशहा** गादीवर बसल्यानंतर तर, ह्या धर्माला प्रत्यक्षच राजाश्रय मिळाला; आणि इ० स० पूर्वी २४४ व्या वर्षी, त्यानें तिसरी **संगीति**, ह्मणजे **बौद्ध धर्मसभा, पाटणा** येथें भरविली. हींत एक हजार सभ्य गृहस्थ जमले असून, बुध्दाच्या नांवावर जे कांहीं अनाचार करण्यांत येत असत, ते ह्यांनीं अजिबात बंद केले. आणि ह्यानंतर

लत्करच दक्षिणआशियांत बौध्दधर्म सर्वत्र पसरत चालला, व धर्मपुस्तकेंही तयार करण्यांत आलीं.

अशोकाच्या वेळीं, बौद्धधर्माची व्याप्ति.

**बौध्दधर्म** प्रसृत करण्याच्या संबंधानें **अशोक** बादशहानें आपली कीर्ति खचित अजरामरच करून ठेविली. **यूरोपखंडांतील व्होलगा** नदीपासून तों तहत **जपानपर्यंत**, व **सिंहलद्वीप** आणि **सुह्म (सायाम)**, यां देशापासून तों थेट **मोंगोलिया** आणि **सायबीरियापर्यंत, बौध्दधर्माचा** चांगलाच बोलबाला होता. किंवा, थोडक्यांत पर्यायानें असेंही ह्मटलें तरी चालेल कीं, **व्होलगा** नदीपासून तों तहत **स्थीरमहासागरापर्यंत**च्या पूर्वपश्चिम प्रदेशांत, आणि **हिंदीमहासागरापासून** तों थेट **उत्तरमहासागरापर्यंत**च्या दक्षिणोत्तर सरहद्दींत, बौध्दधर्मध्वज बराच कालपर्यंत एकसारखा फडकत राहिला होता.

धर्मसंबंधानें अशोकाची कीर्ति.

इतकेंच नव्हें तर, बौध्दधर्माच्या संबंधानें **अशोक** बादशहाचें नांव सर्वतोमुखीं होतें. त्याची धवलकीर्ति सर्वांच्या कर्णरंध्रांत दुमदुमत होती. आणि तद्विषयक प्रेमचंद्रिकेच्या योगानें, अखिल जनाच्या चित्तचकोरास अत्यानंद होत होता.

---

I "His (Asoka's) name is honoured wherever the teachings of the Buddha have spread, and is reverenced from the Volga to Japan, from Ceylon and Siam to the borders of Mongolia and Siberia."
(Rhys Davids, on Buddhism. p. p. 221-222).

या संबंधानें एका ग्रंथकारानें असें म्हटलें आहे कीं,

अशोकाची इतरां- शीं तुलना.

प्राणिमात्राच्या कीर्तीचें प्रमाण, त्याला पूज्य मानणाऱ्या लोकांच्या संख्येवरूनच जर करणें न्यायाचें आणि प्रशस्त होईल, अथवा त्याला पूजार्ह मानून त्याची जे जे लोक म्हणून प्रशंसा करितात किंवा त्याचे जे कोणी गुणानुवाद गातात, त्यांच्या परिमाणावरूनच जर तें सिद्ध करता येण्यासारिखें असेल, तर यूरोपखंडांतील सुप्रसिद्ध पुरुषद्वय शार्लेमेन आणि सीझर यांच्यापेक्षां देखील, अशोक बादशहाच्या कीर्तीचा परिमल प्रचंडतर होता.

पुढें कनिष्क राजाच्या कारकीर्दीत, बौद्धधर्माची

---

1 Says Koppen, 'If a man's fame, cau be measured by the number of hearts who revere his memory, by the number of lips who have mentioned and still mention him wtth honour, Asoka is more famous than Charlemagnə or Caesor.'

२ हा इ० स० च्या दहाव्या वर्षाच्या सुमारास राज्य करूं लागला असल्याचें कित्येक पंडितांचें मत आहे. व चवथी संगीति नामक धर्मसभा इ० स० ४० सालीं भरली असावी असें वाटतें. कनिष्क राजाचें राज्य फार विस्तृत असून, काबूल, हिंदुकुश, बोलरपर्वत, यार्कंड, खोतन, काश्मीर, लडाक, मध्यहिमालयपर्वत, आग्र्यापर्यंत गंगा व यमुना नदीच्या कांठचा प्रदेश व त्यावरील मैदानें, राजपुताना, गुजराथ, सिंध, आणि पंजाब, हे त्याच्या अमलाखालीं होते.

चौथी बौद्धधर्मसभा व कारिकात्रय.

चवथी सभा ( **संगीति** ) भरली, व हींत पांचशें **पंडित** जमले होते. ह्यांनीं **पीतकत्रया**वर कारिका **म्हणून** तीन टीकारूप ग्रंथ केले, व ते खालीं लिहिलेल्या नांवांनीं सुप्रसिद्ध आहेत.

१ **उपदेश** नांवाची कारिका सूत्रपीतकावर केली. २ **विनयविभाषाशास्त्र** नांवाची टीका विनयपीतकावर केली. आणि ३ **अभिधर्मविभाषाशास्त्र** नांवाची वृत्ति अभिधर्मपीतकावर केली. ह्या प्रत्येकांत एक लक्ष श्लोक असल्याविषयीं **हूणसंग** लिहितो.

पांचवी बौद्ध धर्मसभा.

इ० स० ६३४ साली, **शिलादित्य** बादशहाच्या कारकीर्दींत, **बौध्द**धर्माची पांचवी सभा ह्मणजे शेवटली **संगीति**, **कनोज** ( **कान्यकुब्ज** ) येथें भरली होती. त्यावेळीं, **हीनयान** नामक स्मृतिवचनांतील उपदेश दूषणार्ह ठरला.

---

# भाग ४२ वा.

## ख्रिस्तिधर्म.

मागील भागांत हिंदुधर्मापासून बौद्धधर्माची कशी उत्पत्ति झाली, हें थोडक्यांत सांगितलें. सबब प्रस्तुत भागांत, बौद्धधर्मापासून ख्रिस्तिधर्म कसा उदयास आला, या विषयींचें थोडेसें दिग्दर्शन करूं.

*बौद्धधर्मापासून ख्रिस्तिधर्माची उत्पत्ति.*

आतां, ख्रिस्तिधर्माचें विवेचन करितांना, ह्या धर्मावर बौद्धधर्माचा झालेला संस्कार ज्याप्रमाणें ठायीं ठायीं दृष्टिगोचर होतो, त्याचप्रमाणें हिंदुधर्माचा गंधही त्या धर्मांत अनेक वेळा दृष्टीस पडतो. आणि तसें होणें देखील अगदीं साहजीकच आहे.

*हिंदु व बौद्धधर्मांचे त्याजवर झालेले संस्कार.*

कारण, हिंदुधर्माच्या आद्यनिर्झरापासूनच अन्य धर्मांचे प्रवाह प्रसृत झाले आहेत. आणि त्यामुळेंच, त्या मुळच्या झऱ्यांतील प्रतिबिंब व झांक, अथवा स्वाद आणि माधूर्य, हीं तत्प्रसृत प्रवाहांत किंवा शाखांत अवश्य आविर्भूत व्हावींत, यांत कांहींच नवल नाहीं. मात्र,

हिंदुधर्माचा अन्य धर्मांवर झालेला संस्कार अथवा गंध, क्वचित् ठिकाणीं अगदीं प्रत्यक्ष नजरेस येतो, किंवा कित्येक स्थळीं तो केवळ पर्यायानेंच भासमान् होतो.

ह्यासाठीं, ख्रिस्तिधर्मावर, बौद्धधर्माचे अगर हिंदुधर्माचे जे जे संस्कार म्हणून घडून आले, अथवा त्यांचें प्राबल्य जितक्या जितक्या अंशानें म्हणून परिणामाप्रत पावलें, त्या सर्वांचें यथावकाश वर्णन, व प्रसंगानुसार विवेचन करण्याचा आपण प्रयत्न करूं.

त्यांचा प्रकार.

प्रथमतः ख्रिस्तिधर्माची उत्पत्ति होण्याला बौद्धधर्म कसा व केव्हां प्रवृत्त झाला, हें थोडक्यांत सांगून, नंतर बौद्ध व हिंदुधर्माचे संस्कार सदहू ख्रिस्तिधर्मावर कशा प्रकारें घडून आले, याविषयीं सविस्तर विवेचन करूं.

हिंदुस्थानांत बौद्धधर्माची सुरुवात इ० स० पूर्वी पाचशें वर्षे झाली असून, हा धर्म अन्य देशांत, व द्वीपांतरीं अशोक बादशहाच्या कारकीर्दीत विशेष फैलावला.

अशोक बादशहा-चा धर्मप्रसार व त्याचा परिणाम.

अशोक बादशहानें ग्रीस देशांतल्या पांच राजांशीं तह केला, आणि बौद्धधर्मप्रसारार्थ सीरिया, आर्मिनिया, पालेस्टाईन, ईजिप्त ( मिसरदेश ), मासिडोनिया, आणि सिंहलद्वीप, वगैरे ठिकाणी, म्हणजे आशिया, यूरोप, व आफ्रिका, या तिन्ही खंडांत

त्यानें अनेक धर्मोपदेशक पाठविले. तदनंतर ह्या लोकांनीं आपली इतिकर्तव्यता बजाविली, आणि प्रांतोप्रांतीं फिरून बौद्धधर्माचीं मतें सर्वत्र प्रसृत केलीं. इतकेंच नव्हे तर, अमीर व उमराव, बडे लोक व सामान्य जन, श्रीमान व दरिद्री, आणि सुसंस्कृत व प्राकृत मंडळी, इत्यादिकांस ह्या धर्माचें खरें इंगीत त्यांनीं समजावून दिलें. त्यामुळें, एकंदर समाजावर ह्या धर्मोपदेशाचा परिणाम लवकरच होत चालला, व त्यांचा इच्छित कार्यभाग सिद्धीस गेला.

अशा प्रकारें, बौद्धधर्माचा उपक्रम बऱ्याच मजबूत पायावर झाला असल्याकारणानें, त्याचें पाऊल उत्तरोत्तर पुढेंच पडत चाललें. तेव्हां अर्थात्‌च, लोकमतावर ह्या धर्माचा संस्कार हं हं म्हणतां होत गेला. आणि त्यांतील तत्त्वें कित्येकांच्या हृत्पटिकेवर बिंबलीं जाऊन, तींच पुढें खिस्तिधर्मोदयास थोड्याबहुत प्रमाणानें कारणीभूत झालीं.

तद्विषयक पाश्चात्यांचें मत.

आतां, बौद्धधर्माचा परिणाम खिस्तिधर्मावर झाला असल्याविषयीं, बहुतेक पाश्चात्यांचें ठाम मत आहे. ह्यांपैकीं कित्येक असें म्हणतात कीं, खिस्तिधर्म उदयास येण्याला बौद्धधर्म हा एकप्रकारचें साधनच

1 "Some moderate Christians admit that

( पुढें चालू. )

झाला, व शेवटीं त्याजवरच ख्रिस्तिधर्माची इमारत रचण्यांत आली. कांहींजण असें प्रतिपादन करितात कीं, ख्रिस्तिधर्म म्हटला म्हणजे बौद्धधर्माचें एक लहानसें पिलूं, किंवा त्याची एक छोटेखानी नक्कलचं[1] होय. आणि कांहींचें तर असें मत आहे कीं, ख्रिस्तिधर्म हा प्रत्यक्ष बौद्ध[2] धर्मापासूनच उद्भवला आहे.

असो. बौद्ध आणि ख्रिस्तिधर्माचें साम्य मानण्याला, किंवा बौद्धधर्मापासूनच ख्रिस्तिधर्म उद्भवला आहे अशी खात्रीपूर्वक कल्पना करण्याला, केवळ सदरीं निर्दिष्ट केलेले लेखच बस्स आहेत. कारण, ते शोधक विद्वानांनीं आणि बहुश्रुत पंडितांनीं अनेक प्रमाणांवरूनच

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू चालू. )

Buddhism in Syria was a preparation , a "forerunner' ( to quote the word used by Professor Mahaffy ) of the religion preached by Jesus over two centuries later." (Dutt's Ancient India and its civilization. ) p. 446.

1 " That Christianity was but an inferior copy of a greater original. "

( India. What can it teach us ?. By Pro. Max Muller. p. 279).

2 "A few writers like Bunsen, Seydel, and Lillie go further, and maintain that the Christian religion has sprung directly from Buddhism. "

( Dutt's Ancient India and its civilization.p.446)

लिहिलेले आहेत. सबब, ते सर्वथैव अथवा कांहीं अंशानें तरी, मांन्य करण्यास बिलकूल प्रत्यवाय नाहीं.

तथापि, ह्या त्यांच्या लेखापेक्षांही जास्त बलवत्तर असे अन्य दाखले उपलब्ध होण्यासारिखे आहेत कीं काय, याविषयीं आपण चांगला आणि विशेष काळजीपूर्वक शोध करूं, आणि त्याच्याच मुलाखानें व तावानें हें साम्य कायम ठरतें कीं काय, तें पाहूं.

त्यासंबंधीं मूळग्रंथांवरून प्रमाणसिद्धि.

आतां, एतद्विषयक खात्रीपूर्वक माहिती मिळण्यासारखे ग्रंथ म्हटले म्हणजे, सदरहू दोन्ही धर्मांतील धर्मपुस्तकें होत. सबब, याच धर्मपुस्तकांचा किंवा पवित्र शास्त्रांचा आश्रय धरून, त्यांत कांहीं मिळालें तर आपण पाहूं.

बौद्धधर्मशास्त्राचीं मुख्य पुस्तकं म्हटलीं म्हणजे १ ललित विस्तार[1], आणि २ पीतकेत्रय[2], हीं असून, ख्रिस्तिधर्माचें पवित्रशास्त्र बायबल होय. ह्या सर्वांचें अवलोकन केलें म्हणजे सदरहू धर्मद्वयांचा कसा अत्यन्त निकटसंबंध आहे, व त्या परस्परांचें कसें विशेष साम्य आहे, हें चांगलें व्यक्त होतें.

बौद्ध धर्मांतील हकीकत,

१ ह्या ग्रंथाला उत्तरस्थ बौद्धधर्मानुयायी अगदीं प्रमाण मानतात.

२ हा दक्षिणस्थ बौद्धधर्मानुयायांचा प्रमाणग्रंथ आहे.

बुध्दाच्या जन्माच्या वेळीं जे नानाविध चमत्कार झाले, तेच किंवा तशा मासल्याचे येशूख्रिस्ताच्या जन्मकाळींही घडून आले. पुढें, बुध्दाची बाल्यावस्था जाऊन त्याला युवावस्था प्राप्त झाल्यावर, तो ह्या संसारसुखाविषयीं फारच उद्विग्न आणि विरक्त झाला. त्याकारणानें, त्यानें आपलें घरदार सोडिलें; सर्व संसाराचा त्यानें त्याग केला; आणि शेवटीं **उरुवेला** नामक निबिड अरण्यांत तो तपश्चर्येसाठीं गेला. येथें कांहीं दिवस राहून, तेथून त्यानें आपला मुक्काम उठविला, आणि शेवटीं **निरंजरा** नदीच्या कांठींच आपला तळ दिला. या ठिकाणीं, त्याचें सत्वहरण करण्याच्या उद्देशानें, **मारानें** ( काम देवानें ) त्याची जेम जेम पिछाडली, व अत्यंत पीडाही केली. परंतु ह्या प्रसंगीं, तो यत्किंचित् देखील डगमगला नाहीं. इतकेंच नव्हें तर, त्यानें अलौकिक धर्माचें अवलंबन केलें, आणि विलक्षण शान्ति दाखविली. त्यामुळें, ओढवलेल्या संकटापासून तो पार पडला, व शेवटीं त्याल तत्त्वज्ञानही प्राप्त झालें.

व ख्रिस्तीमतांतील हकीकत, यांचें साम्य.

**येशूख्रिस्ताची** देखील हुबेहूब हीच हकीकत आहे.

ज्याप्रमाणें, तत्त्वज्ञान प्राप्त झाल्यानंतर, **गौतमबुद्ध**

१ बायबल. नवा करार. अध्याय ४. गीत १ ते ११ मात्थ्यू पुस्तक पहा.

बाहेर पडला; त्यानें आपल्या शिष्यांस आज्ञा केली; लोकोपदेशार्थ तो देशोदेशीं फिरला; अपंगांस त्यानें सामर्थ्य दिलें; अनेक रोग्यांस बरें केलें; आणि नानाविध चमत्कार दाखविले; त्याचप्रमाणें येशूख्रिस्तानें देखील केल्याचें दिसतें.

परधर्मीयांचें धर्मान्तर करवून, त्यांजला आपल्या कळपांत घेण्यासाठीं गौतमबुद्धानें नानाप्रकारचे उपाय योजिले. आणि एकेप्रसंगीं तर, भारद्वाज नांवाच्या ब्राह्मणाला शेताचें रूपक पारमार्थिक दृष्टीनें दाखवून, त्यानें त्याचें धर्मान्तरही करविलें.

येशूख्रिस्तानें देखील अगदीं हुबेहूब अशाच मासल्याच्या उपायांनीं लोकांचें चित्त वेधलें, आणि नानाविध संस्कारांनीं त्यांचें धर्मान्तर करविलें.

असो. अशा प्रकारचीं हुबेहूब आणि निकट साम्यें अनेक दाखवितां येतील. परंतु तसें केलें तर, अनुचित सीमोल्लंघन होऊन, विषयमर्यादेचें अतिक्रमण केल्याचा दोष येईल. सबब, हा साम्यादर्श जरासा आटपताच घेतों.

आतां, कोणी असें म्हणेल कीं, अहो ! सर्व साधारण

---

१ बायबल. नवा करार. अध्याय ४. गीत १६ते २५, मात्थ्यूचें पुस्तक पहा.

सदर. सदर. अध्याय ११ गीत १ ते ६ मात्थ्यूचें, पुस्तक पहा.

२ बायबल. नवा करार. अध्याय १३. गीत ३७ ते ४४; मात्थ्यूचें पुस्तक पहा.

साम्य हें कोठेंही गेलें तरी मिळणारच. सबब, केवळ तेवढयाच कारणानें एक धर्म दुसऱ्याचा ऋणी आहे, असें यथार्थ ह्मणतां येणार नाहीं.

होय. ही गोष्ट आम्हांला सुद्धां अगदीं कबूल आहे. आणि ह्याच कारणासाठीं, आम्हीं अल्पस्वल्प साम्यें तर अजिबात गाळाऊंच केलीं आहेत, व येथें फक्त महत्वाच्या साम्यांचा मात्र उल्लेख केला आहे.

अस्तु. येथपर्यंत आपण **गौतमबुद्ध** आणि **येशूख्रिस्त,** यांच्या आयुष्यक्रमांतील ठळक ठळक गोष्टींच्या साम्यांचा विचार केला. सबब, सदरहू पुरुषद्वयांच्या **१ धर्मसंस्थांत, २ नित्यविधींत,** आणि **३ तत्वविचारांत,** कितपत व कोणत्या प्रकारचें साम्य आहे, हें पाहूं.

सदरहू दोन्ही धर्मांतील धर्मसंस्थांचें साम्य.

**ख्रिस्तिधर्म** पंथांतल्या कित्येक पुस्तकांत व लोकांत, "**सशपथत्याग**" म्हणून एक विधि प्रचारांत आहे. त्यांत, **बुध्द** आणि **साक्यमुनि** हे शब्द किंवा त्यांचा अपभ्रंश असल्याचें चांगलें व्यक्त होतें.

---

I "The form of abjuration for those who" renounced the Gnostic doctrines of Manes, expressly mentions Buddha ( and the Scythian or Sâkya )—seemingly, says Weber, a separation of Buddha the Sâkya, into two."

(Dr. Hunter's Indian Empire. p. 150).

( पुढें चालू. )

सेंट्जोसाफट् नांवाचा जो सुप्रसिद्ध साधु ख्रिस्तिधर्मांत होऊन गेला, तो दुसरा कोणी नसून, निःसंशय गौतमबुद्धच होय.

जोसाफट् व बोधिसत्व.

जोसाफट्चें ग्रीक भाषेंतील रूप इओसाफ् असून,

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

vide also Weber. ( H. I, L. p. 309. ) note 363.

Do. Do Lassen, III 415—cf. also Beal, J. R. A. S. II 424 ( 1866 ).

1 " Professor Max Muller endeavoured to show that Buddha himself is the original of Saint Josaphat, who has a day assigned to him by both the Greek and Roman churches. "

( Dr. Hunter's Indian Empire. p. p. 150-151).

( vide also Chips from a German workshop. vol IV p. p. 177-189. Edn. 1875.)

2 " The earlier form of Josaphat was Ioasaph in Greek, and Youasaf or Youdasf in Arabic, an evident derivation from the Sanskrit Boddhisatwa, through the Persian form Boudasp ( Weber ). The name of the magician Theudas is in like manner an accurate philological reproduction of Devadatta or Thevdat. "

" For this magician, Theudas, the Buddhistic Schismatic Devadatta is supposed to have supplied the original; while the name of Josaphat is itself identified by philologers with that of Boddhisatwa, the complete appellation of Buddha. "

( The Indian Empire. By Dr. Hunter. p. 151 )

तें आरबी भाषेंतील यूसफ् किंवा युडस्फ शब्दापासून झालें आहे; व हें इराणी भाषेंतील बुडास्प शब्दाचें रूपान्तर असून, तें मूळच्या बोध्दिसत्व शब्दापासूनच झालें असल्याविषयीं, अनेक भाषाकोविदांचें शास्त्रीय मत आहे. आणि बोध्दिसत्व हें केवळ बुध्दाचेंच समग्र नामधेय होय.

नाना प्रकारच्या नित्यनैमित्तिक विधींतं तर, ख्रिस्ति-

---

1 "The crozier, the mitre, the dalmatic, the cope or pluvial which the grand Llamas were on a journey or when they perform some ceremony outside the temple, the service with a double choir, psalmody, exorcisms, the censer swinging on five chains and contrived to be opened or shut at will, benediction by the Llamas with the right hand extended over the heads of the faithful, the chaplet, sacerdotal calebacy, lenten retirements from the world, the worship of saints, fasts, processions, litanies, holy water, these are the points of contact between the Buddhists and ourselves ( Christians ). The good Abbe has by no means exhausted the list, and might have added confesions, tonsure, relic worship, the use of flowers light and images before shrines and altars, the sign of the cross, the Trinity in Unity, the worship of the Queen of Heaven, the use of religious books in a tongue unknown to the bulk of the worshippers, the aureole of nimbus, the crown of saints and Buddhas, wings to angels, penance, flagellations,

( पुढें चालू. )

नित्यविधींत साम्य. धर्माचें बौध्दधर्माशीं कांहीं विलक्षण साम्य दिसून येतें. आणि ही गोष्ट मोठमोठ्या ख्रिस्तिधर्माभिमान्यांस देखील अगदीं निरुपायास्तवच कबूल करणें भाग पडतें.

अभिषेक व बाप्तिस्मा. बौध्दधर्माची दीक्षा देतांना जो अभिषेकविधी म्हणून करावा लागतो, तो देखील ख्रिस्तिधर्मानें ह्याच धर्मातला उचलला आहे. आणि त्याला तद्धर्मीय बाप्तिस्मा असें म्हणतात.

---

( मागील पृष्टावरून पुढें चालू. )

the flabellum or fan, popes, cardinals, bishops abbots, presbyters, deacons, the various architectural details of the Christian temple. To this list Balfour's Cyclopoedia of India adds amulets, medicines, illuminated missals, and Mr. Thomson (Illustrations of China, vol II. p. 18), baptism the mass, requiems."

( Mr. Arthur Lillie, and Buddhism in Christendom ). p. 202.

•1 " Baptism is common to Buddhism and to Christianity, and indeed John the Baptist adopted the rite of Baptism from the Essenes, who admittedly represented the Buddhist movement in Palestine, before the birth of Christ. When Jesus was a young preacher in Galilee, the fame of John

( पुढें चालू. )

स्वस्तिक व क्रूस.

आह्मा हिंदूंचें आणि बौध्द्धर्माचें जें स्वस्तिक[1] नांवाचें चिन्ह आहे, त्याचाही ख्रिस्तिधर्मानें सप्रेम स्वीकार करून, शेवटीं त्याचाच क्रूस बनविला आहे.

पापनिवेदन.

पापनिवेदनविधीचा प्रकार देखील खिस्तिधर्मानें बौध्द्धर्मातूनच उचलून घेतल्याचें[2] दृष्टिगोचर होतें.

याप्रमाणें, बौध्द्धर्मातील अनेक प्रकारच्या ऋणांचा, व नानाविध अनुकरणांचा अंगिकार, खिस्तिधर्मानें साल्हाद केला असून, हा स्वीकार कित्येक ठिकाणीं प्रत्यक्ष व पर्यायानें केल्याचें दिसतें; आणि कित्येक ठिकाणीं तो अगदीं हुबेहूब व अक्षरशः अमलांत आणिल्याचें भासमान होतें. व ही गोष्ट अनेक प्रमाणांवरूनही चांगली सिद्ध[3] होत आहे.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

the Baptist reached him. Jesus went to John and lived with him , and no doubt learnt from John much of the precepts and teachings of the Essenes , and adopted the rite of baptism , which John had practised so long. "

( Buddhism and Christianity. vide Dutt's Ancient civilization in India. p p. 448-49. )

1 Times of India.

2 Buddhism in Christendom. p. 202.

3 " We have proved that Buddhism was

( पुढें चालू. )

आतां, तत्वविचारांत देखील ख्रिस्तिधर्मानें बुध्दाचें, व त्याच्या शिष्यांचें, आणि त्याच्या अनुयायिजनांचें भरपूर अनुकरण केलें असल्याचें उत्तमप्रकारें व्यक्त होतें.

तत्वविचारांत साम्य.

बौध्दधर्मांत जी त्रिमूर्ति दिसून येते, तीचें ख्रिस्ति-

---

( मागील पृष्टावरून पुढें चालू. )

preached in Syria, in the third century B. C. We have proved that Budphism was received in Palestine and Egypt, and that sects answering to the Buddhists, lived in those countries when Christ was born, and have been described in the impartial pages of Pliny. We have proved that Christ came in contact with their rites and teachings through John, as well as through various other channels probably. And lastly, we have shown the remarkable resemblance between Christian moral precepts and Buddhist precepts in sentiment and in language, between Christian resignation of the world and Buddhist resignation, between Christian and Buddhist rites and legends and forms. Is this coincidence fortuitous" ?

१ Buddhism and Christianity. Dutt's Ancient civilization of India. p. p. 453-54.

1 " A Christian acknowledges the Father, the Son, and the Holy Ghost at baptism, while a Buddhist, after *Abhisheka*, acknowledges Buddha, Dharma, and Sangha. Mr. Arther Lillie contends

( पुढें चालू. )

धर्मांत दृग्गोचर होते. ही त्रिमूर्ति म्हटली म्हणजे बुध्द, धर्म, आणि संघ, अशी बौध्दधर्मातील असून, ख्रिस्तिधर्मातील त्रिमूर्ति पिता, पुत्र, व आत्मा, या नांवानें सुप्रसिद्ध आहे.

जन्मांतर आणि कर्म हीं हिंदुधर्मांतूनच बौध्दधर्मानें उचललीं असून, तींच ख्रिस्तिधर्मानें आपल्या धर्मांतहीं सामील केलीं आहेत. आणि मागील जन्मांतील पापामुळें आपणांस कष्ट भोगावे लागतात, अथवा जन्मातरींच्या दुष्कृतीमुळें देहदंडही पडतो, किंवा तत्-

जन्मान्तर व कर्म.

---

(मागील पृष्ठावरून पुढें चालूं.)

that the Father and the Son of the Christian doctrine represent the Buddha and the Dharma of the Buddhist doctrine, and that the Holy Spirit and Sangha represent the same primal idea of "Union."

(Buddhism and Christiauity, Dutts' Ancient History of India. p. 449.)

1 "We will make a passing allusion to the theory of metempsychosis, which was first originated in India, and borrowed from the Hindus by Pythagoras in the 6th century, B. C. Buddhists accepted the belief, and the Jews of the time o Jesus Christ universally held the doctrine unde the name of Gilgal."

(Buddhism and Christianity. Dutts' Ancien History of India. p. 449.)

संबंधानें अनेक व्यंगताही प्राप्त होतात, अशी हुबेहूब समज ख्रिस्तिधर्माची[1] असल्याचें प्रत्यक्ष प्रमाणांवरून व्यक्त होतें.

असो. आता, गौतमबुध्दाच्या धर्मांतील महत्वाच्या आज्ञा कोणत्या याविषयीं विचार करून, त्यांचेंच अनुकरण ख्रिस्तिधर्मांत किती अंशानें केलें आहे, तें पाहूं.

बुध्दाची[2] सांगी अशी आहे कीं, १ सर्व ऐश्वर्याचा त्याग करावा; २ दैन्य धारण करावें; ३ शान्ति राखावी; ४ नम्रता ठेवावी; ५ न्यायानें वर्तावें; ६ दयाशीलता अंमू द्यावी; ७ अन्तःकरण शुद्धता असावी; ८ हत्या करण्याचें वर्जावें; ९ व्यभिचार करूं नये; १० खोटें बोलूं नये; ११ दारू पिऊं नये; आणि दुसऱ्याचा द्वेष करूं नये; इत्यादि.

बुद्धाच्या आज्ञा.

ख्रिस्तिधर्मांत देखील हुबेहूब हाच प्रकार दिसून येतो. बायबलांत असें सांगितलें आहे कीं, [3] " आपल्याकरितां संपत्ती सांठवूं नका; व आपण काय खावें व काय प्यावें अशी आपल्या जीवाविषयीं, आणि आपण काय पांघरावें अशी आपल्या शरीराविषयीं, का-

ख्रिस्ताच्या आज्ञा.

1 " Who did sin, this man or his parents, that he was born blind " ? ( John. IX. 3 ).

२ बौद्धधर्मांतील मुख्य ग्रंथ पहा. पीतकत्रय, दीपवंश, महायान, हीनयान, जातक, वगैरे ग्रंथांत, एतद्विषयक सविस्तर विवेचन आहे.

३ बायबल. नवा करार. मात्थ्यू. अ. ६ ( १५. २५ ).

ळजी करूं नका; २ जे आत्म्यानें दीन ते धन्य; ३ जे शोक करितात ते धन्य, कारण ते शान्तवन पावतील; ४ जे नम्र ते धन्य; ५ ज्यांस न्यायीपणाची भूक व तहान लागली आहे ते धन्य; ६ जे दयाळू ते धन्य, ७ जे अन्तःकरणानें शुद्ध ते धन्य; ८ तूं हत्या करूं नकोस; ९ व्यभिचार करूं नकोस; १० खोटी शपथ वाहूं नकोस; आणि तुझें बोलणें होय तर होय, व नाहीं तर नाहीं, असें असावें; ११ तुम्ही आपल्या वैऱ्यावर प्रीति करा; १२ जे तुम्हांस शाप देतात त्यांस आशिर्वाद द्या; जे तुमचा द्वेष करितात त्यांचें बरें करा;" इत्यादि.

सदरहूवरून एकंदरीनें, ख्रिस्तिधर्म हा बौध्दधर्माची अगदीं हुबेहूब नकलच असल्याविषयीं आतां कांहीं एक शंका नसून, विद्वान लोकांचा देखील तदनुकूल असाच अभिप्राय आहे. इतकेंच नव्हें तर, ती गोष्ट सप्रमाणही सिद्ध आहे.

१ बायबल. नवा करार, मात्थ्यू अ. ५. ( ३ ते ८ ).

२ सदर. सदर. सदर. अ. ५. २१.

३ सदर सदर सदर अ. ५. २७.

४ सदर सदर सदर अ. ५. ३३—३७.

५ सदर सदर सदर अ. ५. ४४.

6 " Dean Mansel admits that the philosophy and rites of the Therapeuts of Alexandria were borrowed from the *B*uddhist missionaries who visited Egypt within two generations of the time of Alexander the Great. Philosophers like Schelling

( पुढें चालू. )

हिंदुधर्मांतील ख्रिस्तीधर्मानें केलेंले अनुकरण.

अस्तु. येथपर्यंत, बौध्दधर्मापासून ख्रिस्तिधर्म कसा उद्भवला, आणि त्याचा क्रमशः कसा विस्तार होत गेला, याचा केवळ स्थूलमानानें मात्र आपण विचार केला. आतां, प्रत्यक्ष हिंदुधर्माचेंच ख्रिस्तीधर्मानें किती अंशानें अनुकरण केलें आहे, व त्यांतील तत्त्वें कशीं उचलली आहेत, आणि त्यांचा कोठें अन्तर्भाव केला आहे, याविषयीं सूक्ष्म विचार करूं.

ख्रिस्तिधर्माचा मूळ पाया, किंवा आधारस्तंभ म्हटला म्हणजे बायबल होय. ह्यापेक्षां पुराणतर असा ह्या

---

snd Schopenhouer, and Lcholars like Lessen support this view. Dean Milman maintains that the Therapents sprang from the contemplative fraternities of India."

"The Essenes of Palestine were the same sect as the Theropens of Egypt." (Renan's life of Jesus).

"They alike adopted the Buddhist practice of enforced vegetarianism. They refused to go to the temple sacrifices at Jerusalem. They practised celebacy and beloived in the eight stages of progress answering to the eight-fold path of the Buddhist. They believed in baptism answering to the Buddhist *Abhisheka*. * * * John the Baptist adopted the Essene custom of baptism. It is maintained by some writers that the *B*aptist was an Essene himself."

( Buddhist and Christienity. Dutt's Ancient civivilization of India. p. p. 452/453 ).

( vide Bunsen's Angel Messiah of *B*uddhist, Essenes, and Christians. p. 149.)

धर्मांत अन्यग्रंथच नाहीं. व ह्याच्या पलीकडे त्याची मजलही नाहा. तेव्हां, ह्यांतच कांहीं मिळालें तर पाहूं, आणि साक्षात् आमचेंच ऋण ह्या धर्मानें किती घेतलें आहे, याचा शोध करूं.

कोणत्याही धर्मांतला आदिविषय किंवा शिरोभाग म्हटला म्हणजे सृष्ट्युत्पत्ति, सृष्टिस्थिति, आणि सृष्टि-लय, हाच होय. सबब आपण येथूनच प्रारंभ करूं, व आपल्या प्रस्तुत विषयाकडे वळूं.

सृष्टीच्या उत्पत्तीचें कारण जसें पुराणांतरीं निवेदन केलेलें दिसून येतें, तसेंच तें आमच्या पुराणस्मृतींत, पुराणतर श्रुतींत, आणि पुराणतम ऋगवेदसंहितेंतही सांगितलें असल्याचें दृष्टीस पडतें.

ऋग्वेदांत खालीं लिहिलेल्या ऋचेंत असें वर्णन श्रुतींतलें साम्य, आहे कीं, द्यू हा माझा बाप व उत्पादक आहे. तोच जगत्कर्ता आणि आदिकारण आहे. व ही विशाल पृथ्वी माझी आई आहे.

**द्यौर्मे पिता जनिता नाभिरत्र बंधुर्मे माता पृथिवी महीयम्। उत्तानयोश्चम्वोर्यो निरन्तरत्रा पिता दुहि-तुर्गर्भमाधात् ॥ ३३ ॥**

(अ. २, अ. ३, व २०, मं. १, अ. २२, सू. १६४.)

ह्यावरून, द्यू ह्मणजे आकाश हेंच अखिल विश्वाचें आदिकारण असून, त्यापासूनच सर्व सृष्टीची उत्पत्ति

झाली असल्याविषयीं आमचे आदिलेख जे वेद यांत स्पष्टच उल्लेख आहे.

श्रुतींत तद्विषयक असें खालीं लिहिल्याप्रमाणें वर्णन आहेः—

यतोवा इमानि भूतानि जायन्ते । येन जातानि जिवन्ति । । यत्प्रयन्त्यभिसंविशन्ति । तद्विजिज्ञासस्व । तद्ब्रह्मेति ।

स्मृतींतलें साम्य. आमच्या स्मृतींत असें सांगितलें आहे कीं,—

आसीदिदंतमोभूतमप्रज्ञातमलक्षणम् । * * *
ततःस्वयंभूर्भगवानव्यक्तोव्यंजयन्निदम् । * * *

म्हणजे हें अखिल विश्व प्रथम अव्याकृत असून, त्यांतूनच स्वयंभू भगवान् उत्पन्न झाला. तदनंतर त्यानें जल निर्माण केलें, व त्यांतच बीजाची उत्पत्ति झाली. पुढें ब्रह्माण्डरूपी विश्वांत परमेश्वरानें शयन केल्यावर, त्यानें भूमी उत्पन्न केली. त्यानंतर दिवस आणि रात्र कळण्यासाठीं, सूर्य, चंद्रादिग्रह, व नक्षत्रें झालीं. आणि आकाश व समुद्र, नद्या व पर्वत, पशु व पक्षी, कृमी व कीटक, पिशाच्च व राक्षस, नर व किन्नर, इत्यादि देखील त्यानेंच निर्माण केलें. अशा प्रकारचें, किंबहुना हुबेहूब हेंच वर्णन,

साम्यादर्श. बायबलांत दिसून येतें. तेव्हां, हिंदुधर्माचें हें जें अनुकरण करण्याचा ख्रिस्तीधर्मानें प्रयत्न

केला, त्याचें प्रत्यक्ष स्वरूप व साद्यन्त कल्पना लक्षांत येण्यासाठीं, सदरहू दोन्ही धर्मांच्या धर्मपुस्तकांतील उतारे, याखालीं, शीघ्रावलोकनार्थ देतों. त्यांवरून, वर निर्दिष्ट केलेलें साम्य वाचकांच्या संपूर्णपणें मनांत ठसेल.

आतां, हें साम्य दाखविण्यापूर्वी, या ठिकाणीं इतकें सांगणें अगदीं जरूर आहे कीं, **ख्रिस्तिधर्म** हा जितक्या अंशानें **बौद्ध**धर्माचा ऋणी आहे, तितक्याच अंशानें तो **हीब्र्यू**-धर्माचाही ऋणी आहे. कारण, **ख्रिस्ती**धर्मांतलीं कित्येक तत्त्वें आणि पौराणिक कथानकें, हीं **हीब्र्यू**धर्माच्या **जुन्या-करारावरच** अवलंबून आहेत; आणि ह्या **हीब्र्यूंच्या** पुराणग्रंथांतही आमच्या **श्रुतिस्मृती**सारख्या अति प्राचीन ग्रंथांतलीं कित्येक साम्यें अगदीं हुबेहूब दृष्टिगोचर होतात. त्यामुळें, पर्यायानें हिंदुधर्मापासूनच **ख्रिस्ति**धर्माची उत्पत्ति झाली, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. तथापि, ह्या **ख्रिस्ति** धर्मावर प्रत्यक्ष संस्कार **बौद्ध**धर्माचाच झाला असल्याकारणानें, त्याला **बौद्ध**धर्माचेंच **पिलूं** म्हटलें आहे.

हल्लीं, अगदीं नूतन झालेल्या शोधावरून असें कळून येतें कीं, **ख्रिस्ताच्या** चरित्राची इत्थंभूत हकीकत कोणी **एक एम्. निकोलस् नोटोव्हिच्** नामक **रशियन्** यात्रिकाला, **तिबेटांत लामा** नांवाच्या धर्माधिकाऱ्याजवळ मिळाली असून, ती खालीं लिहिल्याप्रमाणें आहे.

हा यात्रिक **तिबेटांत** फिरत असतां अझल्या घोड्या-

वरून पडला, आणि औषधोपचारासाठीं **लडक** परगण्यांतील **लेह** नांवाच्या शहरांत शिरला. तो आजारी पाहून, तेथील लोकांस त्याची दया आली; आणि त्याला नजीकच्या एका मैठांत नेऊन, तेथें त्याची सर्व प्रकारें त्यानीं काळजी घेतली व तरतूद ठेविली. पुढें एके दिवशीं, त्याच्या खोलींत, व तो ज्या खाटल्यावर पडला होता तेथें एक **लामा** गेला, आणि त्याच्याजवळ असलेलीं दोन बांधीव पुस्तकें त्यानें त्याला दाखविलीं. हें च इसाचें चरित्र असून, तें **पाली** भाषेंत होतें, आणि तें **लामा** मजकूर सदरहू **निकोलस्**ला वाचून दाखवीत असल्याकारणानें, त्याचें भाषान्तर जवळ असलेला दुभाषा करीत होता.

ह्या चरित्रावरून असें समजतें कीं, त्यांत ज्या **इसाचें** वर्णन केलें आहे, तोच **एसूख्रिस्त** असून, तो **जरूसेलम्** मधून **सिंधप्रांतांत** आला होता. पुढें, तेथून तो फिरत फिरत **आर्यावर्तांत** शिरला, आणि तदन्तर **जगन्नाथ, राजगृह, वाराणशी,** येथील यात्रा करून त्यानें **ब्राह्मणांजवळ वेदाध्ययन** केलें, व तो **संस्कृतही** शिकला. **परंतु** कांहीं कालानें तो त्यांजपासून निसटला, आणि **वेद ईश्वरप्रणित** नाहींत, असें प्रतिपादन करूं लागला. त्यानंतर **विश्रम** येथें त्याच्या जिवावरच येऊन बेतल्यामुळें, तो **गौतमबुद्धाचे** जे अनुयायीजन त्यांच्याच आश्रयानें राहिला, व त्यांच्याजवळ **पालीभाषेचें** ज्ञान संपादन करून, सहा महिन्यांच्या आंतच त्यानें **बौद्धधर्म** स्वीकारला.

इतकें झाल्यावर, त्यानें आपल्या जन्मभूमीची दिशा धरली, आणि मूर्तिपूजेची निन्दा व मूर्तिपूजकांचा निषेध करण्याबद्दलचा उपदेश करीत करीत, तो आपल्या एकोणतिसाव्या वर्षी जुडिया येथें पैरतला.

---

1 *A LIFE OF CHRIST FOUND IN THIBET.*— A new Life of Jesus Christ, the Paris correspondent of the *Daily News* says, has been discovered in a monastery of Thibet by a Russian traveller, and has been translated into French. This book of Jesus Christ is held in no less reverence by certain Buddhist than the Rig-Veda by the Brahmins. It is in the eyes of the Lamas a canonical book. M. Nicholas Notovitch, travelling in Thibet, heard in a monastery that the Buddhists knew and honoured the prophet Issa. Certain particulars of the life of Issa forced upon him the conviction that this prophet was Jesus Christ. He inquired of the Lamas where a history of his life was to be found. It was to be found in manuscripts preserved as sacred books in the Monasteries of Ladak. M. Notovitch went over the Ladak country visited the city of Leh, and at length stopped at a convent called Hemis. There he commenced negotiations for the manuscript. He sent present to the Lama—a watch, a thermometer, an alarum—but all to no purpose. Several days later an accident brought him what his diplomacy had failed to achieve. Riding in front of Hemis he broke his leg. He was received in the convent and nursed there. One day the Lama came into his room with two large volumes bound in paste board, the leaves being turned yellow by lapse of time. It was, the life of

( पुढें चाल. )

सदरहू विवेचनावरून, खिस्तानें बौद्धधर्माचें अध्य-

( मागील पृष्ठावरून पुढें चालूं. )

Issa, written in the Pali language. The Lama read it out verse by verse, M. Notovitch taking down his interpreter's translation. The following is a brief summary of this translation :—

" Issa was born in Israel. His parents were poor people belonging by birth ' to a family of exalted piety which forgot its former greatness on earth to magnify the Creator and thank Him for the misfortunes with which he was pleased to try them.' From his childhood he preached the one God On coming of age at thirteen, instead of marrying. according to custom, he held from his father's house, and went with merchants to Sind. At forteen he was living among the Arayas. He visited Juggernaut, Rejagriha, and Benares, where he learnt to read. and understand the Vedas. But one day he broke away from the Brahmins. He denied the divine origin of the Vedas and the incarnation of Para Brahma. In Vishma the white priests threatened his life. He took refuge with the Gowtamides learnt Pali and in six months was initiated into the mysteries of pure Buddhism. Then he went westward preaching against idols. In Persia he opposed the religion of Zoroaster, but he was persecuted by magicians, and fled. He was twenty-nine years of age when he returned to Judea. He at once began to preach, but his popularity alarmed Pontius Pilate. The latter summoned priests and learned men, to try Issa. The tribunal examined Issa, and pronounced him to be innocent. Issa, continued to speak to the people, inculcating obedience to Cæsar and res-

( पुढें चालूं. )

यन कितपत केलें होतें, हें ध्यानांत येईल. इतकेंच नव्हे तर, ख्रिस्तिधर्मांत बौद्धधर्माच्या तत्त्वांचें किती अंशानें संमिश्रण आहे, हेंही चांगलें कळेल.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालूं. )

pect for womankind, but spies which Pilate had set to watch him sent disquieting reports on the enthusiasm of the multitude, and the Governor fearing a mutiny caused Issa to be imprisoned, tortured, and tried before the Sanhedrin with two thieves. False witnesses were bribed this time. The Governor then called the witness who at the bidding of his master Pilate had betrayed Issa. This man came, and speaking to Issa, said, 'Did you not claim to be the King of Israel, when you said that the Lord of Heaven had sent you to prepare his people?' And Issa having blessed him said; 'You shall be forgiven, because what you say does not come from your heart.' And turning to the Governor Issa said: 'Why humble your pride and teach your inferiors to live in falsehood, since even without that you are able to condemn an innocent man.' At these words the Governor fell into a rage, and ordered the death of Issa, while he discharged the two thieves. The judges having deliberated, said to Pilate: 'We will not take upon ourselves the great sin of condemning an innocent man and of absolving two thieves, a thing contrary to our laws. Do, therefore, as you please.' Having thus spoken, the priests and wise men went out and washed their hands in a holy vessel saying 'We are innocent of the death of a just man.' Issa and the two thieves were crucified, but the third day Issa's sepulchre was found open and empty."

*( Times of India 3-4-9? )*

आतां, खिस्तिधर्मानें आमचा कित्ता कोणकोणत्या बाबतींत कसकसा गिरविला आहे, त्याविषयींचें थोडेसें दिग्दर्शन करूं.

**श्रुति व स्मृतींतील वचनें.**

हें जगत् प्रथमतः अंधकारांत लीनें, ह्मणजे तमोभूत, अथवा अव्याकृत अवस्थेंत होतें.

तदनंतर, ह्मणजे प्रलयावसानानंतर, **स्वयंभू भगवान** प्रकाशित झाला. व त्यानें त्या निर्माण केलेल्या वारिराशीवर **ब्रह्माण्ड**स्वरूप धारण करून, शयन केलें.

१ तम आसीत्तमसा गूढमग्रे । (इति श्रुतिः)

आसीदिदं तमोभूतमप्रज्ञातमलक्षणम् ।
( मनुस्मृतिः अ. १ श्लो. ५. )

२ स एकधा भवति द्विधा भवति । भगवानैश्वर्यादिसंपन्नः । ( इति श्रुतिः ).

ततः स्वयंभूर्भगवानव्यक्तो व्यंजयन्निदम् । महाभूतादि वृत्तौजाः प्रादुरासीत्तमोनुदः ॥
( म. स्मृ. अ. १ श्लो. ६ )

**बायबलांतील वचनें.**

“आणि पृथ्वी अस्ताव्यस्त व शून्य होती, आणि जलावर अंधार होता.

आणि देवाचा आत्मा जलावर हालत होता.”

१ बायबल. जुना करार. उत्पत्ति प्रकरण. ( अ. १. २. )
“2 And the earth was without form, and void; and darkness was upon the face of the deep.” ( The Bible. old Testament. The first Book of Moses. Chapter. I. )

२ बायबल. ( जु. क. अ. १. २. ).
“And the spirit of God moved upon the face of the waters.”

पुढें विविधप्रजा आणि जातिवैचित्र्य निर्माण करण्याच्या हेतूनें, त्या जलसंचयावर त्यानें बीजारोपण केलें

तदनंतर कालविभागार्थ, ह्मणजे रात्र आणि दिवस समजण्यासाठीं, सूर्य, चंद्रादि ग्रह, आणि इतर नक्षत्रें, त्या परमेश्वरानें निर्माण केलीं.

" मग देव बोलला, पृथ्वीवर बीज देणारें गवत व हिरवळ, आणि ज्याचें बीज त्याच्यांतच आहे असें आपापल्या जातीप्रमाणें फल देणारें झाड, ही पृथ्वी उपजवो. आणि तसें झालें.

मग देव बोलला, दिवस व रात्र यांचा भेद करण्यासाठीं आकाशाच्या अंतराळांत ज्योती होवोत."

* * *

---

१तदैक्षतबहुस्यांप्रजायेयेति।
( छान्दोग्योपनिषत् ).
सोभिध्यायशरीरात्स्वात्सिसृक्षुर्विविधाः प्रजाः ।
अप एव ससर्जादौ तासुबीजमवासृजत् ॥
( म. स्मृ. अ. १, ८. )

२ कालंकालविभक्तीश्च नक्षत्राणि ग्रहांस्तथा । ससर्ज. ६० ॥
(म. स्मृ. अ.१. २४).

१ बायबल. ( जु. क. अ. १. ११. )
" And God said, Let the earth bring forth grass, the herbyielding seed, and the fruit--tree yielding fruit after his kind, whose seed is in itself, upon the earth; and it was so. "

२ बायबल. (जु. क. अ. १. १४. १६. )
" And God said let there be lights in the firmament of the heaven to divide the day from the night. " * *

°सदर

" आणि देवानें दोन मोठ्या ज्योती केल्या. मोठी ज्योत दिवस चालविण्यासाठीं, आणि लहान ज्योति रात्र चालविण्यासाठीं, अशा केल्या, आणि तारेही केले.

पुढें क्रमाक्रमानें, त्यानें कृमी व कीटक, पशु व पक्षी, राक्षस व पिशाच, नर व किन्नर, इत्यादि; ह्मणजे अंडच, जारज, व स्वेदज, आणि जलचर, भूचर, व खेचर, वगैरे असंख्य प्राणी, आणि अनेक वस्तु, फळें, व वृक्ष निर्माण केलें.

मग देव बोलला, जल हें जीवजंतु पुष्कळ उपजवो. आणि पक्षी अंतराळांत उडोत. ग्रामपशू व सरपटणार जीवजंतु, वनपशु आणि श्वासवान जीवास पृथ्वी उपजवो. नंतर देवानें आपल्या प्रतिच्छायेप्रमाणें पुरुष व स्त्री असे उत्पन्न केले.

---

१ °म. स्मृ. अ १. श्लोक ४० ४३।३७।३९।४४।४५।४६।४७। ४८ ।

" And God made two great lights; the greater light to rule the day, and the lesser light to rule the night; he made the stars also."

१बायबल. जुना करार. अ. १. (२०।२४।२७).

मनुस्मृतींत असें वर्णन आहे कीं, प्रजोत्पादनार्थ ब्रह्मदेवानें स्त्रीपुरुषांचीं जोडपीं केलीं, व त्यांत मैथुनधर्म उत्पन्न केला. आणि विराट् संज्ञ असा जो पुरुष त्याचेच दोन भाग करून, अर्ध्या भागाला स्त्री बनविली.

देवाच्या प्रतिच्छायेप्रमाणें, त्यानें त्याला उत्पन्न केलें. पुरुष व स्त्री असें त्यांस उत्पन्न केलें. आणि देवानें त्यास आशिर्वाद दिला; आणि ह्मटलें कीं, सफल होऊन वाढा व पृथ्वीभरून रहा.

नंतर देवानें आदि मनुष्याची ( आदामची ) एक फांसोळी काढून, तींत मांस भरलें, व तिची स्त्री केली. मग आदम म्हणाला, हिला नारी असें म्हणावें, कांतर ही नर यांतून घेतलेली आहे."

---

१ द्विधाकृत्वात्मनोदेहमर्धेन पुरुषो भवत् । अर्धेननारीतस्यांस विराजमसृजत्प्रभुः ॥
( म. स्मृ. अ. १. श्लो. ३२ ).
द्वन्द्वैरयोजयच्चेमाः सुखदुःखादिभिः प्रजाः ॥
( सदर. श्लो. २६ ).
लोकानांतु विवृध्यर्थमुखबाहूरुपादतः ।
( सदर. श्लो. ३१. )
ततो विराडजायतेति श्रुतिः ।

१ बायबल. जु. (अ. १. २७. २८. २१. २२. २३. )
"27 Male and female created He them. 28 And God said unto them, be fruitful, and multiply. 26 Let us make man in our image, after our likeness."(ch.I) 22 & the rite which the Lord God had taken from man, made be a woman, and brought her unto the man. 23 "She shall be called Woman, because she was taken out of man."(ch.II)

अशा प्रकारें अखिल विश्वाची संस्थिति झाली, व तींत त्या जगन्नियन्त्यानें त्याचें हरएक तऱ्हेनें संगोपन केलें. परंतु प्रत्येक प्राणिमात्राच्या कर्मविपाकाप्रमाणें, प्रलयकालचीं चिन्हें भासमान होऊं लागलीं. आणि पुनश्च उत्पत्ति, स्थिति, व संहार, यांची वडामोड सुरू झाली.

याप्रमाणें, यासंसारचक्राचें रहाटगाडगें एक सारखें चालतच असतें.

मग "परमेश्वरानें पाहिलें कीं, पृथ्वीवर मनुष्याची दुष्टाई मोठी, आणि त्याच्या हृदयाच्या विचारांतील प्रत्येक भावना सर्वदा केवळ वाईट आहे." सबब तो खिन्न झाला आणि बोलला कीं, मनुष्य, पशु, व पक्षी, या सर्वांचा मी संहार करीन.

तेव्हां सर्व प्राणी व मनुष्यें मरण पावलीं, व सर्व पृथ्वी जलमय होऊन, तिजवरील पाणी प्रबळ होत गेलें.

परंतु नोहा व त्याजबरोबर असलेले प्राणी वाचले, व पाणी ओसरत चाललें. तदनंतर पुनश्च संततीचा विस्तार होण्याविषयीं देवानें आशिर्वाद दिला.

---

१ एवं सर्वंसमृष्ट्वेदं मांचाचिन्त्यपराक्रमः । आत्मन्यन्तर्दधेभूयःकालं कालेन पीडयन् ॥
( म. स्मृ. अ १ श्लो. ५१ )

२ मन्वंतराण्यसंख्यानि सर्गः संहार एव च । क्रीडन्निवैतत्कुरुते परमेष्ठी पुनः पुनः ॥
( म. स्मृ. अ. १ श्लो. ८० )

१ बायबल. जुना करार. अ. ६. ( ५-६-७-८. ) अ. ७. ( २१. २२. २३. २४. ) अ. ८ ( १७. )

असो. याप्रमाणें उत्पत्ति, स्थिति, आणि लय, या अवस्थात्रयांचें जें ख्रिस्तिधर्मानें हिंदुधर्मांतील अनुकरण केलें, त्या सर्वांचा स्थूलमानानें विचार झाला.

आतां, सदरहू दोन्ही धर्मांतील मूलग्रंथांत पाहिलें तर, वर सांगितलेलीं प्रमाणादाखल वचनें मागें पुढें लिहिलेलीं आढळतात. तथापि, त्यांतील एकंदर साम्यांचा विचार केला ह्मणजे, तीं खरोखर विशेष लक्षांत ठेवण्यासारखीं आहेत, असें कोणालाही वाटल्यावांचून राहणार नाहीं.

याप्रमाणें, आमच्या ख्रिस्तबांधवांनीं आमचें वरवरचें, सोपें, आणि बाह्य, असें बहुतेक सर्वच अनुकरण केलें. परंतु गहन विचारांत, त्यांच्या नैसर्गिक पंगुत्वामुळें, त्यांजला बिलकूल प्रवेश करतां आला नाहीं, असें दिसतें. आणि त्यामुळेंच तत्त्वज्ञानासारख्या दुर्बोध विषयांत आमच्या आणि त्यांच्या धर्मग्रंथांत महदन्तर, किंबहुना जमीन अस्मानाचा फरक दिसून येतो.

तत्त्वज्ञानांत बायबलाचें गौणत्व.

आमच्या वेदांतील उन्नतीचा एक कणही ख्रिस्तिधर्मांत आढळत नाहीं. उपनिषदांतील गंभीर आणि गहन विचारांचा त्यांत एक लेशसुद्धां सांपडत नाहीं. आणि आमच्या श्रीकृष्णानें जो वेदान्त विषय अर्जुनाला सांगितला, व [illegible] केवळ वष्टी केली, त्यांतील बिन्दूचा

एक आणुमात्र देखील ख्रिस्तिधर्माच्या जुन्या किंवा नव्या करारांत कोठेंही दृष्टिगोचर होत नाहीं.

वेदकालीन बाल्यावस्थेंत देखील हिंदूंचे पारमार्थिक विषयांत गहन विचार.

आमची वेदकालीन स्थिति अगदीं बाल्यावस्थेंतीलच होती. तरी देखील, त्यांतील पारमार्थिक विचार खरोखर फारच गहन होते.

**कोददर्श प्रथमं जायमानमस्थन्वन्तं यदनस्था बिभर्ति । भूम्या असुरसृगात्मा क्व स्वित्को विद्वांसमुपगात्प्रष्टुमेतत् ॥ ४ ॥**

( अ. २, अ. ३, व १४, मं. १, अ. २२, सू. ११४. )

ह्या ऋचेचा भावार्थ असा आहे कीं, जो **परमात्मा** स्वतः अस्थिहीन असतांही अस्थि असणाऱ्या प्राण्यांस जन्म देतो, त्याला कोणीं उत्पन्न केलें, व त्याला उत्पन्न होतांना कोणीं पाहिलें ? भूमीचा प्राण, म्हणजे ह्या पृथ्वीवरील सृष्टपदार्थांचा प्राण, रक्त, आणि मन, हीं कोठें होतीं ? व विद्वानाजवळ ह्या सर्व गोष्टींचा कोणी तपास केला ?

त्याची मनाविषयीं जिज्ञासा.

आतां, ह्या ऋचेंतून दुसरा असाही मथितार्थ निघतो कीं, **परमेश्वर** निराकार असून देखील, त्यानें हें साकार विश्व आपल्या निराकार प्रकृतीपासून उत्पन्न केलें. ही सर्व सृष्टि उत्पन्न होण्यापूर्वी सुद्धां तोच होता. तो सर्वज्ञ आहे.

परमात्म्याविषयीं जिज्ञासा.

आणि म्हणूनच तो ह्या त्रिकट प्रश्नांचा उलगडा करण्यासारखा आहे. परंतु त्याला कोणी विचारण्यासाठीं जाऊं शकत नाहीं. कारण त्याच्याजवळ जाऊन, पुनश्च कोणी देखील परत येत नाहीं.

अखिल विश्वाचा एकच परमात्मा असल्याविषयीं हिंदूंची फार प्राचीन काळची समज.

दुसरी एक ऋचा अशाच मासल्याची, परंतु याहीपेक्षां विशेष खुबीदार आहे.

अचिं कित्वाञ्चिकितुषश्चिदत्र कवीन्पृच्छामि विद्मनेन विद्वान् । वियस्तस्तंभ षळिमा राजांस्यजस्य रूपे किमपिं स्विदेकम् ॥ ६ ॥

( अ. २, अ. ३, व १९, मं. १, अ. २२, सू. १६४ ).

हींत असें सांगितलें आहे कीं, मी अगदीं अज्ञान असून मजला कांहींएक ठाऊक नाहीं. सबब, एतद्विषयक खरें तत्त्व कळण्यासाठीं, मी ज्ञानसंपन्न कवीला विचारतों. आणि त्यांजला असा प्रश्न करितों कीं, ज्यानें हे सहा लोक धारण केले, व जो त्यांस खालीं पडूं देत नाहीं, तो जन्मरहित परमेश्वर अखिल विश्वाचा एकच परमात्मा नाहीं काय ?

आत्म्याचें अमरत्व.

आणखी एका ऋचेंत असें म्हटलें आहे कीं,

अनच्छये तुरगातु जीवमेजद्ध्रुवं मध्य आ पस्त्या-नाम् । जीवो मृतस्यचरति स्वधाभिरमर्त्यो मर्त्येना सयोंनिः ॥ ३० ॥ १९ ॥

( अ. २, अ. ३, व १९, मं. १, अ. २२, सू. १६४.)

ह्या ऋचेचा भावार्थ असा आहे कीं, चंचल, जिवंत, आणि स्वस्थ न राहणारी अशी जी वस्तु, ती श्वासोच्छ्वास करीत देहरूपी गृहाच्या मध्यभागीं निश्चल राहते. जिवंत पदार्थ मेलेल्याच्या सामर्थ्यानें चालतो. आणि अमर्त्य व मर्त्य हीं एकाच ठिकाणीं राहतात. ह्मणजे, जावत्कालपर्यंत हा आत्मा शरीरांत वास्तव्य करतो, तावत्कालपर्यंतच हा मृतवत् जड देह हस्तपादादिकांच्या योगानें हालचाल करतो. व अशा प्रकारेंच अमर्त्यआत्मा आणि मर्त्यशरीर, हे एकत्र राहतात, असा एकंदर अभिप्राय होय.

ह्यावरून आत्मा अमर, विश्वव्यापी, आणि सर्व जगाचा स्वामी असल्याविषयीं, आमच्या पुराणतम आर्यांची फार प्राचीनकाळीं देखील ठाम समजूत असे, हें उघड होत आहे.

हिंदुधर्मांतील परमात्म्याचें वर्णन.

आमच्या उपनिषदांत, व अखिल हिंदुधर्म पुस्तकांत परमात्म्याच्या स्वरूपाचें जें वर्णन आहे, त्यावरून तो अतर्क्य, निर्गुण, आणि निर्विकल्प असल्याचें दिसून येतें. तथापि, मानु-

षिक कल्पनेनें जेव्हां जेव्हां म्हणून त्याच्या गुणांचें वर्णन करण्यांत येतें, तेव्हां तेव्हां त्याचीं लक्षणें खालीं लिहिल्याप्रमाणें आढळतात.

**शांतोयमात्मा । त्वंसाक्षादात्मासिनित्यम् । त्वंचिन्मयः । त्वमानन्दमयः । त्वंब्रह्ममयः । त्वंसच्चिदानन्दादद्वितीयोसि । त्वंज्ञानमयोविज्ञानमयोसि । सत्यं ज्ञानमनन्तंब्रह्म । तत्वमसि । सभूमिंविश्वतोवृत्वात्य तिष्ठद्दशांगुलम् । पुरुषएवेदंसर्वम् । यद्भूतंयच्चभव्यम् । तस्माद्विराडजायत ।** (उपनिषदें. ऋ. वे. इ०).

आणि ह्याच उपनिषदांतील वाक्यांवरून, त्या **परमात्म्याची** अगाध लीला; त्याच्या **चित्स्वरूपाचें** विलक्षण सामर्थ्य; त्याच्या **विश्वमूर्तीची** अतर्क्य शक्ति; त्या **विराट् पुरुषाचा** प्रचंड पराक्रम; आणि त्याचें तें **नैसर्गिक तेज**; इत्यादींची केवळ मूर्तिमंत कल्पनाच आपल्या मनांत एकदम येते.

खिस्तिधर्मांतील परमात्म्याचें वर्णन.

परंतु ह्याच्याच तोडीला लावण्यासाठीं आपण **ख्रिस्ती-धर्म** धुंडाळला, तर आपली खाचितच निराशा होईल. कारण, **ख्रिस्तांनीं** मानलेलें अत्यन्त पवित्र शास्त्र जें **बायबल**, त्यांत **परमेश्वराचें** अद्वितीय सामर्थ्य, किंवा त्याचें तें सोज्वल तेज, अथवा त्याची ती कर्तुम्, अकर्तुम्, अन्यथा कर्तुम्, अशी शक्ति, इत्यादि, बिलकूलच दिसून येत नाहींत.

बायबलांतील देवाला, किंवा आकाशांतील बापाला वारंवार क्रोध येतो. त्याला राहून राहून दुःखं होतें. आणि केलेल्या कृतीचा त्याला क्षणोक्षणीं पश्चात्ताप वाटतो. त्यामुळें, मनुष्य व इतर प्राणी, पशु आणि पक्षी, इत्यादींचा सूड घेण्याविषयीं, तो आपली इच्छा हरघडी प्रदर्शित करितो. या कारणानें त्याचा निखालस पंगुपणा, त्याची निःसीम निर्बलता, आणि त्याचें केवळ गौणत्व मात्र प्रत्यक्ष भासमान होतें.

ख्रिस्तिधर्मांतील वर्णनामुळें ईश्वराला आलेलें गौणत्व.

---

1 " And the Lord said, I will destory man, whom I have created, from the face of the earth; both man and beast, and the creeping thing, and the fowls of the air; for it *repenteth me* that I have made them." ( Genesis. ch. VI. 7. ).

2 " And it *grieved* Him at his heart."

3 " And it repented the Lord that he had made man on the earth, and it grieved him at his heart."

( Genesis. ch. VI. 6 ).

4 " And God saw that the *wickedness* of *man* was great in the earth, and that every *imagination* of the thoughts of his heart was only *evil* continually." ( Genesis. ch. VI. 5 ).

" The Earth also was corrupt *before* God; and the earth was filled with violence."

( Genesis. ch. VI. 11 ).

" And God looked upon the Earth, and behold,

( पुढें चालू. )

ह्या बायबलावरून दुसरें असेंही एक दिसून येतें कीं, प्रारंभीं देवानें आकाश व पृथ्वी हींच उत्पन्न केलीं.[1] आणि त्यानंतर तीन दिवस गेल्यावर, चवथ्या दिवशीं त्यानें सूर्य व चंद्र उत्पन्न केले.[2]

व उत्क्रांतिनियमाची विसंगता.

आतां, विश्वाच्या उत्पत्तीचें, किंवा सृष्टिरचनेचें अशा प्रकारचें वर्णन, कोणालाही, प्रथमदर्शनीं देखील, अगदीं अशास्त्रीय, केवळ बालिश, आणि निव्वळ पोरकटच वाटण्यासारिखें आहे. कारण, उत्क्रान्ति नियमाप्रमाणें विचार केला तर असें चांगलें व्यक्त होतें कीं, अशा प्रकारें सृष्टिरचना झालेलीच नाहीं.

आमच्या श्रुतींचें आणि स्मृतींचें सूक्ष्म रीतीनें अवलोकन केलें ह्मणजे असें स्पष्ट दिसून येईल कीं, त्यांत सृष्टीच्या उत्प-

श्रुतिस्मृतींतील उत्क्रांतिनियमांची संग-

---

(मागील पृष्ठावरून पुढें चालू.)

it was corrupt, for all flesh had corrupted his way upon the earth." (Genesis. ch. VI. 12).

"And God said unto Noah, The end of all flesh is come before me; for the earth is filled with violence through them: and, behold, I will destroy them with the earth." (Genesis. ch. VI. 13).

१ बायबल. जुना करार. (अध्याय १. १.)

२ सदर. सदर. (अ. १. १६. १९.)

ति, व तींत हिंदूंची अग्रेसरता.

तीचा प्रकार केवळ उत्क्रान्तिनियमांस अनुसरूनच सांगितलेला आहे. आणि ह्याच गोष्टीवरून दुसरें असेंही निर्विवाद सिद्ध होतें कीं, पाश्चात्य देशांतील स्पिनोझा व डार्विन, हक्स्ले व स्पेन्सर, इत्यादि महा विद्वान् आणि शोधक मंडळींनीं उत्क्रांतिनियमाचें तत्त्व सांप्रतकाळीं, म्हणजे इ०स०च्या १९व्या शतकांत पुढें आणण्यापूर्वींच, आमच्या आर्यहिंदूंनी तें फार प्राचीनकाळींच सर्व जगापुढें ठेवलें होतें. असो. एकंदरीनें अशा प्रकारचें शास्त्रीय विवेचन बायबलांत नाहीं.

शिवाय, चवथ्या दिवशीं सूर्य उत्पन्न केला ह्मणून जें बायबलांत वर्णन आहे, तें केवळ मिथ्यावादच होय.

---

1 " A system which is, in some respects, almost identical with that, thought out by Spinoza and the profoundest thinkers of modern Europe. Indeed, if you will pardon the anrchronism, the Hindus were Spinozaites more than 2000 years before the existence of Spinoza; and Darwinians many Centuries before Darwin, and Evolutionists many Centuries before the doctrines of Evolution had been accepted by the Huxleys of our time, and before any word like Evolution existed in any language of the world."

( Religion of the Hindus. By Sir M. Monier-Williams The Indian Magazine and Review. No. 249. September 1891. )

कारण, दिवस आणि रात्र समजण्याची आपली सर्व घडा-मोड केवळ सूर्यावरच अवलंबून असल्यामुळें, हा सूर्य निर्माण होण्यापूर्वी, अमुक दिवस होऊन गेले, असें ह्मण-ण्याला, किंवा प्रतिपादन करण्याला, अणुमात्रही अवकाश राहत नाहीं, अथवा ठाव मिळत नाहीं.

त्यासंबंधानें श्रुतींचा मुकाबिला.

आतां, ह्याच्याच मुकाबिल्यासाठीं आपण क्षणभर हिंदुधर्माकडे वळूं, आणि त्यांतील उपनिषदांत काय सांगितलें आहे तें पाहूं.

श्रुति असें म्हणते कीं, " **तस्मादात्मन आकाशः संभूतः । आकाशाद्वायुः । वायोरग्निः । अग्नेरापः । अद्भ्यः पृथिवी । पृथिव्या ओषधयः । ओषधी-भ्योऽन्नम् । अन्नात् पुरुषः ।** " ह्मणजे आत्म्यापासून आकाश, आकाशापासून वायु, वायूपासून अग्नि, अग्नी-पासून पाणी, पाण्यापासून पृथिवी, पृथिवीपासून ओषधि, ओषधीपासून अन्न, आणि अन्नापासून पुरुष, किंवा पंच-भूतात्मक देह, याप्रमाणें क्रमाक्रमानें निर्माण झालें.

ही शास्त्रीय विवेचनपद्धति, किंवा उत्क्रान्तिनियमाचा हा शास्त्रीय विचार, अथवा आपण कोण, कोठून आलों, आणि कोठें जाणार, एतद्विषयक मानसिक उन्नतीचा हा सूक्ष्म ऊहापोह, ख्रिस्तिधर्मांत कोठेंही आढळून येत नाहीं.

असो. ईव्ह बरोबर सर्पाचें कपट; ज्ञानाचा वृक्ष निर्माण करूनही, त्याचें फल चाखण्याविषयीं ईश्वरानें केलेला निषेध; केवळ सर्पाच्याच वचनोक्तीस भुलून, आदम आणि ईव्ह यांनीं त्या निषिद्ध फळाचा घेतलेला आस्वाद; त्यामुळें अखिल मानवी जातीवर देवानें केलेला कोप; त्यायोगानें मनुष्याचें झालेलें पतन; तत्संबंधीं झालेला अन्याय; आणि त्याच कारणानें त्याजवर ओढवलेलें संकट; इत्यादि गोष्टी ईश्वरासारख्या सर्व शक्तिमान् प्रभूस अगदींच शोभण्यासारख्या नाहींत. इतकेंच नाहीं तर, त्यामुळें त्याच्या ईशत्वास मोठेंच गौणत्व येऊं पहातें; आणि त्याच कारणानें हें व अशा प्रकारचें सर्व वर्णन निव्वळ बालिश दिसतें.

उत्पत्ति, स्थिति, आणि लय, एतद्विषयक वर्णनांत खिस्तिधर्माचें बालिशत्व.

आतां, नीतितत्वाच्या संबंधानें देखील बायबलांत कित्येक प्रसंगीं अगदींच हेळसांड केल्यासारिखें दिसतें. आणि त्यामुळें आपलें मन विशेष साशंक होऊन, आपणांस केव्हां केव्हां सखेदाश्चर्य वाटतें.

[1]बायबलांत एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, [2]ईश्वराच्या पुत्रांनीं मनुष्यांच्या बायकांकडे अवलोकन केलें.

---

१ बायबल. जुना करार. अध्याय ३ रा,

2 " That the sons of God saw the daughters of men that they *were fair*; and they took them wives of all they chose." (Genesis. ch. VI. 2).

बायबलांतील ईश्वरपुत्रांची पापदृष्टी.

आणि त्या सुरूप आहेत असें पाहून, ज्यानें त्यानें आपआपल्या इच्छेनुरूप त्यांस उचललें, व आपल्या आवडीप्रमाणें त्यांस स्वतःच्याच स्त्रिया बनविल्या. वाहवा! केवढी तरी ही अनीति! व ह्या दुराचारास म्हणावें तरी काय?

त्यामुळें ईश्वरास झालेला खेद.

असो. ईश्वरपुत्रांनीं अशा प्रकारची पापदृष्टी परस्त्रीवर ठेविल्या कारणानें, त्यांच्या दुष्टाचरणाबद्दल आकाशांतील बापास फारच क्रोध आला; त्यांच्या अनीतीच्या वर्तनामुळें त्याचें पित्त अगदीं खवळून गेलें; ह्या एकंदर कृत्याबद्दल त्याला मोठा पश्चात्ताप वाटला; आणि शेवटीं त्या बिचाऱ्याला अतीव खेदही झाला. आतां, सर्वशक्तिमान् प्रभूला इतका राग येऊन, असें विव्हल होण्याचें यत्किंचित् देखील प्रयोजन नव्हतें. किंवा, ज्या सृष्टीच्यायोगानें आपल्यास परिणामीं संताप होईल, अशी सृष्टि अथवा प्रजा निर्माण करण्याचेंही त्याला कांहींच कारण नव्हतें. आणि जर सृष्टपदार्थावर. त्याचा दाब नव्हता; किंवा केलेल्या कृत्याचें निरसन करण्याचें त्याच्यांत सामर्थ्यच नव्हतें; तर त्यानें असल्या बिकट कामांत बिलकुल हातच घालावयाचा नव्हता, असें कोणालाही सहजीं वाटण्यासारिखें आहे.

१ बायबल. जुना करार. अध्याय ६. ५. ६. ७. ११.

बायबलासारख्या पुस्तकांत, व विशेषतः ख्रिस्तांनीं मानलेल्या अति पवित्र ग्रंथांत, अनीतीचा अशा प्रकारचा उल्लेख आल्यानें, किंवा ईशकृतीचें असें अमंगल स्वरूप दृष्टीस पडल्यानें, अथवा परमेश्वराची अशी हतवीर्यता आविर्भूत झाल्यानें, ईशशक्तीस, आणि परमेश्वराच्या व्यवस्थेस फारच गौणत्व आणिल्याचें चागलें व्यक्त होतें.

परंतु एवढ्यानेंच सर्व बाजार आटोपला नाहीं.

बायबलांत सांगितलेला आईबापांचा त्याग.

बायबलांतील ख्रिस्ती नीतीचें उज्ज्वल स्वरूप, व प्रकृतिसौजन्याचें मासलेवाईक उदाहरण तर पुढेंच यावयाचें आहे. कारण, ह्या पवित्र म्हणून केलेल्या धर्मपुस्तकांत एके ठिकाणीं अशी आज्ञा आहे कीं, ज्यापेक्षां स्त्रीला पुरुषाच्या बरगडीतूनच उत्पन्न केली आहे, व ज्यापेक्षां तीं दोघेंही एकजीवच आहेत, त्यापेक्षां पुरुषानें आपल्या मातापितरांची पर्वा न करितां, त्यांस बेलाशक सोडून द्यावें; आणि त्यानें फक्त आपल्या बायकोसच जोंबाळून बसावें. वाहवा ! ! ! धन्य तीं ख्रिस्ति मातापितरें ! धन्य ते बायबलांतील नीतितत्व ! ! आणि धन्य तें भावी प्रजेस लावून दिलेलें वळण ! ! !

1 "Therefore shall a man *leave his father and his mother*, and *shall cleave unto his wife;* and they shall be one flesh." इतालिक वर्ण आमचे आहेत. ग्रंथकर्ता.
( Genesis. ch. II. 24 ).

खरोखर, यासंबंधानें आमचें नीतिशास्त्र, आमचीं स्मृतिवचनें, आणि आमच्या पवित्र श्रुति, हीं सर्वप्रकारेंच विशेष प्रशंसनीय आहेत.

आमच्या मनुस्मृतिकारानें, मातापितरांच्या आज्ञेंतच प्रत्येकानें राहण्याविषयीं, किती सुरेख आज्ञा सांगितली आहे ? आणि त्यांची सदैव सेवा करण्याविषयीं, किती प्रेमळ बंधन लावून दिलें आहे ? मला वाटतें कीं, आमच्या ख्रिस्तबांधवांनीं बायबलांतील पितृत्यागाविषयींच्या सदरच्या आज्ञेकडे विशेष लक्ष न पुरवितां, हिंदुधर्मांतील पितृवश्यतेसंबंधीं स्मृति वचनाचेंच मनःपूर्वक अवलंबन केलें, तर त्यापासून त्यांचें खचितच विशेष कल्याण होईल.

त्यासंबंधानें मनुस्मृतींतील वचन.

आमचे स्मृतिकार असें स्पष्टपणें लिहितात कीं,

यावत्त्रयस्ते जीवेयुस्तावन्नान्यं समाचरेत् ।
तेष्वेव नित्यं शुश्रूषां कुर्यात्प्रियहितेरतः ॥ २३५ ॥
( मनुस्मृति. अ. २. )

म्हणजे जावत्कालपर्यंत आपले आईबाप, आणि आचार्य ( गुरु ), हीं तीन माणसें जिवंत आहेत, तावत्कालपर्यंत दुसरें कांहीं एक न करितां, केवळ त्यांच्या शुश्रूषेंतच सदैव आसक्त असावें. आणि वास्तविक पाहतां, प्रत्येक सुपुत्राची हीच इतिकर्तव्यता असली पाहिजे.

असो. आतां, ख्रिस्तिधर्माचा जो दिवसानुदेवस अधि-

खिस्तिधर्माचा प्राच्य देशांत प्रसार.

काधिक फैलाव होत गेला, तो प्राची दिशेकडे केव्हां आणि कसा झाला, व विशेषतः हिंदुस्थानांत तो केव्हां पसरला, आणि येथें प्रथमतः त्यानें कोठें आपला शिरकाव केला, याविषयीं विचार करूं.

त्यासंबंधाच्या दंतकथा.

भरतभूमींतील खिस्तिधर्मप्रसाराच्या संबंधानें तीन निरनिराळ्या प्रकारच्या दंतकथा असल्याचें कळून येतें. चाल्डियन् स्तोत्र संग्रहांत असें वर्णन आहे कीं, सेंट् टॉमस् नांवाचा जो खिस्तभक्त होऊन गेला, त्यानें आशियाखंडांतील बऱ्याच देशांतल्या लोकांचें धर्मान्तर करवून अखेर तो हिंदुस्थानांत आला, आणि शेवटीं स्वधर्मप्रित्यर्थ त्यानें आपले प्राणही खर्ची घातले. ( इ. स. ५२ ते ६८ ).

पहिली दंतकथा.

व्हिन्सेन्झो मेरिआचें व आणखी कित्येकांचें असें ह्मणणें आहे कीं, धर्मान्तर करविण्याचें काम सेंट् टॉमस्नें प्रथमतः मिसापोटेमिया येथेंच[१] सुरू केलें. आणि तदनंतर पार्थिया, मीडीया, इराण ( पर्शिया ), हर्कोनिया, बाक्ट्रिया, मार्दी, मध्य आशिया, चीन, मोगल लोकांचीं संस्थानें, सा-

---

१ डाक्टर हंटरचा हिंदुस्थानचा इतिहास, आवृत्ति दुसरी, पान २३०।२३१ पहा.

याम, जर्मनी, ब्राझिल, आणि एथिओपिया, इत्यादि ठिकाणीं हा धर्म हळूं हळूं पसरला. पुढें हा खिस्तभक्त पुनश्च हिंदुस्थानांत आला, आणि वाटेंत लागलेल्या सोकोत्रा नामक द्वीपांतील लोकांचें धर्मान्तर करवून, त्यानें मलबारांत प्रवेश केला. येथून चोलमण्डल ह्मणजे कारोमांडल किनाऱ्याकडे त्यानें आपलें सुकाणूं फिरविलें, आणि इकडील प्रदेशांत दाखल झाल्यावर आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें, लोकांस बाटविण्याचें काम त्यानें ज्यारीनें सुरू केलें.

परंतु, धर्मान्तर करविण्याच्या कामीं, येथें त्याला मुळींच यश आलें नाहीं. कारण, मैलापूर नामक मद्रासच्या उपनगरांत, त्याला तत्प्रीत्यर्थ देहान्तें प्रायश्चित्तच मिळाल्याचें दिसतें. (तारीख २१ डिसेंबर इ० सन ६८.)

दुसरी दंतकथा.

दुसरी एक दन्तकथा अशी आहे कीं, मेन्सचा अनुयायी कोणी एक टॉमस् मानिकियम् नांवाचा असून, त्यानेंच हिंदुस्थानांतील लोकांस बाटविण्याची सुरुवात प्रथमतः केली. आणि ही गोष्ट इ० स० २७७ च्या सुमारास झाल्याचें कळून येतें.

तिसरी दंतकथा.

तिसरी एक दन्तकथा अशी आहे कीं, मारटॉमस् नांवाचा कोणी एक आर्मिनिया-

१ कर्नल यूलनें छापलेलें मार्को पोलो पहा.

२ डाकर हंटरचा हिंदुस्थानचा इतिहास. पान २३१.

तील व्यापारी होता. हा इ० स० ७८० च्या सुमारास मलबार प्रांतांत व्यापारनिमित्त आला, आणि इकडे बरें वाटल्यावरून त्यानें येथेंच आपलें कायमचें राहण्याचें ठिकाण केलें. पुढें त्यानें शरीरसंबंध देखील इकडल्याच लोकांशीं केला, आणि शेवटीं दोन हिंदी स्त्रियांबरोबर आपलें लग्न लाविलें. ह्या कारणानें, राजेरजवाड्यांत त्याचें साधारण वजन पडत गेलें, व सरकारदरबारांतही त्याचें सहजींच महत्त्व वाढत चाललें.

मारटॉमस् इकडे येण्यापूर्वी ख्रिस्ती लोकांची खरोखरीच धडगत नव्हती. कारण कित्येकांचा थोडाबहुत छल होत गेला. कांहींची दुर्दशा झाली. कित्येकांस मलबारचा सुपीक किनाराच सोडून देणें भाग पडलें. कित्येकांनीं देशत्याग केला. आणि कित्येकांस वनवासही भोगावा लागला.

मारटॉमस्च्या मदतीनें खिस्ती लोकांस मिळालेले हक्क.

परंतु, मारटॉमस्नें आपलें थोडेंबहुत असलेलें वजन खर्च करून, ख्रिस्ती लोकांची बरीच दैना नाहींशी केली. आणि ह्या लोकांस या देशांत राहूं देण्याविषयीं, व आपला धर्म पाळण्याविषयीं, त्यानें राजेरजवाड्यांकडून परवानगी मिळविली. अशा प्रकारें, हळूं हळूं बऱ्याच अडचणी दूर होत गेल्याकारणानें, मलबारप्रांतांत किरिस्तावांची इतस्ततः पुनश्च वस्ती होत गेली.

तदनंतर कांहीं कालानें, **मारटॉमस्** हा या किरिस्ताव समुदायाचा **आर्चबिशप** ह्मणजे बडा **पाद्री**, किंवा मुख्य धर्माधिकारी बनला, आणि पुढें मरण पावला. ह्यानें आपल्या जातभाईच्या सुखाविषयीं बरीच खटपट केली असल्यामुळें, व त्यांस त्यानें बरेच हक्क संपादन करून दिल्या कारणानें, ह्याला शनैःशनैः मान मिळत जाऊन, ते ह्याची साधूंतच गणना करूं लागले.

ख्रिस्तिधर्माचा हिंदुस्थानांत प्रवेश, व त्याचा काल.

ह्या सर्व गोष्टींवरून, एकंदर असें अनुमान होतें कीं, इसवी शकाचें आठवें शतक संपण्यापूर्वीं, **ख्रिस्तिधर्माची** झुळूक विशेषतः **मलबारच्या** किनाऱ्यावर मारूं लागली होती. आणि त्यावेळीं, **बौद्धधर्माची** थोडीबहुत चळवळ **दक्षिण हिंदुस्थानांतच** सुरू असल्यामुळें, ती वेळ **ख्रिस्तिधर्माचें** बीजारोपण होण्याला सहजींच अनुकूल झाली. कारण, **बौद्धधर्मापासूनच** **ख्रिस्तिधर्माची** उत्पत्ति असल्याकारणानें, ह्याचें आपल्या धर्माशीं निकट साम्य पाहून, **बौद्धांनीं** **ख्रिस्तिधर्मास** थारा दिला. आणि ह्याच आश्रयामुळें, त्याची दिवसानुदिवस वृद्धि होत गेली.

---

1 " The Buddhist polity then supreme in Southern India was favourable to the reception of a faith whose moral characteristics were humanity and self-sacrifice. "

( Dr. Hunter's Indian Empire. 2nd Edn. P.234 )

आशियाखंडांत, अन्यत्रही, ख्रिस्तिधर्माचा प्रसार ठिकठिकाणीं झाल्याचें दिसतें आणि सुप्रसिद्ध इतिहासकार गिबन् असें ह्मणतो कीं, कालिफांच्या कारकीर्दींत नेस्टोरिअन् नामक ख्रिस्तिपंथाचा फैलाव, चीनपासून जरूसेलेम व सायप्रस्पर्यंत झाला होता.

त्याचा आशिया खंडांत इतर ठिकाणीं प्रसार.

इसवी सन १८८१ सालच्या खानेसुमारीप्रमाणें, हिंदुस्थानची एकंदर लोकसंख्या पंचवीस कोट असून, त्यांपैकीं २१,४८,२२८ ख्रिस्तीधर्म पाळणार होते. हल्लीं हें प्रमाण जास्त झालें आहे, व एकंदर लोकसंख्या देखील अठ्ठावीस कोटीपर्यंत वाढली आहे.

भरतखंडांत ख्रिस्ती लोकांची संख्या.

आतां, हा जो ख्रिस्तिधर्माचा इतका प्रसार होत गेला, त्याच्या मूळ कारणांविषयीं, आपणाला अवश्य शोध केला पाहिजे. आणि ह्याचा आपण तपास

ख्रिस्तिधर्माच्या प्रसाराचें कारण निःसीम जुलूम,

1 ( Decline and fall of the Roman Empire. )
• ( Vide also, Yule's Cathay and the way Thither.)

| १ आंग्ल हिंदुस्थानांतले, | ११,६८,४८१ |
|---|---|
| मांडलिक हिंदुस्थानांतले, | ६,१४,०३६ |
| पोर्तुगीज हिंदुस्थानांतले, | ३,५२,४७७ |
| फ्रेंच हिंदुस्थानांतले, | ३३,२२६ |
| | २१,४८,२२८ |

केला म्हणजे, आपणाला असें उघड दिसून येईल कीं, ह्या धर्माचा फैलाव लोकांच्या खुषीमुळें बिलकूल झाला नसून, तत्प्रसारार्थ अबलाजनांच्या रक्तपाताचे, व निरपराधी पुरुषांच्या रुधिरस्त्रावाचे केवळ पूरच लोटले.

हा धर्म मुख्यत्वेंकरून **पोर्तुगीज** लोकांच्या कारकीर्दींत विशेष फैलावला असून, तत्प्रीत्यर्थ त्यांनीं जीं जीं म्हणून अनन्वित कृत्यें केलीं, त्या सर्वांचा विचार केला म्हणजे आपल्या अंगावर रोमांचच उभे राहतात, आणि ह्या **ख्रिस्ति**धर्माचें अमंगल स्वरूप उत्तमप्रकारें ध्यानांत येतें.

**इस्लाम** धर्माप्रमाणें, **ख्रिस्ति**धर्मानें देखील समशेर बहादुरीचें व्रत पत्करून, केवळ तरवारीच्या जोरावरच विधर्मीयांस आपल्या कळपांत आणण्याचा **विडा** उचलला. अनेक देश काबीज करून, **ख्रिस्ति**धर्माचाच प्रसार करावा, अशी **पोर्तुगल** देशाच्या राजाची आज्ञा होती. आणि ह्याच आज्ञेस अनुसरून, इ० स० १५०० सालीं, तेरा जहाजें व बाराशें फौज **केब्राल** नामक सरदाराच्या स्वाधीन केलीं, आणि त्यांचें त्यास आधिपत्य दिलें.

तरवारीच्या जोरावर धर्मान्तर,

शिवाय, त्याला असाही हुकूम झाला कीं, **ख्रिस्ति**धर्माचा उपदेश ज्यारीनें सुरू ठेवावा. आणि तो सिद्धीस गेला नाहीं, किंवा अशा कृत्यास कांहींच यश आलें नाहीं तर,

धर्मान्तरार्थ पहिली स्वारी,

तरवारीच्या जोरावर एकदम काम चालवावें. याप्रमाणें पहिल्या स्वारीची हकीगत झाली.

धर्मान्तरार्थ दुसरी स्वारी.

इ० स० १५०९ सालीं, दुसरी स्वारी पाठविण्यांत आली असून, तींत एक मोठें आरमार व पंधरा हजार फौज होती. हिचें आधिपत्य **फ्रान्सिस्कोडी आल्मेडा** याजकडे असल्याकारणानें, त्यानें इ० स० १५१० सालीं **गोवें** सर केलें, व तें अजूनही **पोर्चुगीज** सरकाराकडे चालत आहे. पुढें त्यानें **मलाका** बेट घेतलें, व तें **प्राच्यद्वीपसमूहाची** केवळ किल्लीच असल्याकारणानें, त्यानें **सायाम** देशांत व **मसाल्याच्या** बेटांत, व्यापार आणि जुलमाचा धर्मप्रसार ज्यारीनें चालविला.

याप्रमाणें, केवळ फौजेच्या जोरावरच मस्त होऊन, **पोर्चुगीज** लोकांनीं **भरतखंडाच्या** दक्षिण किनाऱ्यावरील मांडलिकांस निष्कारण त्रास दिला, आणि त्यांच्या प्रजेस

---

1 " The early Portuguese navigators were not traders or adventurers, but admirals with a *royal commission to conquer territory and to promote the spread of Christianity.*"

" The sum of his *Cabrals* instructions was to *begin with preaching, and if that failed, to proeeed to the sharp determination of the sword*".

( Indian Empire. P. 358. ).

विनाकारण गांजलें. व ह्या त्यांच्या दुष्कृत्याबद्दल त्यांस प्रायश्चित्तही भोगावें लागलें.

पुढें, इसवी सनाच्या सोळाव्या, सतराव्या, आणि अठराव्या शतकांत जी कांहीं बेबंदनगरी आणि झोटिंगबादशाही त्यांनीं मातविली, तिचें जेवढें वर्णन करावें तेवढें थोडेंच.

खिस्तिधर्माची अनन्वित कृत्यें.

इ० स० १५६० सालीं, पोर्तुगीज लोकांनीं **धर्मसभा** म्हणून स्थापन केली. हींत धर्मविरुद्ध अपराध करणाऱ्या सर्वजणांचा इन्साफ होत असल्याकारणानें, ह्या **पाश्चात्य** रानटी लोकांच्या समजुतीप्रमाणें, ज्यांनीं ज्यांनीं धर्मान्तर किंवा मतान्तर केलें नाहीं, त्या सर्वांस दुःसेह यातना भोगाव्या लागल्या, आणि त्यापैकीं कांहींची तर **अग्निनारायणालाच** सजीव आहुति दिली. ह्या पुरुषमेधाच्या स्वाहाकारांत १०५ पुरुष, व १६ स्त्रिया असून, त्यांपैकीं ५७ इसमांस सजीव दहन केलें.

हाच भयानक प्रकार पोर्तुगीज[3] लोकांनीं आपल्या ताब्यांतील मुलुखांत चोहोंकडे चालविला. त्यामुळें सर्व

1 ( Indian Empire. P. 244 ).

2 ( Indian Empire p. 254 ).

3 " Only those who have read the contemporory narratives of their conquests, can realize the superstition and the cruelty with which their history in the Indies is stained."

( Indian Empire. P. 359 ).

लोक संत्रस्त झाले, व त्याच कारणानें पोर्तुगीज सत्ता आणि ख्रिस्तिधर्म, ह्यांचा त्यांस मनापासून वीट आला.

त्याची रक्तपाताविषयीं लालसा.

बरें, ह्या ख्रिस्तिधर्मानें आपल्या पशुतुल्य क्रौर्याचा मासला केवळ विधर्मीय आणि विदेशीय, यांसच दाखवून तो स्वस्थ बसला असें नाहीं. तर त्यानें दोन हात प्रत्यक्ष आपल्या घरांत व आपल्या कळपांत, आपले स्वकीय आणि आपले स्वधर्मीय बांधव, यांजबरोबर देखील मारून, आपल्या निस्सीम निष्ठुरतेची एकदांची तृप्ति करून घेतली. आणि तेणेंकरून, त्यानें आपलें अमंगल व अतिनिंद्य स्वरूप मात्र जगापुढें प्रत्यक्ष मूर्तिमंतच ठेविलें, व दुष्कृतीच्या कालिमेचा ( नीलवर्ण असा ) अत्युच्च झेंडा रोंविला.

त्यामुळें झालेली [illegible]प्राणहानि.

खुद्द इंग्लंड आणि फ्रान्ससारख्या सुधारलेल्या देशांत देखील, धर्माचें वेडें पीक अगदीं बेहद्द माजल्याकारणानें, अमूल्य प्राणाच्या [illegible]वर एक अशा सतत आहुति पडत गेल्या. मग त्या[illegible]ानें इतर देशांत किती अनाचार झाला असेल, याची [illegible]सें कल्पना करण्याचें काम मी वाचकांकडेसच सोंपतों. [illegible]तुमऱ्याला आपल्या कळपांत त्याच्या इच्छेविरुद्ध [illegible]ण्यासाठीं, ख्रिस्तिधर्मानें किती तरी अनन्वित कृत्यें [illegible] ! ! ! बरें, इतकें करून तरी त्याचा कार्यभाग [illegible]ला काय? नाहीं. अशा अमंगळ कृत्यांनी तर

त्याचा इष्ट हेतु बिलकूलच सिद्धीस गेला नाहीं. इतकेंच नव्हे तर, अशा खटपटीनें उलट त्याची फटफजीतीच होऊन, तो जगाच्या उपहास्यतेस मात्र पात्र झाला.

धर्मान्तरामुळें झालेला पश्चात्ताप.

अशा प्रकारें बलात्काराच्या योगानें, किंवा निव्वळ फसल्यामुळें, ज्यांनीं ज्यांनीं ह्मणून हा धर्म स्वीकारला, त्यांचे पुरे हाल होऊन, शेवटीं त्यांस दुःसह यातना व महत् पश्चात्तापच भोगावा लागला.

ह्या संबंधानें **गोपाळराव जोशी** यांचें धर्मान्तर, विशेष लक्षांत ठेवण्यासारखें असल्याकारणानें, त्याबद्दलचें इत्थंभूत वर्णन **भारतीय साम्राज्याच्या पूर्वार्धांत** दिलें आहे. त्यावरून, त्यांच्या अन्तर्वेदना वाचकांच्या पूर्णपणें लक्षांत येतील.

**मद्रासचा** कोणी एक **चेटी** नांवाचा विद्वान् गृहस्थ दखील असाच बाटला होता. परंतु धर्मान्तर झाल्यानंतर त्याचेंच मन त्यास खाऊं लागलें, व तेणेंकरून त्याची मोठी त्रेधा उडाली. शेवटीं, ह्या **ख्रिस्तिधर्माच्या** यमयातना त्याला दुःसह होऊन त्यानें अखेर **हिंदुधर्मांतच** जाण्याचा निश्चय केला, आणि मोठ्या आनंदानें पुनश्च **हिंधर्मदु** स्वीकारला.

दुसऱ्या एका गृहस्थाला ह्या धर्मान्तराच्या यातना

अशाच भोगाव्या लागल्या, व तन्निमित्त त्यानें जन्मभर कष्ट सोसले. अशीं एक कां दोन उदाहरणें ह्मणून सांगूं ? खरोखर अशा प्रकारचे मासले असंख्य दाखवितां येतील.

त्याचीं कारणें. आतां, ह्या सर्व गोष्टींच्या कारणांचा शोध लावण्यासाठीं, आपणांस फार दूर जावयास नलगे. कारण, हिंदुधर्मांतील अनुपम अमृतोदधि, त्यांतील सोंलीव तत्त्वविचारांची खाण, त्यामुळें मनास प्राप्त होणारा शान्तिसुखाचा झरा, आणि तद्विषयक पूर्णत्वाची पारमार्थिक उन्नत्ति, इत्यादि सर्व नगद माल टाकून, अन्य धर्मांतील फोल घ्यावयास कोण धजेल ? एकांतील साराचा त्याग करून, दुसऱ्यांतील असाराकडे मुद्दाम कोण वळेल ? किंवा प्रत्यक्ष नवनीत सोडून देऊन, ताकाला कोण ह्मणून हात लावील ? अथवा ही दारची कामधेनु घालवून, परक्या निरुपयोगी वांझ गाईला कोण पत्करील ? अगर ची श्रीमंती व राजविलास टाकून, जाणूनबुजून दरिद्र्या कोण स्वीकारील ? अर्थात् कोणी नाहीं. आणि हें दीं उघड व निर्विवाद आहे कीं, अशा प्रकारचा र्दायक मोबदला, कांहींना कांहीं तरी विशेष कारण ल्याखेरीज, कोणी देखील करूं इच्छिणार नाहीं.

ख्रिस्तिधर्मांचें बंप. मात्र, असें होण्याचा संभव आहे कीं, कोणाही मनुष्याला आपल्या स्वतःच्या घरांतील ऐश्वर्याचें महत्व न कळल्या कार-

णानें, अथवा त्याला कोणी फसविल्यामुळें, किंवा त्याला कोणी अडचणींत पाडल्याच्या योगानें, अगर आपलें दुःख तत्काल निवारण होईल, अशी कोणी तरी त्याला आशा दाखविल्यानें, तो एखादे वेळेस फसेल. आणि बहुतकरून अशा प्रकारच्या फसणुकीमुळेंच कित्येक लोकांचें धर्मान्तर झाल्याचें दिसतें, व याच कारणानें ह्या धर्माचें स्वरूप विशेष रमणीय भासत नाहीं.

हिंदुधर्माचें मोहकत्व, व त्याची अनन्य सामान्याभुक्ति.

परंतु आमच्या हिंदुधर्माचा तसा प्रकार नाहीं. ह्याचें कांहीं निराळेंच तेज व विलक्षण रूप आहे. हा धर्म परकीयांस आपल्या कळपांत मुळींच घेऊं इच्छीत नाहीं आणि असें असल्याकारणानें, आमच्या धर्मांत घेण्या साठीं, आम्ही कोणालाही ख्रिस्तिधर्मासारखी लालू व बाह्य देखावा, अथवा इस्लामधर्मासारखी धमकी समशेरशाही, बिलकुलच दाखवीत नाहीं. आणि तीं दाख विण्याचें आम्हांला यतकिंचित् देखील कारण पडत नाह कारण, मुळाशींच पक्का बंदोबस्त असल्यामुळें, आमच धर्माच्या संबंधानें परधर्मीयांवर जुलूम होण्याचा का मात्रही संभवच नाहीं.

अशा प्रकारचा पूर्ण बंदोबस्त असून, आणि आम धर्मांत येण्याला आम्हीं को

इच्छा. धर्म हा एकसारखा वाढतच चालला आहे, व त्यांतील लोकसंख्याही दिवसानुदिवस वृद्धिंगतच होत आहे. इतकेंच नव्हें तर, परधर्मीयांस मुद्धां आमच्या धर्माचीं तत्वें विशेष प्रशस्त वाटल्याकारणानें, ते मोठ्या खुषीनें व उत्सुकतेनें हिंदूच होऊं पाहत आहेत.

---

1 "As to Hinduism, it is a solemn thought that at least 200 millions of our fellow-subjects are adherents of that religion. And yet it is a remarkable characteristic of Hindusim that it neither requires nor attempts to make converts. Nor is it by any means at present diminishing in numbers. Nor is it at present being driven off the field, as might be expected, by being brought into contact with two such proselyting religions as Christianity and Mahammadanism. On the contrary, it is at present rapidly increasing."

( The Religion of the Hindus. By Sir. M. Monier Williams. The Indian Magazine and Review. p. 433--434. Vol. XXII. No. 249 September 1891.).

2 "But * * * ( says Anne Besant ) I regard Hinduism as the most ancient of all religions, and as containing more fully than any other the spiritual truths, named Theosophy in modern times. Theosophy is the ancient Brahma Vidyá of India. Of this, Hinduism is the earliest and best exoteric presentment. Exoterically, therefore, I am a Hindu in my religion and in my philosophy."

Anne Besant's view of the Hindu religion the Daily Chronicle of 7th April 1894. )

*तत्संबंधीं अटकाव.*

परंतु, आम्हांला त्यांस आमच्या कळपांत घेतांच येत नाहीं, किंवा त्यांस हिंदूही बनवितां येत नाहीं. आणि असें जरी आहे तरी देखील, हिंदुधर्माचें केवळ मोहकच स्वरूप असल्याकारणानें, हे परधर्मीय फक्त आचारानें आणि विचारानेंच हिंदु होऊं इच्छितात, ही महदाश्चर्याची व विशेष आनंदाची गोष्ट होय.

*हिंदु धर्मातील सत्व-रस.*

याप्रमाणें, हिंदुधर्माच्या थोरवीचें जेवढें ह्मणून वर्णन करावें तेवढें थोडेंच. कारण, हा धर्म सर्व धर्मांचें केवळ भाजन आणि आश्रयस्थानच असून, त्याचें व्यापकत्व व त्याची समस्तता, हीं सर्वांशींच कबूल झाल्यासारखीं आहेत. इतकेंच नव्हे तर, हिंदुधर्म हा एक विलक्षण सबरसच आहे, असेंही म्हटलें तरी शोभण्यासारिखें आहे.

*त्यांतील माधुर्य,*

कारण, ज्याची अशी अभिरुचि असेल, त्याप्रमाणें त्याला तो मिठास वाटतो. आणि ज्याला जें पाहिजे आहे, त्याला तें त्यांत उपलब्ध होतें.

*तत्संबंधीं पाश्चात्यांचें मत.*

आमच्या हिंदुधर्माचें वर्णन सरमॉनिअर विल्यम्सनें फारच मजेचें केलेलें असल्यामुळें, तें प्रत्येकानें विशेष रीतीनें, मनन करण्यासारिखें आहे. आणि म्हणूनच स्थलसंकोचा-

१ [illegible]

संबंधीं काडीमात्र देखील शंका मनांत न आणितां, त्यांतील जरूर तितकें समग्र अवतरण याखालीं देतों. तो असें ह्मणतो कीं,

" Another characteristic of Hinduism is that it is all-receptive, all-comprehensive. It claims to be the one religion of humanity, of human nature, of the entire world. It cares not to oppose the progress of Christianity, nor of any other religion. For, it has no difficulty in including all other religions within its all-embracing arms and ever-widening fold. And, in real fact, Hinduism has something to offer which is suited to all minds. Its very strength lies in its infinite adaptability to the infinite diversity of human characters and human tendencies. It has its highly spiritual and abstract side suited to the philosophical Bráhman; its practical and concrete side suited to the man of affairs and the man of the world; its aesthetic and ceremonial side suited to the man of poetic feeling and imagination; its quiescent and contemplative side suited to the man of peace and lover of seclusion. "　* * *

" What, then, you ask, is the secret of this all-comprehensiveness and many sidedness? My reply is that Hinduism is founded on a very subtle system of pan-

theistic philosophy excogitated long ago by the Bráhmans. A system which the human intellect most naturally thinks out, for itself; a system which is, in some respects, almost identical with that thought out by Spinoza, one of the profoundest thinkers of modern Europe. Indeed, if you will pardon the anachronism, the Hindus were Spinozaites more than 2, 000 years before the existence of Spinoza; and Darwinians many centuries before Darwin; and Evolutionists many centuries before the doctrine of Evolution had been accepted by the Huxleys of our time, and before any word like Evolution existed in any language of the world. The Hindus, in short, have for centuries believed that their one god Brahma ( neuter ), their one impersonal spiritual essence or energy—identified with everything, and constituting every thing—is forever evolving itself out of its own inner substance. Like a vast tree with countless branches, for ever-expanding itself out of an eternal seed, and for-ever drawing back or being re-absorbed into itself, and disappearing again and again into formlessness and impersonality. And the first evolution they believe to be a God, the *Personal* Creator, called Brahmà ( masculine ); the second, God, the Preserver, called

Vishnu, ( also masc. ); tha third, God, the Destroyer and Recreator, called Siva ( also masc ). These three are sometimes represented by three noble heads rising out of one body, to denote that their functions are interchangeable. Brahmà, the personal Creator, has four faces looking in every direction, to show his watchful care over his creatures; Vishnu, the personal Preserver, has four arms, to show his power to save from what-ever direction evil may come; while Siva, the personal Destroyer, has three eyes, to denote destroying time past, present, and future. This idea of one *impersonal* Essence—the sole, really existing Being—expanding itself into three principal divine *personalities*, is true Brâhmanism." * * *

( The Indian Magazine and Review. No. 249. September. 1891. Sir M. Monier Williams on the Religion of the Hindus. P. P. 434/35).

जुलुम, लालूच, व अज्ञान, इत्यादि कारणांनीं झालेलें धर्मांतर.

कदाचित् कोणी असा प्रश्न करील कीं, अहो, जर हिंदुधर्माचें एवढें मोहक स्वरूप आहे, तर मग, आपला धर्म टाकून हिंदूंनीं परधर्म ह्मणजे ख्रिस्तिधर्म, किंवा इस्लामधर्म कसा स्वीकारला? आतां,

ह्या प्रश्नाचें उत्तर तर अगदींच कठिण नसून, तें केवळ सरळ आहे. तें असें कीं, १ जुलुम, २ लालूच, व ३ अज्ञान, इत्यादि कारणांनींच कित्येक लोक बाटलेले असून, ते अजूनही त्याच कारणांनीं बाटतात.

ही गोष्ट तर सर्वांसच चांगली महशूर आहे कीं, हिंदु- लोकांस बाटविण्याच्या संबंधानें विदेशीयांनीं, ह्मणजे मुसलमानांनीं आणि किरिस्तावांनीं, कांहीं भयंकर व अनन्वित कहर केला होता. मात्र, या दोहोंत भेद ह्मणून इतकाच कीं, इस्लामधर्मानें केवळ तरवारीच्या जोरावरच अखिल जनसमूहाचें धर्मान्तर करण्याचा विडा उचलला असून, ख्रिस्तिधर्मानें ( १ ) जुलुम, व ( २ )

त्याचा प्रकार.

1 " On the first invasion, each city was called on, as the army approached, to embrace the Mahometan religion, or to pay tribute. In case of refusal, the city was attacked, and if it did not capitutale, all the fighting men were put to death and their families were sold for slaves. "

( Elphinstone's History of India. p. 515. )

2 " Only those who read the contemporary narratives of their ( Portuguese ) conquests, can realize the superstition and the cruelty with which their history in the Indies is stained. "

( Dr. Hunter's Indian Empire. p. 359 ).

भारतीयसाम्राज्य, पूर्वार्ध, पुस्तक साहावें, भाग ३५, पान २३ २।१।१५ पहा.

लालूच यांचें यथेष्ट अवलंबन करून, शिवाय लोकांच्या(१) अज्ञानाचा देखील, बूड चेपलें त्या ठिकाणीं, त्यानें चांगला फायदा घेतला, आणि अजूनही तो घेत आहे. तथापि,

त्यामुळें झालेलें परिवर्तन.

अशा धर्मान्तरामुळें, आणि जुलूमाच्या रामरामानें, ह्या बाटणारांस कृतापराधाबद्दल दुःसह पश्चात्ताप झाल्याशिवाय कधींही राहत नाहीं, व ह्याच कारणानें बहुत करून धर्मान्तर करण्याला सहसा कोणी देखील प्रवृत्त होत नाहीं. कारण,

---

१ निराश्रित आणि व्यसनी लोक केवळ पोटाकरितां, व पैशाकरितां बाटल्याचीं उदाहरणें असंख्यप्रमाणानें सांपडतील. एक शाद्री आपल्या स्वतःच्या अनुभवावरून असें लिहितो कीं,

" The truth is, that they (Christian Missionaries) have there spilt the precious water of Baptism upon some few faces, *working upon the necessity of some poor men, who for want of means, which they ( missionaries ) give them, are contented to wear crucifixes* " ( Avoyage to East India. ).

"2. But who ( poor men ) *for want of knowledge* in the doctrine of christianity are only in name Christians.'

( Della Valle. quoted in Tod's Rajasthan, p. 560 Vol. I. )

२ एतद्विषयक सविस्तर वर्णन भारतीय साम्राज्याच्या पूर्वार्धांत, ह्याच्या पुस्तकांत, ३५ व्या भागांत, पान ७।८।९।१०।११ यांत दिलेलें आहे, तें पहावें, म्हणजे सर्व मजकूर ध्यानांत येईल.

आमच्या धर्मांत आम्हाला सर्व कांहीं उपलब्ध आहे. इतकेंच नव्हे तर, आमच्या हिंदुधर्मांत राहूनच आम्हाला सदैव आनंद होण्यासारिखा आहे.

हिंदुधर्मावरील हें जें आमचें दृढतरबंधन व अपूर्वप्रेम, त्याचा परिणाम. याविषयीं **पाश्चात्य** देशांतील मोठमोठ्या विद्वानांची देखील अगदीं खात्री होऊन गेली आहे. एके ठिकाणीं **सर, मॉनिअर विल्यम्स्** हा असें म्हणतो कीं,

" And thus it is that the most highly educated natives are quite content to remain Hindus in name and in religion, to the end of their lives. "[1]

आमच्या हिंदुधर्माचें[2] महत्व, आणि आमच्या समाजघटनेची शक्ति, यांजपुढें **ख्रिस्ती**धर्माचें कांहींएक चालत नसल्या कारणानें, तो केवळ निस्तेज व

हिंदुधर्माच्या महत्वाचा पाद्री लोकांवर परिणाम.

1 Sir Monier Williams on the Religion of the Hindus. ( vide. The Indian magazine and Review- No. 249. September 1891. ).

2 " I think it will be admitted by all who have thoughtfully considered the problem of Indian evangelization that the strength and influence of Hinduism are to be found in that great socio-religious organization, which is conveniently described as the system of caste. "

( Rev. D. Machichan. D. D. )

फिकाच पडतो. आणि ह्याच कारणानें, खिस्तिधर्माची पंगुता व त्याचें दौर्बल्य हीं पाश्चात्य धर्मोपदेशक जे पाद्री ( मिशनरी लोक ), ह्यांस देखील केवळ निरुपायास्तव अगदीं कबूलच करावीं लागतात.

---

1 " The records of each Decennial Conference * * * * reveal with equal clearness the fact that *such methods have achieved comparatively little in the way of distinct Christian accessions* from the *great* religious system which dominates the land." * * *

" For, within the system of which we speak, there are myriads of the poorest and weakest whose attitude towards the Gospel is as full of resistence as that of the mighty and wise amongst them; it is the result of the natural working of *that* system to which all these classes, the noble and the poor, the mighty and the weak, the wise and the unwise, alike belong. * * * Now, it has been *abundantly demonstrated* that there has been *no visible Christian progress* amongst such classes."

( Education as a missionary Agency. A paper read by the Rev. D. Machichan D. D: Principal of the Wilson College Bombay, in the Decennial Conference, held on the 2nd of January 1893. ).

येशुखिस्त, ज्याच्या नांवानें हा धर्म सर्वांस महशूर आहे, तो इ. स. पूर्वी सुमारें चार वर्षें जन्मला होता, असें ह्मणतात.

# भाग ४३ वा.

## इस्लामधर्म.

इस्लामधर्म.

येथपर्यंत आपण हिंदुस्थानांतील मुख्य चार धर्मांचा विचार केला. आतां, बाकी राहिलेला जो पांचवा इस्लामधर्म, त्या विषयींचें यथावकाश विवेचन करूं.

त्याची जन्मभूमि.

इस्लामधर्माची जन्मभूमि अरबस्थानच होय. हें द्वीपकल्प दक्षिणवाही असून, साधारणतः तें बरेंच मोठें आहे. किंबहुना तें हिंदुस्थानापेक्षां विशेष धाकटें नाहीं, असेंही ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं.

त्या भूमीचें वर्णन.

अरबस्थानांत मेघवृष्टि क्वचितच होते. त्यामुळें अखिल देश रखरखीत दिसतो. आणि ज्याप्रमाणें आफ्रिकाखंडांत साहारा नांवाचा वालुकामय प्रदेश आहे, अथवा तिबेटांत शामो नांवाचीं "मरुस्थलें आहेत, त्याच मासल्याचा हाही प्रदेश आहे.

ह्या भूमींतील लोक.

इस्लामधर्माप्रमाणें, आरबी लोकांचें देखील मूलस्थान ह्मटलें ह्मणजे हाच देश होय. तथापि, येथेंही या लोकांची कायमची अशी वस्ती बहुतकरून

कोठेंच नसते. कारण, ते हम्मेश स्थलांतर करितात, आणि लमाण अथवा वणजारी लोकांप्रमाणें, ते नेहमी तंबू मारून राहतात. ते अनेक प्रकारचीं जनावरें आपल्या संग्रहीं ठेवितात, व त्यांजला वेळोवेळीं चारापाणी देऊन, त्यांस ते मोठ्या आस्थेनें बाळगितात. त्यांचा बहुतेक उदरानिर्वाह देखील ह्या जनावरांवरच चालतो. यामुळें, ते पशुचारणोपजीवीच आहेत, असेंही ह्मणण्यास फारसा प्रत्यवाय येणार नाहीं. यांच्यापाशीं उंट व घोडे, गुरें आणि ढोरें, बकरीं व मेंढरें, इत्यादि असतात, आणि ह्या सर्व लटांबरासहीतच ते निरंतर प्रवास करितात.

त्यांची वस्ती.

याप्रमाणें, अरबस्थानांतील बहुजनसमाजाची वस्ती जरी स्थिर नाहीं तरी, कित्येकांनीं केवळ व्यापार निमित्तच आपलीं कायमचीं बंदरें येथेंच केलीं असून, ते इराण, हिंदुस्थान आणि आफ्रिका, ह्यांच्याशीं देवघेव चालवितात.

[...]ह्यांजवर झालेल्या स्वाऱ्या.

आरब लोकांस जिंकण्याकरितां, ह्या द्वीपकल्पावर वेळोवेळीं अनेक स्वाऱ्या झाल्या असल्याचें दिसून येतें. इसवी शकापूर्वी २४ व्या वर्षी, ऑगस्टस् नामक रोमच्या बादशहानें [अ]रबस्थानावर एक मोठी स्वारी पाठविली असून, त्या[वे]ळीं ईलियसगॉलस् नामक जो मिसर देशाचा सुभेदार [हो]ता, त्याकडेच तिचें धूरीणत्व दिलें होतें. पुढें, इसवी

सन १०९ सालीं, **ट्रेजन** नांवाच्या बादशहानें तर, **दमास्कसपासून तांबड्या** समुद्रापर्यंतचा टापू काबीज केला. आणि **अरबस्थानास** आपल्या राज्याचा एक प्रांत बनविला.

इ० स० ५२५ सालीं, या द्वीपकल्पाचा **येमेन्** नांवाचा नैर्ऋत दिशेकडील भाग खालसा झाला, आणि तो **आबिसिनियाच्या** राज्याला जोडला गेला. इ० स० ५७० सालीं **अरबस्थानावर** आणखी एक स्वारी झाली. परंतु तिचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. इतकेंच नव्हें तर, त्या स्वारीचें नियंतृत्व ज्याच्याकडे सोंपलेलें होतें, तोहि बिचारा मरण पावला.

येमेन् प्रांत.

वर जो **येमेन्** नांवाचा प्रांत सांगितला, तो निर्झर प्रसादित असल्याकारणानें फार सुपीक आहे. आणि त्यामुळेंच येथें धान्य, काफी, भाजी पाला, वगैरे हरएक जिन्नस पिकतो.

हैद्रमन्त प्रांत.

**येमेन्च्या** पूर्वेस, परंतु **अरबस्थानच्या** दक्षिणेस **हैद्रमन्त** नांवाचा प्रांत आहे. ह दुरून रखरखीत आणि भयानक, व उध्वस्त आणि निर्जन दिसतो. तथापि, आभ्यंतर भागांत तो विशेष सुपीक आहे ठिकठिकाणीं मळे व फळफळावळ दृग्विषयीभूत होते

त्याचा सुपीकपणा.

धान्याचीं हिरवींगार शेतें कित्ये

1 Wellsted's "Travels in Arabia." ( vol. p. p. 115-116 ).

कोसपर्यंत एकसारखीं लागत गेलेलीं दृष्टीस पडतात. चोहोंकडे पाण्याचे प्रवाह भासमान होतात. आणि जंबीर, संत्रें, नारिंगें, व बदाम, इत्यादि वृक्षांचे मंडप, बुभुक्षितनेत्रकमलांचें जणूं काय पारणेंच फेडून, तृषार्तास शान्ति, आणि परिश्रान्त अशा पथिकजनांस निःसीम आनंद देतात.

अरबस्थानचा व्यापार.

प्राचीनकाळीं, **अरबस्थान**चा व्यापार मुख्यत्वेंकरून तीन दिशांनींच चालत असे; म्हणजे कांहीं पश्चिम दिशेनें, थोडाबहुत दक्षिणेकडून, आणि बाकीचा पूर्व मार्गानें.

त्याचे मार्ग.

पश्चिमेकडील व्यापार दक्षिणोत्तर चाले. म्हणजे तो **येमेन्** आणि **हिजाझ** प्रांतांतून **मक्का**, **पेत्रा**, **मिसरदेश**, **पालेस्तैन्**, इत्यादि ठिकाणीं होई. तसेंच दक्षिणचा व्यापार पूर्वपश्चिम दिशेनें **हैद्रमन्त** प्रांतांतून चाले. आणि पूर्वबाजूचा व्यापार **इराण**च्या आखातांतून चाले, वतो **युफ्रेटीज** नदीच्या मुखानें उत्तरेकडील प्रांतांशीं जोडला [illegible]. त्यामुळें, **सीरिया** प्रांत, आणि **दमास्कस** व **टायर**, [illegible] शहरें, यांच्यांशीं सतत दळणवळण राही.

आरब लोकांचा [illegible]व.

[illegible]**आरब** लोक साधे, पण स्वभावानें फारच क्रूर, आहेत. ते व्यवस्थितपणें राहतात. ते मोठे शूर, धाडशी, आणि चपल आहेत.

---

1 ( Islam and its founder. By J. W. H. Stobart [illegible]. A. ). p. 10.

तरी पण ते फारच अविचारी, अति दुराग्रही, व हेकेखोर आहेत. दुसऱ्याचा सूड उगविण्याच्या कामीं, त्यांची अत्युत्कट इच्छा व लज्जास्पद क्रौर्य दिसून येतें. ते केवळ धर्मान्धच असल्याकारणानें, परधर्माचा मनापासून द्वेष करितात. ते मोठे आपमतलबी आहेत, त्यामुळें त्यांच्यांत नीतिशैथिल्य विशेष दिसून येतें. ते निःसीम विषयान्ध आहेत. आणि त्याच कारणानें, केवळ कामशान्त्यर्थच अति घोर पापें करण्यास देखील ते कधींही मागेंपुढें सरत नाहींत. परदुःखाबद्दल तर त्यांस तिळमात्रही विधिनिषेध नाहीं. आणि आरोग्य रक्षणाच्या कामीं ते फारशी काळजीही घेत नाहींत, किंवा त्याबद्दल ते विशेष परवा देखील करीत नाहींत,

अस्तु. याप्रमाणें, वाचकाला केवळ आनुषंगिक गोष्टींची थोडीबहुत तरी माहिती मिळावी एतदर्थ, प्रस्तुतविषय जो इस्लामधर्म त्याचें विवेचन करण्यापूर्वींच, आरबलोक व त्यांचें वसतिस्थान, यांविषयींचें थोडक्यांत व अवश्य तें दिग्दर्शन करणें अगदीं भाग पडल्यामुळें तें केलें. तथापि, आतां आपण त्यांच्या धर्माकडे लवकरच वळूं, आणि त्यांत कोणतीं व कशा प्रकारचीं नीतितत्त्वें आहेत, एतद्विषयक विचार करूं.

परंतु, हा विषय हातीं घेण्यापूर्वीं, इस्लामधर्माची

खिस्तिधर्मापासून इस्लामधर्माची उत्पत्ति.

उत्पत्ति खिस्तिधर्मापासूनच झाली असल्यामुळें, खिस्तिधर्माची व्याप्ति आणि इस्लामधर्माची ऐतिहासिक परंपरा, यांविषयींची अल्पस्वल्प तरी हकीकत अवश्य दिली पाहिजे. यास्तव ती अगोदर येथें देतों.

खिस्तिधर्माची व्याप्ति.

खिस्तिधर्माचें आदिपीठ जरूसेलेम असून, तेथूनच तो धर्म पालेस्टाईन, सीरिया, लघुआशिया ( एशियामायनर ), मिसरदेश ( ईजिप्त ), आणि मासिडोनिया, वगैरे पाश्चात्य देशांत, व अरबस्थान, इराण, तुर्कस्थान, आणि हिंदुस्थान, इत्यादि पौरस्त्य देशांत पसरला. इतकेंच नव्हें तर, त्याच्या प्रसारार्थ तद्धर्मीयांनीं भगीरथ प्रयत्नही केला.

त्याचा अरबस्थानांत व इतर ठिकाणीं प्रसार.

असो. इसवी सनाच्या ७० व्या वर्षी, टायटस्‌नें जरूसेलम् जाळलें, आणि त्या कारणानें खिस्तिधर्मीयांचा बराच समुदाय ठिकठिकाणीं जाऊन राहिला. केवळ अरबस्थानच व्यापून राहिले असें नाहीं, तर त्यांनी अन्य देशांत देखील गमन केलें. त्यामुळें खिस्तिधर्माचा प्रसार होण्यास ही एक मोठीच संधी सांपडली, व तो शनैःशनैः परंतु एकसारखा, अरबस्थानांत आणि इतर

1 Islam and its founder. By Stobart. B. A. p. 24.

देशांत पसरतच चालला. पुढें इ. स. ३३० सालीं **कॉन्ष्टण्टिअस्** बादशहाच्या दीर्घोद्योगानें **ख्रिस्तिधर्मा**ला अनुकूल असे विशेष हक्क **येमेनच्या** राजाकडून मिळाले, व त्यानंतर लवकरच **एदन** येथें तीन **ख्रिस्ती** देवालयें बांधलीं गेलीं.

खिस्तिधर्मांतील मूर्तिपूजा.

इतकें झालें तरी, **ख्रिस्तिधर्मा**चा झपाट्यानें प्रसार होण्याच्या कामीं, अनेक अडचणी उद्भवत असत. कारण, ज्यू लोक जरी प्रत्यक्ष **ख्रिस्तिधर्मा**नुयायीच होते; तथापि, ते देखील मूर्तिपूजकेंच असत. आणि ही मूर्तिपूजा सुद्धां फार प्राचीन काळापासून प्रचारांत होती. परंतु, ती **ख्रिस्तिधर्मा**ला संमत नव्हती.

अरबस्थानांतील मूर्तिपूजा.

**अरबस्थानां**त देखील मूर्तिपूजा ह्मणून होतीच. आणि **आरबी** लोक ग्रह आणि नक्षत्रें, व देवदूत आणि प्रतिमा, यांची पूजा

1 " Yet we find that idolatry before this had orept in, and that Terah, the father of Abraham, had observed the worship of " the Lord God of Shem, " and " served other gods. " ( Joshua XXIV. 2 ). Laban ( B. C. 1739 ) had images; and Amaziah ( B. C. 820 ), after the slaughter of the Edomites, brought away " the gods of the childern of Seir. " ( 2 Chron. XXV. 14 ).

( Islam and its founder. p. 29 ).

2 ( Islam and its Founder. p. 31 ).

करीत. फार तर काय सांगावें, पण इसवी सनाच्या ४ थ्या शतकापर्यंतही, ते येमेन् प्रांतांत सूर्याला हविर्भाग देत असत.

मक्केनजीक तयीफ गांवच्या लोकांजवळ एक प्रकारची मूर्ति असून, तिला लाट अशी संज्ञा होती. ह्या मूर्तीचा ते लोक फारच मानमरातब राखीत, आणि अति गौरवानें पूजाही करीत.

काबा नांवाचें पुण्यस्थान.

मक्केंतील काबा नांवाचें पुण्यस्थान तर बहुतकरून सर्वांसच महशूर आहे. ह्या तीर्थस्थलाविषयीं अशी एक आख्यायिका आहे कीं, ईश्वरआज्ञा भंग केल्याबद्दलच्या अपराधास्तव, आदम आणि ईव यांजला नन्दनवनांतून घालवून दिल्यावर, अनेक दुःखें, असह्य विरहवेदना, व अत्यंत प्रवासकष्ट, इत्यादि त्यांस सोसावे लागले; व

त्याची आख्यायिका.

शेवटीं ते दोघेजण मक्केंत दाखल झाल्यावर, त्यांची परस्पर भेट झाली. तदनंतर, नन्दनवनांत प्रथमावस्थेंत ते ज्याप्रमाणें प्रभुप्रार्थना करीत होते, त्याचप्रमाणें ईश्वरस्तव करण्यासाठीं, त्यांनीं पूर्वीच्या नमुन्याप्र अनुसरून एक देवालय बांधलें. परंतु कालान्तरानें,

1 Herodotus (III.8) writes of the Arabs that 'they acknowledge no other gods but Baechus and Urania * * they call Baechus Orotal, and Urania Alilat."

( Islam and its founder. p. 31 ).

2 Paradise.

जलप्रलयाच्या वेळीं तें विध्वस्त होऊन, त्याचा मागमूस-ही राहिला नाहीं. पुढें एके प्रसंगीं, **हागर** आणि **इश्मायल** असे एका वालुकामय प्रदेशांत फारच तृषाक्रान्त होऊन, अगदीं मरणोन्मुख झाले. त्या वेळीं 'एका देवदूतानें त्यांस हेंच ठिकाण दाखविलें, आणि तेथून एकदम जलप्रवाह वाहूं लागला. त्या कारणानें त्यांची तृषा भागली, व अखेरीस त्यांचे प्राणही वाचले. ह्याच सुप्रसिद्ध निर्झ-

झिम् झिम् निर्झर. रांला **झिम्**[1] **झिम्** अशी संज्ञा असून, तत्सन्निधच **मक्का** शहर वसलेलें आहे. परंतु कांहीं **मुसलमान** लोकांचें असें मत आहे कीं, **झिम् झिम्** आणि **सिलोआ** असे दोन्ही नन्दनवनांतलेच झरे आहेत. **हागर** आणि **इश्मायल** यांचा हाच अधिवासित प्रदेश होता, व तत्संबंधीं उल्लेख **कुराणांत**[3]ही केलेला असल्याचें आढळून येतें.

असो. **मुसलमान** लोक कांहीं ठिकाणीं तर पादुकांची

---

1 Islam and its founder. ( By Stobart. p. p 33—34. )

2 Farrar's Life of Christ.

3 " O Lord, I ( Abrabam ) have caused some of my off-spring to settle in an unfruitful valley, near thy holy house, O Lord, that they be constant at prayer "

( Sura XIV. 40 ).

इस्लामधर्मांतील पादुकांची पूजा.

देखील पूजा करितात, आणि हा परिपाठ आजमित्तीसही अगदीं जारीनें अमलांत आहे. ह्या पादुका **कन्याकुमारी**जवळ असून त्या **श्रीशंकराच्या** असल्याविषयीं हिंदूंची समज आहे. पुढें त्या तशा समजून, आह्मींच त्यांची प्रथमतः पूजा करावयास लागलों. आमच्या मागून, **बौद्ध** लोक आले. त्यांनीं त्या पादुका **बुद्धाच्या** आहेत असें मानून, त्यांची तेही पूजा करावयास लागले. **बौद्ध**धर्मानंतर **ख्रिस्ति**धर्माचा प्रसार होत चालला. व ह्या धर्मानें **बौद्ध**धर्माचें सर्वप्रकारेंच अनुकरण केलें असल्यामुळें, फक्त नांवांतच फेरबदल करून, ह्या पादुका **आदमच्या** आहेत अशी **ख्रिस्त**धर्मीयांनीं कोटी लढविली; आणि त्या मिषानें ते देखील त्यांची पूजा करूं लागले. आतां, **इस्लामधर्म सुद्धां ख्रिस्ति**धर्मापासूनच उद्भवला असल्या कारणानें, **मुसलमानांनीं** देखील या पादुकांची पूजा करावयास प्रारंभ केला, व तोच प्रचार अजूनही कायम आहे.

---

1 " Thus, the Siva-worshippers ascend the top of Adam's peak in Ceylon, to adore the foot-print of their phallic god, the *Siva-pada*; the Buddhists repair to the spot to revere the same symbol as the foot-mark of Buddha; and the Mahamedans venerate it as the relic of Adam, the Semitic father of man-kind. "

( Dr Hunter's Indian Empire. p. 203 )

ह्या पादुकांच्या संबंधानें मुसलमानी धर्मशास्त्रांत अशी एक आख्यायिका आहे कीं, आदम आणि ईव्ह यांजला नन्दनवनांतून आकाशांतील बापानें हद्दपार केल्यावर, आदम हा सेरिन्दीव ( सीलोन किंवा सिंहलद्वीप ) येथें येऊन पडला, व तेथेंच त्याचीं पादचिन्हें उमटलीं. पुढें ईव्ह ही अरबस्थानांत जिद्दा नजीक येऊन थडकली. तदनंतर, त्यांचा वियोग सुमारें दोनशें वर्षेपर्यंत होऊन, शेवटीं मक्केजवळ अराफत पर्वतावर त्यांची परस्पर भेट झाली. ईवचें थडगें जिद्दा नजीक तटाबाहेर असल्याचें दाखवितात. हें साठ हात लांब आणि बारा हात रुंद आहे. ह्याचें कारण असें सांगतात कीं, आदम आणि ईव हीं दोघें अत्युच्च ताडाएवढीं उंच असत. हल्लीं, आदमचें थडगें सिंहलद्वीपांत किंवा मक्केजवळ असल्याविषयीं लोकांची समज आहे.

सिंहलद्वीपांतील पादुकांविषयीं आख्यायिका.

आम्हां हिंदूंप्रमाणें मुसलमान लोक देखील शाळिग्रामासारख्या एका काळ्या दगडाची पूजा करीत असल्याचें दिसतें. हा दगड काबानामक तीर्थाच्या भिंतींत गाडलेला असून, तो स्फटिका सारिखा चकचकतो. तो अर्धचंद्राकृति, व आठ आंगळें ( इंच ) रुंद, आणि सहा आंगळें उंचीचा आहे.

इस्लामधर्मांतील पथ्थर पूजा-

1 ( Islam and its founder. By Stobart. B. A. )

तो रक्तवर्णमिश्रित काळा आहे, आणि त्याचा पृष्ठभाग गुळगुळीत आहे. तो भिंतीच्या बाहेरल्या बाजूला पूर्वेकडे जमीनीपासून चार फुटीवर ( अडीच हातांवर ) असून, तो नन्दनवनांतूनच आणिला असल्याविषयीं सांगतात.

सदरहू विवेचनावरून, नामविशेष किंवा स्थलविशेष, बलिप्रदान किंवा होमहवन, मूर्तिपूजन अथवा देवतार्चन, यासंबंधानें हिंदुधर्म, बौद्धधर्म, ख्रिस्तिधर्म, आणि इस्लामधर्म, यांच्यांत कितपत साम्य व कसें बलवत्तर संमिश्रण आहे, हें सहजीं ध्यानांत येण्यासारिखें आहे.

*हिंदु, बौद्ध, ख्रिस्ती, व इस्लाम धर्मांचें संमिश्रण.*

येथपर्यंत सामान्य विवेचन झालें. सबब, आतां आरबांच्या मूळपुरुषांविषयीं आपणांला कांहीं दाखला मिळाला तर पाहूं. आरब लोक हे १ कूश, २ शेम, ३ इश्मायल, ४ कतुर, आणि ५ इसाव, या पांच पुरुषांचे वंशज असल्याचें अनेक आधारांवरून समजतें. इतकेंच नव्हें तर, तद्विषयक लेख जुन्या करारांतही आढळून येतात. आणि ह्यावरूनच ते यहुदी वंशज असल्याचें खात्रीपूर्वक सिद्ध होतें.

*आरबांचे मूळपुरुष.*

1 ( Islam and its founder. p. 35. )
2 ( Islam and its founder. By Stobart. B. A. )
( Sale's Korân. Preliminary Discourse. p.9 ).
3 (Islam and its founder. )

असो. इतकी प्रस्तावना प्रस्तुत विषय समजण्यास बस्स आहे असें समजून, आतां **इस्लाम** धर्माकडे वळतों.

इस्लामधर्माचा उत्पादक महमद.

**इस्लामधर्माचा** उत्पादक **महमद** होय. सबब त्याच्या चरित्राचाच इत्थंभूत विचार केल्यानें, ह्या धर्माचें एकंदर रहस्य व त्यांतील नीतितत्त्वें सहजीं लक्षांत येण्यासारखीं आहेत. ह्मणून या विषयनायकाच्या चरित्राचा अथपासून इतिपर्यंतचा इतिहासच वाचकांपुढें सादर करितों.

त्याचीं माता पितरें.

**महमदाच्या** आईचें नांव **आमीना** असून, त्याच्या बापाचें नांव **अबदल्ला** होतें; व हा **हशीम**चा नातू होता. **महमद** हा इ० स० ५७० सालीं **मक्का** येथें जन्मला.

त्यांचा पूर्ववृत्तान्त.

**महमदाचा** जन्म होण्यापूर्वींच त्याचा बाप निवर्तला असल्याकारणानें, त्याच्या मागें त्याचें पालनपोषण करण्याचें काम त्याच्या आईवर सहजींच पडलें. परंतु दुर्दैवानें ती देखील फार वर्षें वांचली नाहीं. **महमद** आठ वर्षांचा असतांनाच ती मरण पावली; आणि त्यामुळें त्या मुलाचें पालन करण्यासंबंधींचा बोजा त्याच्या आज्यावर, म्हणजे आईच्या बापावर पडला. पुढें तोही मरण पावला, व त्याच्या पश्चात् त्या अर्भकाचें संगोपन, त्याचा मामा **अबुतालेब** यानें केलें.

कदिजाशीं महमदाचा संबंध.

आपल्या वयाच्या पंचविसाव्या वर्षी महमदानें कदिजा नामक विधवेजवळ नोकरी पतकरली. ही औरत मक्का येथील एका प्रसिद्ध नगरशेटची बायको होती. हिच्याजवळ कांहीं उंट व व्यापाराचा बराच उदीम होता, म्हणून ती दमास्कस येथें जावयास निघाली. कारण, त्या वेळीं दमास्कस शहरांत एक प्रचंड जत्रा भरत होती. सबब, आपला उदीम खपावा एतन्निमित्त, आपले उंटाचे काफले व इतर सरसामान, यासहित तिनें तिकडेच प्रयाण केलें; व त्या वेळीं तिच्याबरोबर महमदही गेला.

महमदाची मनोहर आकृति व त्याची व्यंजक मुद्रा,

महमद हा मध्यमाकृती होता. तरी पण, तो तेजस्वी असे. त्याचें कपाळ विशाळ असून तुळतुळीत होतें. केश मृदु आणि काळेभोर असत. त्याचे डोळे घाऱ्या रंगाचे परंतु सतेज असून, त्यांत एक प्रकारचा मोहकपणा व चमक होती. त्याचें नाक पोपटासारिखें अणकुचिदार होतें. त्याचे दांत स्फटिकासारिखे शुभ्र असून, ते विरळ आणि करवतीसारिखे साग्र होते. त्याचा बांधा सुबक, तथापि मजबूत आणि भव्य असे. व त्याची एकंदर मुद्रा फारच व्यंजक असून मनोहर होती.

अशा प्रकारचा देखणा मनुष्य कदिजा नांवाच्या

गतभर्तृकेजवळ नोकर म्हणून प्रथम राहिला, व तोच तिला दिवसानुदिवस प्रियतर होत चालला.

महमदाचें कदिजाशीं लग्न,

**महमदाचें** तें नोकझोकाचें वर्तन, त्याची ती टापटिपीची वागणूक, त्याचा तो बातबेत, त्याची मनोहर व सुंदर कांति, त्याचा हास्यमुख चेहेरा, त्याचें सुप्रसन्न वदन, इत्यादि पाहून **कदिजा** फार मोहित झाली; आणि ह्याच कारणानें, या उभयताची गांठ पडल्यापासून सुमारें तीन वर्षांच्या आंतच, ती **महमदाची** प्रियकांता बनली.

त्यामुळें त्याच्या स्थितींत फेरफार.

ह्या लग्नविधीनें **महमदाचें** बरेंच स्थित्यंतर झालें. कारण, त्यायोगानें त्याला पुष्कळ ऐश्वर्य प्राप्त होऊन, मोठमोठ्या लोकांत त्याचें जाणें येणें होऊं लागलें. त्यामुळें, भिन्नभिन्न धर्मांचीं मूलतत्त्वें, अनेक जातींच्या लोकांचीं मतें, नानाविध राष्ट्रांची सत्ता, समंतात् प्रदेशांतील निरनिराळी राज्यपद्धति, आणि ठिकठिकाणच्या लोकसंस्था, इत्यादि लक्षपूर्वक पाहण्याची त्याला उत्तम संधी मिळाली. इतकेंच नव्हे तर, त्यानें ह्या सर्व गोष्टींचें चांगलें परिशीलन करून, आपल्या मतलबापुरता त्या सर्वांचा त्यानें यथेष्ट उपयोगही केला. ( इ. स. ५९९. )

असो. ह्या नंतरच्या पंधरा वर्षांत कोण कोणत्या गोष्टी

करून येत नाहीं. तथापि, ह्याच संधींत त्यानें हरएक तजवीज करून, लोकांनीं आपल्याला सिद्ध पुरुष म्हणावें या हेतूनें, पुष्कळच खटपट चालविली. इतकेंच नव्हे तर, आपण ईश्वरप्रेषित कोणी तरी महापराक्रमी भविष्य-वादी आहों, असा वज्रलेप संस्कार भाविक आणि मूढ जन-समूहावर होण्यासाठीं, त्यानें खरोखरच भगीरथ प्रयत्न केले.

त्याचा एकान्तवास.

आपले बेत लोकांत अगाऊ किंवा अकालिक प्रसिद्ध होऊं नयेत एतदर्थ, केवळ तपश्चर्या करण्याच्या मिषानेंच, महमद हा मक्केजवळील हिरा नामक गुहेत रोज जाई, आणि आपण मनांत आणिलेला नवीन धर्मपंथ कोणत्या प्रकारें फैलावेल, याचा अहर्निशी विचार करी. ( इ० स० ६०९ )

त्याचें बाह्यस्वरूप, व त्याचा नेमनिष्ट-पणा.

प्रथमारंभीं तर, त्यानें कित्येक उपासतापास करून आपली काया झिजविली, आणि विशेष रीतीनें शुचिर्भूत राहून तो फारच नेमनिष्टपणानें वागला. परंतु, जेव्हां त्याच्या पंथाचा दिवसानुदिवस एकसारखा ( सूक्ष्म

---

1 " It was during this interval however, that he meditated and matured the bold design of palming a new religion upon the world. "

( Life of Mahamed. Bombay Tract and Book Society. 3rd Edition p. 29. )

2 ( Life of Mahammad. Tract and Book Society p. 31. ).

वा असूक्त उपायांनीं ) उत्कर्षच होत गेला, व त्याला

त्याचा अन्तर्भाव व खरें स्वरूप.

कांहींजणांची कुमकही मिळाली, तेव्हां त्याला आपोआपच धीर आला, आणि त्यानंतर त्याचें खरें स्वरूप दृष्टीस पडूं लागलें. पुढें त्यानें हवें तसें थोतांड माजविलें; आपण स्वतः मनमानेल तसा वर्तला; आणि लोकांवर हवा त्या प्रकारें जुलुम करून, केवळ तरवारीच्या जोरावरच त्यानें त्यांस आपल्या कळ-पांत आणिलें.

दैविकदृष्टांताचें आविष्कार,व त्याची परिस्फुटता.

आपण ईश्वरप्रेषित दूत असून, लोकांस धर्मोपदेश करण्याविषयीं आपल्याला दृष्टान्तच झाला आहे, अशाविषयीं महमदानें आपल्या कदिजा नामक स्त्रीजवळ प्रथमच परिस्फुटता केली. तदनंतर तिलाही त्या गोष्टीची सत्यता वाटून, तिनें तो वृत्तान्त आपल्या वरक नांवाच्या पुतण्याजवळ सांगि-तला, व त्यानें देखील महमदीधर्म स्वीकारला.

धर्मांतराचा प्रारंभ.

पुढें, श्रीबूएबनूहारेथ् नांवाचा महमदाचा एक गुलाम होता, त्यानें सुद्धां धर्मान्तर केलें; आणि ह्या कृत्याबद्दल बक्षीस म्हणून महमदानें त्यास दास्यत्वांतून मुक्त केलें. व तेव्हांपासूनच, इस्लामधर्माचा अंगिकार करण्यापूर्वी, गुलाम लोकांस गुलामगिरींतून मुक्त करण्याची चाल थोडीबहुत प्रचारांत आली.

याप्रमाणें, महमदाची बायको व त्याचा गुलाम यांनीं

त्याचा शनैः शनैः प्रसार.

धर्मान्तर केल्यावर, त्याचा मामेभाऊ अली, व त्याच्यामागून अबूबेकर, हे देखील त्याच्या कळपांत शिरले. अबूबेकर हा मक्केंतील एक उत्तम नेकीचा व चांगल्या चालीचा गृहस्थ असल्यामुळें, त्याचें जिकडे तिकडे चांगलेंच वजन असे. आणि त्यानें आपण होऊनच इस्लामधर्म स्वीकारल्या कारणानें, इतर जनांनीं देखील त्याचें लवकरच अनुकरण केलें. तदनंतर अबूबेकरच्याच उपदेशानें ओथमन्, अबदुलरहमान, साद, अल्झोबीर, आणि अन्य पुढारी गृहस्थ, यांनीं सुद्धां महमदी पंथाचा स्वीकार केला.

हे सर्व गृहस्थ फारच शूर असून, ते महमदीय सत्तेचे प्रथमारंभीं केवळ आधारस्तंभच होते, असेंही म्हणण्यास हरकत नाहीं. त्यामुळें, महमदास अतिशय पाठबळ मिळून, त्याच्या पक्षाची दिवसानुदिवस एकसारखी सरशीच होत गेली.

असो. ह्या वेळीं, धर्मान्तराच्या संबंधानें महमदाला

अबुबेकरची मदत, व त्याची फेड.

अबूबेकरनें जी मदत केली, त्यामुळें, आपणांवर त्याचे बहुत उपकार झाले आहेत असें वाटून, महमदानें त्यास अबदल्ला ( ईश्वरोपासक ), अल्झिदिक् ( सुशील ), आणि अतिक ( सुसंरक्षित ), असे किताब दिले.

तथापि, " चंचुप्रवेशान्मुसलप्रवेशः, " या महत्त्वा-

महमदाचें प्रथमचें वर्तन.

च्या वाक्याचें **महमदास** जणूं काय बाळकडूच पाजलें असल्याचें दिसतें. कारण, त्याच्या नवीन मतांचा लोकांच्या मनावर संस्कार होऊन त्यांचें बीं चांगलें रुजेपर्यंत, त्यानें लोकांस तिळ- मात्रही न दुखावतां, तो केवळ त्यांच्या धोरणानेंच वागला. इतकेंच नव्हें तर, तो स्वतः देखील सर्वांशीं विशेष नम्र- तेनें वर्तला, आणि कांहीं कालपर्यंत बहुसमाजाच्या इच्छेस अनुसरूनच त्यानें आपला वर्तनक्रम ठेविला.

त्याचा लपंडाव, व

प्रथमारंभीं तीन वर्षेंपर्यंत, **महमद** हा आपलीं मतें फक्त एकान्तांतच प्रकट करीत असे. कारण, धर्मान्तराच्या कामांत **खोरीश** लोकांकडून आप- णाला यत्किंचितही पाठबळ मिळणार नाहीं, असें त्याला खात्रीपूर्वक वाटत असे. इतकेंच नव्हें तर, त्यांजकडून उलट आपल्याला प्रतिबंधच होईल, अशी त्याची बालं- बाल खात्री होऊन गेली होती. यासाठीं, ह्या प्रतिकूल पक्षाला हरएक प्रकारें अटकाव होऊन, आपला कसा तरी कार्यभाग साधावा एतदर्थ, त्यानें नानातऱ्हेचे ढंग केले. आपल्याला दैविक दृष्टान्त होत असतो, अशी त्यानें

कावेबाजपणा.

मनःपूत कंडी उठविली. आपण ईश्वरप्रेषित दूत आहोंत, अशी अफवा चोहोंकडे पसर- ण्याच्या उद्योगास तो लागला. आपण धर्मसंस्थापक आहोंत अशी कीर्ति संपादन करण्याच्या कामीं, त्यानें

भगीरथ प्रयत्न केले. आपल्याला मनुष्यांचें भरपूर पाठबळ मिळावें, एतदर्थ त्यानें अगदीं जारीनें तजवीज चालविली. आणि शेवटीं, आपला पक्ष बराच प्रबल झाला आहे असें जेव्हां त्याला खात्रीपूर्वक वाटूं लागलें, तेव्हांच त्यानें आपलें खरें स्वरूप प्रकट केलें, व तरवारीच्या जोरावर आपल्या धर्माचा धुडगूस मातविला.

त्याची युक्ति.

पुढें, दिवसानुदिवस, **अबूबेकर**ची उत्तम प्रकारची मदत मिळत गेल्या कारणानें, **महमद** फारच धृष्ट होत चालला, आणि **इस्लामधर्मा**ची संस्थापना करण्याविषयीं आपल्याला **ईश्वराज्ञाच** आहे, असें तो उघडपणें प्रतिपादन करूं लागला.

त्याचें बोलणें.

शेवटीं एके दिवशीं, **अल्लीला** सांगून **महमदानें** मेजवानीचा बेत केला; व तींत त्यानें **अबदुलमुतालिब**च्या सर्व नातलगांस जेवावयास बोलाविलें. परंतु ते सर्व न येतां, त्यांपैकीं फक्त सुमारें चाळीसजणांनींच तें निमंत्रण स्वीकारलें. तदनंतर, त्या जमलेल्या मंडळींत उभें राहून **महमद** असें बोलला कीं, " मजला

---

1 " He ( Mahamad ) became a conqueror, offering to his enemies the alternative, the koran, the tribute, or the sword."

( Life of Mahamad. Bombay Tract and Book Society. p. 172. ).

२ हा महमदाचा चुलत भाऊ होय.

ईश्वरानें आपला दूत ह्मणून पाठविलें आहे. सबब ह्या एकत्र झालेल्या समाजांत माझा वजीर व बंधु होण्यास कोण राजी आहे ? "

इतकें बोलणें झाल्यावर, ह्या प्रश्नाला उत्तर ह्मणून कोणी देखील दिलें नाहीं. परंतु पुढें थोड्याच वेळानें, कांहींजणांनीं तिकडे कानाडोळाच केला, व कित्येकांनीं तर त्याला नाकबूलीचाही जबाब दिला. तेव्हां अल्ली हा उभा राहून, आणि महमदाकडे वळून बोलला, " हे ईश्वरप्रेषित भविष्यवाद्या, मीच तुझा वजीर होईन. आणि ह्या तुझ्या चाललेल्या कामांत जो कोणी व्यत्यय आणील त्याचे दांत पाडून, त्याच्या डोळ्याच्या मी खांचा करीन; व तुझ्याविरुद्ध कोणतेंही कृत्य करण्यास जे कोणी धृष्टपणा करतील, त्यांच्या मी तंगड्याच मोडून टाकीन. "

इतका प्रकार झाल्यावर, महमदानें अल्लीला आलिंगन दिलें, आणि त्याठिकाणीं जमलेल्या मंडळीकडे वळून बोलला कीं, " हाच माझा भाऊ, व वजीर, आणि कालीफ आहे. यासाठीं, ह्यालाच श्रेष्ठ मानून तुम्ही सर्वजण त्याच्या आज्ञेंत वागा. "

त्याची मानखंडना.

ह्या बोलण्यानें महमद केवळ उपहास्यतेस मात्र पात्र झाला. कारण, तत्क्षणींच, व केवळ त्याच्या तोंडावरच, त्याला लोक हंसले, आणि कित्येक तर अबूतालेबाला असें

म्हणाले कीं, आतां तर तुला तुझ्या मुलाच्या हुकुमांतच राहिलें पाहिजे.

त्याजवरील लोकांचे आरोप.

एकंदरीनें, महमदाचें वर्तन लोकांस अगदींच पसंत झालें नाहीं. त्यामुळें कित्येक त्याला गारोडी म्हणूं लागले. कांहींनीं त्याला मायावी ठरविलें. पुष्कळांनीं त्याची गप्पाड्यांतच गणना केली. आणि कांहींजणांनीं तर तो लबाड, ठक, दांभिक, कपटी, व बकव्रत आहे, असा त्याजवर आरोप आणिला. याप्रमाणें महमदाची हेळसांड होऊन, त्याची बरीच फटफजीती झाल्याबद्दलचे दाखले कुराणांत ठिकठिकाणीं आढळतात.[1]

कुराणांतील बनावट गोष्टी.

कित्येक लोकांनीं महमदाला भुतोल्याच ठरविलें होतें.[2] कित्येक असें म्हणत कीं, कुराणांतल्या गोष्टी म्हणजे स्वप्नांत पाहिलेली हकीकत होय. आणि म्हणूनच त्या केवळ बनावट आहेत.[3] कांहींजण असें बोलून दाखवीत असत कीं, "महमद हा ईश्वराचा दूत कसला ? तो आमच्या प्रमाणेंच आहार-

---

१ कुराण. भाग ६।२१।४३ पहा. महमदावर आणि कुराणावर लोकांचे जे जे नानाप्रकारचे आक्षेप आहेत, त्यांचा उल्लेख कुराणांतही सांपडतो,

( महमदाचें चरित्र. पान ३४ ).

२ कुराण. अ. ६.

३ कुराण. अ. २१.

विहारादि क्रिया करतो, आणि रस्त्यांतून हिंडतो फिरतो. तो केवळ माथेफिरेलेंच आहे. "

महमदाचा भविष्यवादीपणा, व त्याचें विसंगत वर्तन.

आपला हुकूम लोकांनीं मानावा, आणि आपण सांगू त्याप्रमाणें त्यांनीं वर्तावें एतदर्थ, महमद त्यांस असें सांगत असे कीं, आपण भविष्यवादी आहोंत. परंतु ह्याच संबंधानें लोक त्याला एक अतिशय बिकट प्रश्न करीत, व त्यामुळें तो अगदींच निरुत्तर होई. ते त्याला म्हणत कीं, अरे जर तूं ईश्वरप्रेषित दूत आहेस, तर तूं आम्हांला अमानुषिक कृत्यें कां करून दाखवीत नाहींस ? कारण, आजपर्यंत जेवढे ह्मणून भाविष्यवादी होऊन गेले आहेत, त्या सर्वांनीं अशींच अलौकिक कृत्यें करून दाखविलेलीं आहेत; व ती गोष्ट तूंही कबूल करतोस. शिवाय, तूं आह्मांला असेंही सांगतोस कीं, त्या सर्वांपेक्षां आपली कडी जास्त आहे. आणि जर तूं आपल्याच तोंडानें आपले गुण गातोस तर, तूं आम्हांला कांहीं तरी विशेष चमत्कार करून अवश्य दाखीव. तूं मेलेल्या इसमास जिवंत कर. मुक्यास बोलीव. बहिऱ्यास ऐकूं येई अशी शांति दे. एकादा रत्नखचित मंदिर आपल्या करता सज्य कर. आणि हें कुराणपुस्तक केवळ ईश्वराकडूनच प्राप्त झालें आहे असें जर तुझें ह्मणणें असेल तर, तसें तूं आमच्या

१ कुराण. अ. १५.

त्ययास आण. नाहींपेक्षां, तुझें सर्व बोलणें आम्ही तांड मानूं.

ह्या सर्व प्रश्नांनीं महमद् निरुत्तर झाला, व लोकांस कांहीं तरी उडवाउडवीचे जबाब देऊं लागला. शेवटीं आलेला प्रसंग टाळण्यासाठीं त्यानें एक निराळीच युक्ति काढिली, व तो लोकांस असें सांगू लागला कीं, माझें फक्त बोध करण्याचेंच काम आहे. अद्‌भुत चमत्कार करून दाखविण्याचें सामर्थ्य ईश्वराशिवाय इतरांचें नाहीं. शिवाय, कधीं कधीं तो असेंही सांगत असे कीं, पूर्वीच्या भविष्यवाद्यांनीं अद्‌भुत चमत्कार करून दाखविले असतांही, त्याजवर लोकांनीं भरंवसा ठेविला नाहीं. सबब, आतां पूर्वीप्रमाणें न करतां केवळ तरवारीच्या जोरावरच धर्मप्रसार करावा, अशी ईश्वराची अगदीं नूतन आज्ञा झाली आहे. याप्रमाणें नानाप्रकारांनीं त्यानें लोकांची समजूत करण्याचा विशेष यत्न केला.

त्याच्या निरसनार्थ त्यानें काढलेली युक्ति.

---

1 "And the terrific announcement attending the Moslem arms has been, The Koran, death, or tribute!"

( Life of Mahamed. Bombay Tract and Book Society. p. 59. ).

"And therefore, he had now sent him, a prophet of another order. *Commissioned to enforce belief by the power of the sword.*"

( Life of Mahamed. p. 37. ).

असो. याप्रमाणें, महमदाच्या मताचा दिवसानुदिवस एकसारखा प्रसारच होत चालला, व त्यामुळें खोरीश लोकांस विशेष दहशत पडली. आणि त्याचा प्रतिकार करण्याकरितां त्यांनीं असा कट केला कीं, हशीम लोकांशीं खोरीशपैकीं कोणी देखील लग्नव्यवहार करूं नये. परंतु इस्लामधर्माचें उन्मूलन होण्याच्या कामीं ह्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. इतकेंच नव्हे तर, त्यामुळें त्यांच्यांत आपापसांत तट मात्र पडले.

महमदाच्या मताचा प्रसार, व त्यामुळें खोरीश लोकांशीं वैमनस्य.

पुढें, कांहीं कालानें, अबुतालेब व महमदाची बायको कदिजा, हीं वारलीं; व त्यामुळें महमदाचा आसराच नाहींसा झाला. आणि तेणेंकरून खोरीश लोकांची त्याजवर एकदम गर्दी झाली.

त्यांनीं त्याजवर केलेली गर्दी.

इकडे मक्केतील लोकांची देखील चळवळ सुरूच असून, त्यांचा सुद्धां महमदावर डोळाच होता, त्यामुळें, मक्केतून त्याला जाऊं न देतां, त्याचा खरपूस समाचार घ्यावा, असें त्यांच्या मनांत फार होतें. परंतु मदीनाच्या लोकांची महमदाला उत्तम मदत असल्या कारणानें, मक्केतील लोकांचा हेतु सिद्धीस न जातां, महमदाचा उलट चांगला बचावच झाला. कारण, एके दिवशीं संधी पाहून तो

त्यामुळें महमदाचें पलायन.

मक्केतून थूर पर्वतावर पळून गेला, आणि तेथून शेवटीं मदीनास त्यानें पलायन केलें.

पलायनापासूनची शकमिति.

हें पलायन इसवी सन ६२२ सालीं झालें असून, त्याला आरबी भाषेंत हीजरा असें म्हणतात. आणि हीच शकमिती समजून, येथूनच आरबी लोक सर्व गोष्टींची कालगणना करितात.

महमदाचा अनुकूल काळ.

असो. मदीनेस आल्यावर महमदाला चोहोंकडून चांगली कुमक मिळाली, व त्याला सर्व गोष्टींची अनुकूलता प्राप्त झाली. ह्यामुळें त्याचा शह लागू पडून, त्याचा सहजींच दरारा बसला.

त्याची सत्ता, व त्याचें स्थित्यंतर.

याप्रमाणें, महमदाची सत्ता आपोआप स्थापन झाली. जो केवळ पळपुट्या होता, त्यानें लोकांवर आपला हळूं हळूं पगडा बसविला. जो फक्त रयतेच्याच आश्रयावर असे, तो आतां त्यांचा राजा बनला. जो दुसऱ्याकडे सेवक होता तो सेनाधिपति झाला. जो दुसऱ्यांकडे दाद मागण्याकरितां आपण स्वतः जाई, तो आतां जातीनेंच त्यांचा न्याय करूं लागला. आणि जो केवळ लोकांची मर्जी संभाळूनच त्यांस धर्मोपदेश करी, तोच त्यांचा धर्माधिकारी बनून, शेवटीं

त्यांचेंच सक्तीनें व तरवारीच्या जोरावर धर्मान्तरही करवूं लागला.

सत्तेमुळें आलेली उन्मदावस्था.

**महमदाला** सत्ता प्राप्त झाल्यावर तो कसा उन्मत्त झाला, व त्यानें नीतीचीं तत्वें कशीं एका बाजूला गुंडाळून ठेविलीं, हें **इस्लामधर्मशास्त्र जें कुराण,** तें अवलोकनांत आल्यावर कोणाच्याही सहजीं लक्षांत येण्यासारिखें आहे.

प्रथमची महमदाची धर्मसहनशीलता.

ज्यावेळीं **महमदाचें** लोकांवर बिलकुलच प्राबल्य नव्हतें, त्यावेळीं तो लोकांस असा उपदेश करी कीं, धर्माच्या बाबतींत कोणी कोणावरही अगदीं जुलूम[1] करूं नये, व कोणावर काडीमात्र देखील सत्ता चालवूं नये. कारण, लोकांस केवळ सन्मार्ग लावून द्यावा, इतकीच कायती आपली इतिकर्तव्यता आहे, असें तो म्हणे.

नंतरचा त्याचा धर्मविषयक बलात्कार.

आतां, **महमदानें** ह्या सात्विक वृत्तिचें जें अवलंबन केलें, तें केवळ प्रसंगास अनुसरून व गरजवंतास अक्कल नाहीं, या समजुतीनेंच केलें असल्याचें दिसतें.

1 " Let there be no violence in religion."
( Korán. ch. II. ).

2 " Wherefore warn thy people; for thou art a warner only: thou art not empowered to act with authorty over them."
( Koran, ch 38. )

आणि ही गोष्ट त्याच्या तदनंतरच्या आचरणावरून चांगलीच सिद्धवत ठरते. कारण, मक्केतून मदीनेस पळून गेल्यावर महंमदाला ह्या लोकांची जेव्हां एकदम कुमक मिळाली, तेव्हां त्याच्या डोळ्यावर लागलाच धूर आला, व त्यानें आपलें खरें स्वरूप ताबडतोब प्रकट केलें.

त्याचें कपट विद्या. पुढें, त्यानें आपल्या मोहक वाग्जालानें, लोकांवर चांगली छाप बसविली. इतकेंच नव्हें तर, त्यानें त्यांस अगदीं आपलेसेंच करून घेऊन, त्यांच्या भोळेपणाची योग्य संधी पाहिली, व शेवटीं त्यांच्या डोळ्यांतही माती टाकिली.

अशा प्रकारें, महंमदानें केवळ कपटविद्येनेंच सर्व लो-

तद्विषयक विद्वान लोकांचे अभिप्राय. कांस फसविल्याबद्दल त्याजवर पुष्कळांचे आक्षेप आहेत.

---

1 "Luther looked upon him as 'a devil and the first born child of Satan.' The gentle Melanchthon considered 'that Mahamad was inspired by Satan, because he does not explain what sin is, and showeth not the reason of human misery.' Maracei on the Papal side, was of opinion that Mahametanism and Lutherranism were not very dissimilar,—'witness the iconoclastic tendencis of both.' Spanheim and D' Herbetel were liberal in their epithets of 'wicked impostor, dastardly liar,' &c. with reference to him. By one earnest and learned writer

( पुढें चालू. )

ह्या वेळीं तो लोकांस बेधडक असें सांगूं लागला कीं, नास्तिक लोकांची खोड मोडण्यासाठीं त्यांच्याबरोबर युद्धच केलें पाहिजे. याकरितां, ह्या निशाचरांशीं लढाई करून, त्यांस सांपडतील तेथें तुडवा; त्यांस पकडून बांधा; आणि त्यांची बेलाशक कत्तल उडवा, असें तो सांगे.

धर्मान्तर करण्यासाठीं लोकांचा संहार.

**महमद** जितका क्रूर होता तितकाच लोभीही असे. केवळ धनहरणें करण्याच्या इच्छेनेंच

महमदाचें क्रौर्य.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

( Prideaux. Life of Mahamed p. p. 11—110 ), he is pronounced a wilful and intentional deceiver from first to last, who, for the purpose of raising himself to supreme power, invented the wicked imposture which he palmed with so much success on the world. * * * And generally that hypoorisy, the lust of power, and lechery were the sole and leading principles of his conduct. "

(Islam and its founder by Stobart. p. p. 63-64.)

१ इस्लाम धर्म न पाळणारे.

2 " War is enjoined you against the infidels "

( Koran. ch. II.). ( कुराण. भा. २. )

3 " Kill the idolater wherever you shall find them, and take them prisoners, and besiege them, and lay wait for them in every convenient place. "

( Koran. ch. IX. ). ( कुराण. भा. ९. )

4 Life of Mahamed. Tract and Book Society. p. p. 62—63.

त्यानें खोरीश लोकांवर अगदीं अन्यायानें हल्ला केला, आणि त्यांच्या काफल्याची एकदम दाणादाण करून मोडली. इतकेंच नव्हे तर, लढाईच्या सपाट्यांत, ज्या लोकांचीं *धडें समरांगणांत पडलीं होतीं, त्यांची देखील अन्तीं, त्यानें निस्सीम क्रूरतेनें व्यवस्था केली. कित्येकांचीं नुसतीं चामडींच काढलीं. कित्येकांस छिन्नभिन्न केलें. आणि राहिल्या साहिल्यांस कूपनडागांची वाट दाखविली.

ह्या नीच आणि अति क्रूर कृत्याबद्दल, कोणासही जितकें म्हणून वाईट वाटेल तितकें थोडेंच. परंतु महमदाला ह्याच गोष्टीचें मोठें कौतुक वाटून, तो आपले आपणास विशेष गौरवें करूं लागला. आणि लोकांत तो अशीही बढाई मारूं लागला कीं, हा सर्व प्रभाव ईश्वराचा असून, त्याचेंच आपणाला सर्व प्रकारें साहाय्य झालें आहे.

धनप्राप्त्यर्थ केवळ अन्यायानेंच दुसऱ्यावर चाल करून,

१ ही लढाई बेडर येथें झाली असून, त्यांत मिळालेल्या जयाबद्दल महमदाप्रमाणेंच त्याचे अनुयायी देखील सकौतुकाश्चर्य आनंद मानतात.

* "And ye slew not those who were slain at Beder yourselves, but God slew them. Neither didst thou, O Mahamed, cast the gravel unto their eyes, when thou didst seem to cast it; but God cast it."

( Koran. ch. VIII.)

२ (महमदचरित्र पा. ६४ ).

त्याचा धनलोभी-पणा.

**महमदानें** हा जो बीडरच्या लढाईंत त्या बिचाऱ्या **अबुसोफियन्**च्या निरपराधी काफल्याला बुचाडून त्याजवर जय मिळविला, त्याबद्दल **मुसलमान** लोकांस अभिमान वाटण्याचें यत्किंचित् देखील कारण नाहीं. इतकेंच नव्हे तर, त्यांस या कृत्याबद्दल उलट लाजच वाटून, त्यांनीं खालींही मान घातली पाहिजे. परंतु विशेष नवलाची गोष्ट ही कीं, सदरहू दरवडयाची मोहीम साधून आपली फत्ते झाल्याबद्दल, सर्व **इस्लाम** जनसमूह **महमदाचा** स्तुतिपाठच गातो. तेव्हां, ह्याला ह्मणावें तरी काय?

असो. ह्यावरून, **महमदाचें** शील, त्याची क्रूर[1] वृत्ती,

त्याचा दांभिक स्वभाव.

त्याचा दांभिकपणा[2], त्याचें खरें अन्तर्गत, त्याचा लोभी स्वभाव, आणि त्याचे मनोधर्म, इत्यादि चांगले व्यक्त होतील, यांत काडीमात्रही शंका नाहीं.

**महमदाचीं** कांहीं काहीं क्रूर कृत्यें तर इतकीं लाजिरवाणीं आणि घोरतम आहेत कीं, तीं ऐकून अंगावर

1 " When you encounter the unbelievers, strike off their heads until you have made a great slaughter among them ; and bind them in hands ; and either give them a free dismission afterwards, or exact ransom, until the war shall have laid down its arms."
( Koran. ch. XLVII. ).

2 (Elphinstone's History of India, vol. I. p. 501.)

केवळ कांटाच उभा राहतो. एके वेळीं असें झालें कीं, कित्येक ज्यू लोकांनीं खोरीश लोकांचा पक्ष धरल्यावरून, महमदाला त्या गोष्टीचें फारच वैषम्य वाटलें. त्यामुळें, त्यानें त्यांच्याशीं सामना केला, आणि त्या सर्वांस दातीं तृण धरावयास लाविलें.

तदनंतर, ह्या शरणागत ज्यू लोकांचें काय करावयाचें असा प्रश्न निघाल्यावर, त्या बिच्या-या ज्यूंनीं मदीनेच्या एका वृद्ध मुसलमान गृहस्थावर आपल्या जीविताची सर्व सोंप, केवळ विश्वासानेंच केली. परंतु त्या पाषाणहृदयास, त्या गरीब आणि भिऱ्या लोकांची तिळमात्रही दया न येतां, त्यानें त्या सर्वांची कत्तल उडवावी ह्मणून फर्माविलें. तेव्हां अर्थातच त्यांना एकदम वधस्थळीं नेलें, व तेथें हें अशा प्रकारचें अति निंद्य कृत्य अमलांत आणण्या-साठीं, जरूर ती तयारी ठेविली.

महमदाच्या कठोर हृदयाची कमाल.

नवनीत हृदय महमद बोवा, यांना तर बोलून चा-लूनच असल्या प्रसंगाची हौस! तेव्हां ते ह्या वेळीं, जणूं काय यमाजी भास्करांचीच आज्ञा अमलांत आ-णण्याकरितां, समक्ष सन्निध राहून, आपल्या अतृप्त नेत्रकमलांचें पारणें फेडीत होते, यांत नवल तें कोणतें?

शिव! शिव! मानवी ज्यूंचा शिरच्छेद व चुराडा करून, ज्याच्या हृदयाला घामही

सानवीं ज्यूंचा चुराडा.

आला नाहीं, किंवा ज्याला तिळप्राय सुद्धां वाईट वाटलें नाहीं, तो दयेचा केवळ पुतळाच समजावयाचा. व त्याच्या सौजन्याची आणि भुतानुकंपेची जेवढी ह्मणून तारीफ करावी तेवढी थोडीच.

पण क्रौर्याची पराकाष्ठा तर याच्याही पलीकडे अजून यावयाचीच आहे. खोरीशजातीच्या कांहीं लोकांनीं उंट वगैरे चोरल्या कारणांनीं, महमदानें त्यांच्या डोळ्यांच्या खांचा करवून, त्यांत तापलेल्या लोखंडाचा रस ओतविला. इतकेंच नव्हें तर, त्यानें त्यांचे हातपायही कांपवून, त्यांचे हालहाल करून त्यांस ठार मारविलें.

लोहरसानें नेत्रकमलांचें दहन.

शाबासरे महमदा! शाबास!! असल्या अतिनिंद्य दुष्कृतीनें तूं आपल्या अपकीर्तीचा गगनचुंबी यशोध्वज, इहलोकीं व परलोकीं देखील फडकाविलास!!! आणि इतकेंही करून, तूं आपल्या बाह्यात्कारी साधूपणानें हं हं ह्मणतां लोकांस फसवून, आपण भविष्यवादी आहों,

1 Life of Mahamad. Bombay Tract and Book Society. ( p. 80—81 ).

2 " Seven hundred Jews were dragged in chains to the marked place of the city; there they were compelled to descend alive into a grave that had been prepared for them: while the *self styled* apostle stood by and witnessed with an *inflexible eye* this most cruel execution."

( Life of Mahamad. Tract and Book Society p. 69. ).

असा तुझा तूंच जगापुढें टेंभा पाजळलास. तेव्हां तूं खरोखर धन्य आहेस!

याप्रमाणें, महमदाच्या दयेचा आणि त्याच्या धनलोभीपणाचा मामला, आपल्याला थोडक्यांतच कळून आला. सबब, प्रत्येक धर्माचें अत्युच्च भूषण, व हरएक साधु पुरुषाचें अलंकारस्थान, जें श्रेष्ठतम नितितत्व, त्याचें तरी अवलंबन आमच्या ह्या इस्लाम भविष्यवाद्यानें किति अंशानें केलें होतें, याचा आपण यथावकाश थोडासा विचार करूं.

महमदाचें निर्तीवतन.

महमदाच्या एकंदर चरित्रावरून, त्याला कटिशूळव्यथा व अनंगाची बाधा निस्सीम असल्याचें दिसतें. कारण त्याला जे जे प्रसंग आले, अथवा त्यानें ज्या ज्या लढाया जिंकल्या, त्यांत त्यानें मनसोक्त अबलाहरण केलें होतें. आणि त्यावरूनच इतकें चांगलें व्यक्त होतें कीं, साधु पुरुषाला, किंवा ईश्वराकडील म्हणून म्हणविणाऱ्या भविष्यवाद्याला, ज्या ज्या गोष्टींपासून अलिप्त राहिलें पाहिजे, त्या त्या सर्व गोष्टींत आमच्या महमदबोवाची विशेष आसक्ती होती. इतकेंच नव्हे तर, विषयोपभोगाच्या संबंधानें त्यानें मनमोक्त ताव मारला, आणि सर्व इंद्रियांस यथेच्छ चरूं दिलें. त्यामुळें, त्याजवरील त्याचें बंधन आपोआपच

शिथिल होऊन, त्याचा स्वतःच्या मनावरील दाब अगदींच नाहींसा होत गेला, व तो त्यांचा गुलाम बनला.

महमदाची पापवासना.

प्रत्येक लढाईतील जितक्या म्हणून स्त्रिया महंमदाच्या हस्तगत होत, त्यांपैकीं ज्या उत्तम[1] व सुरेख असत, त्यांस तो हरएक

---

1 " The women and childern were retained as captives. * * * The most beautiful of the captives Richana, he prevailed on, with difficulty to adopt his religion; and he kept her for *himself.* "

( Life of Mahamad. B. and T. Society. p. 69. ).

" Among the captives was Safizah, whom Mahamad, having given her liberty, married.

( Do. p. 89. ).

" In the same chapter ( 33 of Koran ) it is given to Mahamad as a peculiar privilege to have as many wives as he pleases.——It is hard to say which is the worst part of this business——the licentiousness, the hypocricy, the craft, or the blasphemy. "

( Do. p. 79. ),

यथेष्ट रीतीनें आपली कामशान्ति व्हावी म्हणून, व आपल्याला हवें त्या ठिकाणीं, आणि हवें त्या प्रकारें चरावयास सांपडावें या हेतूनें, महमदानें गुळाचाच गणपती करून गुळाचाच नैवेद्य दाखविला; आणि कुराणांत मनसोक्त वाचाळपणा व बडबड करून, आपली आचरणच एकदाची शास्त्रोक्तविधीनें सोडवणूक करून घेतली.

( पुढें चालू. )

तजवीजीनें आपल्या खानगी स्त्रिया करी, आणि बाकीचें बाजारबुणगें तो आपल्या हाताखालच्या लोकांस वाटून देई.

कधीं कधीं तो अडप झडपही बगलेंत मारी, आणि "कामातुराणां न भयं न लज्जा" या म्हणीप्रमाणें, प्रत्यक्ष आपल्या घरच्या बटकीबरोबर देखील रम-

त्याचें दासीवरील प्रेम.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

" He absued his claims as a prophet to screen the guilty excesses of his private life, and under the pretence of a special revelation, dispensing him from the laws imposed by his own religion, had the female sex abandoned without reserve to *his desires* ' O prophet, we have allowed thee thy wives unto whom thou hast given their dower, and also the slaves which thy right hand possesseth, of the booty which God hath granted thee and the daughters of thy uncle and the daughters of thy aunts, both on thy father's side and on thy mother's side, who have fled with thee from Mecca, and any other believing woman, if she give herself unto the prophet; in case the prophet desireth to take her to wife. This is a peculiar privilege granted unto thee, above the rest of the true belivers. "

( Do. p. 119 ).

१ या प्रसंगात, प्रत्यक्ष महामधाच्या बापजोगेच महात्म्याला हात धरून पकडलेलें आहे.

( पुढें चालू. )

माण होई. कारण, मरिआम् नांवाच्या सिध्धी दासीवर असलेलें त्याचें प्रेम सर्वांसच महशूर आहे.

महमदाला एकंदर नऊ बायका असून, त्यांपैकी कदिजा ही पहिली होय. हिच्याच पाशीं महमद प्रथम नोकर म्हणून राहिला होता; व पुढें तिच्यावरच त्यानें आपली छाप बसवून, अखेर तिनें नाइलाजास्तव त्याच्याशीं लग्नही लाविलें.

महमदाच्या नऊ बायका.

---

( मागील पृष्टावरून पुढें चालू ).

" It so happened, that on one occasion, when he ( Mahamed ) was so journing with Hafsa, the latter left her dweling to visit her father. Returning unexpectedly, she surprised the *prophet* with his favourite *slave* Mariyan, the mother of his son Ibrahim. The jealousy of Hafsa was vociferous. Mahamed endeavoured to pacify her, dreading lest her out cries should rouse his whole harm to rebellious but she was only to be appeased by an oath on his part never more to cohabit with Mariyam. on these terms she forgave the post and promised secrecy. "

( Do. p. p. 95—69. )

पुढें, त्यानें अयेश आणि सावदा यांच्याशीं शरीर-संबंध केला, आणि तदनंतर बंदीजनांत जी अतिचारुगात्री रोहिणी नामक स्त्री होती, तिलाही त्यानें आपली वामांगी बनविली. ही लावण्य स्त्री, सातशें ज्यूंची कत्तल उडविल्याचें जें मागें सांगितलें आहे, त्यांच्याच बंदिवान केलेल्या अबलाजनांपैकी, एक होय.

हेन्द नामक स्त्रीशीं त्याचें संधान.

परंतु, इतक्या स्त्रियांनीं देखील महमदाची तृप्ति म्हणून बिलकूल झालीच नाहीं. या साठीं, त्यानें हेन्द नामक स्त्रियेशीं मोठ्या युक्तीनें संधान बांधिलें. कारण हिचें लावण्य फारच मनोहर असून, ती अति सुरेख असल्याविषयीं तिची ख्याति होती. आणि त्यामुळेंच, अबुबेकर व ओमार यांनीं ती आपल्याला मिळण्याविषयीं बरीच लाळ घोटली; परंतु ती सर्व व्यर्थ गेली.

तेव्हां, अशा स्थितींत, महमदाच्या तोंडालाही अर्थातच विशेष पाणी सुटलें, आणि त्याच्यानें न राहवल्या कारणानें, तिच्याशीं त्यानें तद्विषयक बोलणें सुद्धां लाविलें, यांत कांहींच नवल नाहीं.

हेन्द ही मोठी चतुर स्त्री होती. त्या कारणानें ती तावडतोब समजली; आणि तिच्या मनांत महमदाच्या कावेबाजपणा आणि लपंडाव तेव्हांच येऊन चुकला. ती

त्याला ह्मणाली, "अरे, तूं बोलूनचालून ईश्वरप्रेषित भविष्यवादी! तेव्हां, तुला माझ्यापासून फायदा तो काय होणार? कारण, आतां माझें तारुण्यही नाहींसें झालें असून, मी फारच कांक्षेखोर स्वभावाची आहे. सबब हें तुला मुळींच पतकरणार नाहीं." त्यावेळीं, महमदानें तिची पायधरणी करून, तिला नानाप्रकारें समजाविलें, आणि शेवटीं तिला वश करूनही घेतलें.

महमदाच्या विषयवासनेची तृप्ति, व त्याची स्वतःच्या सुनेवरील पापवासना.

याप्रमाणें, दिवसानुदिवस, महमदाचा परस्त्रीविषयींचा अभिलाष फारच वाढत चालला. आणि पुढें पुढें तर तो इतका जोरावला कीं, त्यानें प्रत्यक्ष सुनेवरही पापवासना ठेवून, शेवटीं तिला[3] स्वतःच्या बायकोप्रमाणेंच वागविलें; आणि चोहोंकडून लोकांनीं छीः! थूः! केल्यावर, केवळ लोकापवाद मिटविण्याकरितांच, त्यानें तिच्याशीं शेवटीं लग्नही लाविलें.

आपल्या स्वतःच्या सुनेशीं महमदाचें लग्न.

ह्या लग्नामुळें, महमदाची लोकांनीं तर अगदींच टिरी उडवून दिली, आणि पुष्कळच फजिती केली. त्यामुळें त्यांचीं तोंडें

1 Life of Mahamed. p. p. 72—73.

२ कुराणांत, याबद्दलचा स्पष्ट उल्लेख दिसून येतो.

3 ( Life of Mahamed. Tract and Book Society. Bombay. p. 78. )

व त्यामुळें त्याची फजिती.

अजिबात बंद करण्याच्या हेतूनें, महमदानें कांहीं थोतांड व दंभ करून, मुलाच्या बायकोबरोबर बापानें लग्न लावण्याविषयीं ईश्वराज्ञाच आहे, अशा मतलबाची कुराणांत कित्येक अप्रयोजक आणि भलतींच वाक्यें घुसडून दिलीं, व तीं केवळ श्रुतिवचनेंच आहेत, असें तो त्यांस सांगत फिरला.

पुढें, हीच संधी साधून, आपल्या स्वतःला मात्र हव्या तितक्या बायका करण्याची विशेष मोकळीक आहे, अशा अर्थाचें वाक्य महमदानें कुराणांत मागाहून ठोकून दिलें.

महमदाची विषयवासना व इतर अडपसडप.

बरें, इतक्या नऊ बायका झाल्या तरी, महमदाची विषयवासनेच्या संबंधानें तृप्ति झाली काय? नाहीं. त्याच्या विषयवासनेची शान्ति अशी केव्हांही नव्हतीच. कारण, त्याच्या स्वतःच्या बायकांखेरीज त्याचें

---

१ कुराण, अध्याय तेहेतिसावा पहा.

* * * 'But when Zeid had determind the matter concerning her, and had resolved to divorce her, we joined her in marriage to thee, lest a crime should be charged on the true believers, in marrying the wives of their adopted sons, when they have determined the matter concerning them, and the command of God is to be performed."

( Life of Mahamed. p. p. 78—79 ).

दुसरें अडपझडप ह्मणून होतेंच. आणि हें खुद्द त्याच्या स्वतःच्या बायकोच्या नजरेसही आले होतें.

एके दिवशीं असें झालें कीं, हफसा नांवाची त्याची बायको आपल्या बापाला भेटण्याकरितां ह्मणून माहेरी गेली होती. तेव्हां ही संधी पाहून, महमदानें आपल्या मरियाम् नांवाच्या दासीला बोलावून आणिलें, आणि तो तिच्याशीं बेधडक रममाण झाला. इकडे हफसाही अवचितच माहेराहून आपल्या घरीं परतली, आणि पहाते तों, महमदबोवा परस्त्रीशीं, व त्यांतही विशेषतः आपल्याच दासीशीं, अनंगरंगांत अगदीं दंग झालेला आहे.

त्याची मरियाम् दासीशीं दोस्ती.

ही गोष्ट महमदाच्या स्वप्नीं देखील नव्हती. तेव्हां या पापकर्मांत, तो प्रत्यक्ष आपल्या बायकोच्या हातूनच एकाएकीं पकडला गेला, यांत कांहींच नवल नाहीं.

त्या दोस्तीची उघडकी.

असो. हफसानें ह्या भोंदूचें हें अघटीत कृत्य पाहिल्यावर, तिच्या अंगाचा तर तिळपापडच झाला. आणि ती नखशिखान्त लाल होऊन, मोठ्यानें आरडाओरडा करूं लागली, व आपण समक्ष पाहिलेली गोष्ट तिनें सर्वांस जाहीरही केली.

त्यामुळें झालेली फटफजिती.

ह्याबद्दल महमदास अर्थातच फार वाईट वाटलें, आणि

१ हिच्या पासूनच महमदाला इब्राम नांवाचा मुलगा झाला होता.

त्याचा विषाद. आपण आपल्यास ईश्वरप्रेषित दूत व भविष्यवादी ह्मणवीत असून, आपली साधुवृत्ति न राहतां, आपल्या हातून भलताच प्रमाद, व पापकर्म, आणि निंद्याचरण घडलें, याबद्दल त्याला अतोनात विषाद झाला.

पण करतो काय? अडकली गाय आणि फटके खायी.

त्यानें मागितलेली माफी. शेवटीं, हो ना करतां करतां, महमद अगदींच काकुळतीस आला, आणि तिच्या ओरडण्यामुळें, आपल्या जनानखान्यांतील दुसऱ्या सर्व स्त्रियांस ही गोष्ट कळली तर, त्या एकदम मोठाच आकान्त करतील व आपली विशेष फजिती होईल, अशी भीति वाटून, त्यानें अखेरीस हफसाची निव्वळ पायधरणीच केली.

त्यावेळीं, ही उत्तम मंत्री मनांत आणून, पुनश्च मरि- त्याची शपथ. यामृशीं अशी दोस्ती व स्नेह ठेवणार, नाहीं, असें हफसानें महमदापासून अभिवचन घेऊन तिनें ती गोष्ट गुप्त राखण्याचें कबूल केलें, आणि ह्या एकदांच्या नवराबायकोंचा तंटा मिटला.

परंतु कांहीं वेळानें, हफसानें ही सर्व गुह्य गोष्ट आपल्या इतर सवतींस अखेर सांगितलीच. त्यामुळें एकच कल्होळ होऊन, त्या सर्वांनीं महमदावर जारकर्माबद्दल एकदमच गिल्ला केला. ह्या गोष्टीचा महमदाला फार संताप आला, आणि त्याकारणानें त्यानें हफसास टाकून

दिली, व बाकीच्यांशीं सर्व प्रकारचा व्यवहार बंद करून, सुमारें एक महिना त्यानें एकान्तवासांत काढिला.

ती मोडण्याविषयीं त्याची युक्ति.

पुढें नेहेमींच्या क्रमाप्रमाणें, आपल्यावर ओढवलेलें अरिष्ट आणि दूषण यांचें परिमार्जन करण्याकरितां, व मरियाम्शिवाय त्याला चैनच पडत नसे सबब तिची भेट होण्यासाठीं, **महमदानें** एक युक्ति काढिली; आणि लोकांत अशी कंडी पिकविली कीं, मरियाम्च्या संबंधानें मी जी शपथ घेतली आहे, तिच्यापासून अतःपर मी मुक्त आहे; व तसा आपल्याला दृष्टान्तही झाला आहे. सबब ती शपथ मोडण्यास आतां कांहींएक प्रत्यवाय नाहीं.

त्यासंबंधीं त्याचा लपंडाव.

वाचकहो! कल्पना करा कीं, जो मनुष्य आपल्याला ईश्वराचा भविष्यवादी ह्मणून ह्मणवितो, त्यानेंच पंचशराच्या तीव्राघातानें विव्हल व्हावें; तसेंच इंद्रियांचा यत्किंचित्ही निग्रह न झाल्याकारणानें, आपल्या नऊ बायकांखेरीज, केवळ प्रबल कामशान्त्यर्थ, आणखीही **मरियाम्** नांवाचें त्यानें दुसरें एक नवीनच अंगवस्त्र ठेवावें; पुढें तिच्याशी एकान्तांत रममाण झाल्याकारणानें, त्याच्या स्वतःच्या बायकोनेंच त्याला अवचित् पकडावें; त्यानंतर ती बहुत क्रुद्ध झाल्यामुळें, **मरियामशीं** अतःपर संबंध ठेवणार नाहीं, असें तिला अभिवचन देऊन त्यानें शपथही करावी;

पुढें ह्याच शपथेच्या योगानें महमदाला मरियाम्‌चा वियोग होऊन, त्यानें सदरहू शपथेपासून मुक्त होण्याकरितां कांहीं बरी बाहणा व लपंडाव करावा; तदनंतर हा लपंडाव माजरा करण्यासाठीं, त्यानें प्रत्यक्ष ईश्वरालाच वाईट कामांत निष्कारण खर्ची घालून, त्या कलंकरहिताला निरंतरचा कालिमा लावण्याचा प्रयत्न करावा; तदनंतर मरियाम्‌संबंधीं वाहिलेली शपथ मोडून तिची त्यानें पुनश्च भेट घ्यावी; आणि तिच्याबरोबर पूर्ववत् संबंध ठेवण्याविषयीं ईश्वराचीच आपल्याला आज्ञा असून, तसा आपल्याला दृष्टान्तही झाला आहे, म्हणून त्यानेंच सर्व लोकांत सांगत फिरावें; म्हणजे, आपल्या विषयवासनेची मनसोक्त तृप्ति होण्याकरितां, भोळ्या, मूढ, आणि अज्ञान लोकांच्या डोळ्यांत बेधडक धूळ घालून, त्यांस निव्वळ कपटानें फसविणेंच होय.

त्याच्या लपंडावावरील लोकांचा विश्वास बसण्याचें कारण.

आतां, कोणी असा प्रश्न करील कीं, अहो, "लोकांमागे ब्रह्मज्ञान, आणि आपण कोरडे पाषाण," या मालिकेंतीलच महमद असतांही, त्याच्या बोलण्यावर लोकांनीं काय ह्मणून विश्वास ठेवावा? अथवा त्याच्या फसविण्यानें त्यांनीं काय ह्मणून फसावें? याचें उत्तर घावयास फारसें

१ महमदाचें चरित्र. पान १२०-१२१ पहा.

लोकांची रानटी अवस्था, व अज्ञान.

दूर जावयास नलगे. कारण एक त तो ज्या देशांत जन्मला होता तें अगदींच रानटी असून, ज्ञान, उन्नतावस्था, व सुधारण ह्मणजे काय, हें त्या वेळच्या लोकांच्या स्वप्नीं देखील नव्हतें. किंवा ह्यांचा त्यांस काडीमात्र गंधही नव्हता. तेव्हां अर्थात्‌च, "वासरांत लंगडी गाय" या ह्मणीप्रमाणें, त्याचें सर्व बोलणें लोकांनीं खरें मानावें, आणि "बाबा वाक्यं प्रमाणं" यास अनुसरून त्यांनीं त्याचा मान ठेवावा, यांत नवल तें कोणते ? शिवाय, हे लोक अडाणीच अस-ल्यामुळें, महमदानें जें जें म्हणून लोकांच्या घशांत कोंबलें, तें तें त्यांनीं सुखेनैव गट्ट केलें. त्यानें जें जें त्यांस सांगितलें, तें तें त्यानीं निर्वेध ऐकिलें. आणि त्यानें जें जें पापाचरण केलें, त्या सर्वांकडे त्यांनीं निव्वळ काना-डोळाच केला.

लोकांवर जुलूम,

दुसरें असें कीं, महमदाचा सर्वच कारभार केवळ तरवारीच्या जोरावरच अवलंबून अ-सल्याकारणानें, अनाश्रित लोक फक्त जुलमानें व भीतीनें त्रस्त होऊन, अगदीं निरुपायास्तव त्याच्या कळपांत शिरले.[1]

---

1 "His ( Mahamed's ) warriors were sent out in numerous excursions in all directions ; and by imposing on the *conquered* the choice of *conversion* or *tribute*, they spread both his empire and his religion rapidly through out Arabia."

( Life of Mahamed. p. 80. )

कित्येक ज्यू आणि खोरीश लोकांचीं मतें तर प्रथमपासूनच महमदाविरुद्ध होतीं. परंतु त्याचें स्वतःचें शौर्य, त्याचें प्रसंगावधान, आणि त्याचें बल, यांपुढें कोणाचें कांहीं देखील तिळमात्रही चाललें नाहीं. इतकेंच नव्हे तर, त्याच्या हयातींत त्याच्या मतांचा एकसारखा प्रसारच होऊन, त्याचा कळप दिवसानुदिवस एकसारखा वाढतच चालला.

व कांहीं अंशीं महमदाच्या अंगचे गुण

यांप्रमाणें, आपल्याधर्माची चलती आणि वाढतीकळा पाहिल्यावर, महमद हा इ० स० ६३२ सालीं, ह्मणजे आपल्या वयाच्या त्रेसष्टाव्या वर्षी, मरण पावला.

महमदाचा अन्त.

असो. सदरहू हकीकतीवरून, महमदाचा पराक्रम, त्याचें विलक्षण धैर्य, त्याचे एकंदर गुणदोष, त्यानें प्रतिष्ठापित केलेल्या धर्माचें मूलतत्त्व, व त्यानें अवलंबन केलेला दूषणार्ह नीतिमार्ग, इत्यादिकांचें सहजीं दिग्दर्शन होण्यासारिखें आहे. तथापि, वाचकांच्या सोईसाठीं येथें त्यांतील थोडासा गोषवारा देतों.

महमदाचे गुणावगुण.

त्यानें ज्या धर्माची संस्थापना केली, तो इतका कांहीं विलक्षण प्रबळ झाला कीं, मुसलमानी राज्याचा चिरकाळ पाया राहण्यास तो केवळ आधारस्तंभच बनला. आणि त्यामुळें, इस्लाम सा-

महमदानें स्थापिलेल्या धर्माचा प्रबळ पाया व त्याचा प्रसार.

म्राज्याचा वृक्ष थोडक्याच काळांत एवढा प्रचंड झाला कीं, त्याच्या शाखा चोहोंकडे पसरल्या. इतकेंच नव्हें तर, त्याच्या पारंब्यांनीं आशिया, यूरोप, आणि .आफ्रिका, या तिन्ही खंडांत आक्रमण करून, आपलीं मुळें दूरवर विसृत केलीं, आणि त्यांस कायमची दृढताही आणिली.

आल्पारंभानें महत्कार्यसिद्धि.

आपल्याजवळ कांहीं एक सामग्री किंवा साधन नसतां, केवळ एकादा यःकश्चित् मनुष्य देखील, केवळ आपल्याच हिमतीवर कशा महत्वास चढतो, आणि किती अल्पकाळांत आपली सर्वत्र छाप बसवितो, याचें मूर्तिमंत व प्रत्यक्ष उदाहरण महमदाच्या चरित्रांत तेव्हांच दिसून येण्यासारिखें आहे. असें विसृत राज्य व असा अलौकिक पराक्रम प्राचीनकाळीं फक्त आर्यहिंदूंचाच दृष्टिगोचर होतो. किंवा तदनंतर रोमन् लोकांचा अवलोकनांत येतो. अथवा सांप्रतकाळीं इंग्रज लोकांचा दृष्टीस पडतो.

त्यागोष्टील कालाची व देशाची अनुकूलता.

असो. धर्माच्या मिषानें हें जें महत्कार्य महमदानें मोठ्या साहसानें आरंभिलें, आणि तें आपल्याच हयातींत बहुतेक तडीसही नेलें, त्याबद्दल त्याची जेवढी म्हणून स्तुति करावी तेवढी थोडीच. तथापि, इतकी गोष्ट अगदीं निर्विवादपणें सिद्ध आहे कीं, त्याला कालाची अनुकूलता खचितूच होती. इतकेंच नव्हें तर, त्याचें स्वतःचें

आचरण बिलकूल नांवाजण्यासारिखें नसून, किंबहुना तें फारच अमंगळ असूनही, त्याला यश आलें, आणि त्याचें काम फत्तें झालें, हें पाहून महदाश्चर्य वाटतें; व म्हणूनच त्याला दैवही अनुकूल होतें, असें जरूर म्हणावें लागतें.

त्याचे मोहक गुण, व त्यामुळें त्याला झालेलें मित्रांचें सहाय्य.

महमद हा स्वतः देखणा असून, त्याचें बोलणेंचालणें, राहण्याची ढब, आणि रीतरिवाज, हीं विशेषेंकरून फारच मोहक होतीं. त्यामुळें त्याच्याशीं ज्यांचा ज्यांचा म्हणून स्नेह झाला, ते ते शेवटपर्यंत अगदीं इमानानें वर्तले, व त्यांनीं त्याच्याशीं कोणत्याही प्रकारें निमकहरामपणा केला नाहीं. आणि हेंच त्याच्या कार्यसिद्धीचें मूळकारण होय.

आतां, महमदीधर्माचीं मूलतत्त्वें कोणतीं आहेत, याविषयींचा विचार करूं. कोणत्याही धर्माचीं मूलतत्त्वें ज्या त्या धर्मांतल्या ग्रंथांत दृष्टीस पडतात. आणि त्याप्रमाणें मुसलमानी धर्माचीं मूलतत्त्वें देखील तद्विषयक धर्मग्रंथांतच उपलब्ध व्हावींत, हें अगदीं साहजीक आहे.

इस्लामधर्मग्रंथ, व त्याची पवित्रता.

मुसलमानांचा मुख्य व महत्वाचा धर्मग्रंथ म्हटला म्हणजे कुराण होय. ह्याचे लहान मोठे ११४ अध्याय असून, त्या प्रत्येकास सूर अशी संज्ञा आहे. ह्यांत धर्मसंबंधीं म्हणजे पारमार्थिक, आणि ऐहिक अथवा व्यावहारिक विषयांचा विचार

केलेला आहे. त्यामुळें, दोन्ही दृष्टींनीं ह्या धर्म पुस्तकाचा विशेष उपयोग आहे, हें जास्त सांगावयास नको. हा धर्मग्रंथ **मुसलमान** लोक इतका पवित्र मानतात कीं, स्नानादिविधि केल्याशिवाय, किंवा निदान हातपाय तरी धुतल्याशिवाय, ते त्याला कधीं देखील सहसा स्पर्श करीत नाहींत.

महमदाची बतावणी.

**महमद** हा नेहेमीं अशी बतावणी करी, व तो लोकांसही हमेश असें सांगे कीं, **कुराण** हें स्वर्गांत लिहिलेलें असून, तें **गेब्रियल** नामक देवदूतानें ह्या भूतलावर आणिलें. परंतु, तें समग्र वाचलें ह्मणजे नीतिवर्तनाच्या संबंधानें जें वैपरीत्य, जी असंगति, व जो विसंवादीपणा त्यांत दिसून येतो, त्यावरून ते खचित् **ईश्वरप्रणित** नाहीं, असें कोणीही कबूल करील.

कुराणांतल्या चुटक्यांचा वृत्तान्त.

असो. ह्यांतील कांहीं कांहीं चुटके शिष्यवर्गांच्या स्मरणांत राहिल्यापैकीं असून, कांहीं ताडपत्रावर, व बाकीचे चर्मपटावर लिहिलेले होते. यांपैकीं थोडेसे लेख **महमदाच्या** बायकोच्या हस्तगत असत. आणि तेच **महमदाच्या** पश्चात् **अबुबेकरनें** व्यवस्थित रीतीनें लावून, पुस्तक रूपानें जगापुढें आणिले. **महमदानंतर अबुबेकर** हा पहिला **कालिफ** झाला.

**तदनंतर कांहीं वर्षांनीं ओथमन्** हा तिसरा **कालिफ**

नवीन कुराण.

झाला, व त्यानें धर्मसंबंधी जेवढीं म्हणून हस्तलिखितें उपलब्ध झालीं तेवढीं मिळवून, तीं सर्व जाळून टाकिलीं, आणि त्या ऐवजी एक नवीनच पुस्तक बाहेर काढिलें. हेंच सांप्रतचें कुराण होय. ह्याच्या प्रत्येक अध्यायाला भिन्न भिन्न नांवें दिली आहेत. व तीं धेनु, इम्रामकुटुंब, अबला, नक्षत्र, फलक, दुर्ग, अपहार, रजनीयात्रा, प्रवासप्रसंग, कवि, निशाकर, प्रभा, इत्यादि भेदांनीं सुप्रसिद्ध आहेत.

प्रत्येक अध्यायावर, हें कुराण ज्या ठिकाणीं सांगितलें, म्हणजे ज्या ठिकाणीं कुराणांतलीं वाक्यें महम्मदाच्या तोंडाबाहेर निघालीं, अथवा इस्लाम समजुतीप्रमाणें मक्का, मदीना, वगैरे, ज्या ज्या स्थळीं त्याला ईश्वरप्रेरणा झाली, त्या त्या स्थळांचा नामनिर्देश मथाळ्यावर केला असून, त्या सर्वांचा प्रारंभ बिस्मिल्ला शब्दानें झाला आहे. मात्र, नववा अध्यायच कायतो ह्याला अपवाद असून, त्याचा प्रारंभ बिस्मिल्लानें होत नाहीं.

कुराणाचें भाषासौन्दर्य.

समग्र कुराण गद्यांत लिहिलेलें असून, तें सर्व अस्सल आरबी भाषेंतच आहे. याचें भाषासौंदर्य, पदलालित्य, वाक्प्रचरणी, आणि क्वचित् ठिकाणीं विचारगांभीर्य, हीं नावाजण्यासारखीं असल्याविषयीं, अनेक भाषाको-

त्यांतील ईश्वरस्फूर्ति.

विदांचें मत आहे. आणि ह्याच कारणावरून **मुसलमान** लोक असें प्रतिपादन करितात कीं, **कुराण** हें मानवी कृति नसून तें ईश्वरप्रणित आहे. व ते आपल्या म्हणण्याच्या पुष्टिकरणार्थ अशी बतावणी करितात कीं, **महमद** हा बोलून चालूनच जर अशिक्षित मनुष्य होता, तर त्याच्या हांतून अशी उदार कृति होण्याचा संभवच नव्हता.

तद्विषयक निरसन. परंतु थोडासा विचार केला ह्मणजे, ह्या शंकेचें निरसन तेव्हांच होण्यासारिखें आहे. प्रथमतः आपल्याला ही एक गोष्ट मनांत आणिली पाहिजे कीं, जर **कुराण** ईश्वरप्रणित असतें, तर त्यांत ठिकठिकाणीं जे अनुदात्त विचार दृष्टीस पडतात, अथवा कित्येक स्थळीं जीं अनीतिप्रद वाक्यें दृष्टिगोचर होतात, तशीं केव्हांही सांपडतींना. कारण, ईश्वरप्रणित ग्रंथांत नीति, आत्मोत्कर्ष, उदात्तविचार, सदाचरण, सुमार्गाचें वळण, याशिवाय अन्य गोष्टीला थाराच मिळावयाचा नाहीं; किंवा त्यांत त्यांचा शिरकाव देखील व्हावयाचा नाहीं.

आणि ज्यापक्षीं, **कुराणांत** निस्सीम क्रौर्य,[१] अन्

---

१ कुराण, अ. ९।४७ पहा.

"Kill the idolaters wherever you shall find them, and take them prisoners, and besiege them, and lay wait for them in every convenient place."
"Strike off their heads (of unbelivers) until you

( पुढें चालू. )

कुराणांतील नीतितत्वें, व त्यावरून कुराणाची मानवी कृति.

न्वित जुलूम, आणि अतिनिंद्य दुराचार झाला - असल्याचें दृष्टीस पडतें, व तोही खुद्द महमदानेंच केला असल्याविषयीं ज्यापक्षीं अनुभवास येतें, त्या-

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

have made a great slaughter among them; and bind them in hands."

"The Koran, death, or tribute!"

( Koran. ch. 9—47. ).

"The dead bodies of the Koreesh were stripped ( in the battle of Beder ), and with a savage barbarity cast into a well; two of the most obnoxious prisoners were punished with death."

( Life of Mahamed. Tract and Book Society. p. p. 63—58—59 ).

१ मुसलमानी धर्माची जे जे म्हणून निन्दा करितील, अथवा त्या धर्माचा जे कोणी अंगिकार करणार नाहींत, ते सर्व नास्तिक किंवा पाषंड समजून त्यांजबरोबर युद्ध करण्याविषयीं कुराणांत स्पष्ट आज्ञा आहे. यावरून इस्लामधर्मांचा जुलूम सहजीं ध्यानांत येण्यासारिखा आहे.

"War is enjoined you against the infidels."
"Fight therefore against the friends of Satan."

( Koran ch. II. IV. ).

२ आपल्या प्रत्यक्ष मुनेयगोचर देखील दुराचार करण्याचें महमदानें वर्जिलें नाहीं. त्यामुळें लोकांत त्याच्याविरुद्ध फारच टीका होऊं लागली. कारण, सून म्हणजे केवळ पोटच्या कन्येसमान असूनही तिच्याशीं निव्वळ स्त्रीप्रमाणेंच त्यानें सर्वप्रकारें व्यवहार ठेविला.

( पुढें चालू. )

पक्षीं तें कुराण ईश्वरप्रणित खचितच नाहीं, ही गोष्ट निर्विवादपणें सिद्ध होते.

महमदाचें दौर्बल्य व त्याची सहिष्णुता.

आपला कमकुवतपणा जावत्कालपर्यंत महमदाला पूर्णपणें भासत होता, तावत्कालपर्यंत त्यानें जणूं काय बकध्यान करून बाह्यात्कारी बरीच धर्मसहिष्णुता दाखविली. आणि ही गोष्ट प्रत्यक्ष कुराणावरूनच चांगली व्यक्त होते. कारण, मक्केंत असतांना महमदानें कुराणाचे जेवढे ह्मणून भाग प्रसिद्ध केले, तेवढ्यांतच विशेषेंकरून धर्मसहिष्णुतेचें

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू ).

म्मब, याबद्दल त्याला लोकांनीं अतिशय दूषण दिलें. आणि ह्याच कलंकाचें निरसन व्हावें एतदर्थ, त्यानें एक नवीनच वाक्य कुराणांत घुसडून दिलें, आणि तो लोकांत असेंही सांगत सुटला कीं, या कामीं मजला ईश्वरानेंच अशी आज्ञा केली आहे कीं, झीद हा जरी तुझा दत्तकपुत्र आहे तरी हल्लीं त्यानें आपल्या बायकोचा घटस्फोटच केला आहे; सबब आतां तूं तिच्याशीं लग्न लाव व यथेष्ट विहार कर. ही आकाशवाणी, हें लग्न, व हा घटस्फोटाचा प्रकार, इत्यादि सर्व महमदाचेंच आपमतलबाचें कल्पनाचातुर्य, आणि ही सर्व त्याचीच कूटरचना होय. आपल्या बायकोबरोबर प्रत्यक्ष आपला बाप अनंगरंगांत दंग होऊन अगदीं कंदी झाला आहे, असें जेव्हां झैदजिबाला वाटलें, तेव्हां वडिलांच्या कामशान्त्यर्थ त्यानें आपल्या पत्नीवरचा हक्क सोडला असल्याचें दिसतें. नाहींपेक्षां, आपल्या प्रत्यक्ष बायकोचा आपण होऊनच त्याग तो कोण करणार ! उघडच, तो कोणी देखील करणार नाहीं.

अमूल्य तत्त्व जागरूक दिसतें. परंतु तो मदीनेस गेल्या-वर जेव्हां त्याला भरपूर पाठबळ मिळालें, तेव्हां त्याचा धीर चेपत गेला, आणि त्यानंतरच त्यानें आपलें खरें स्वरूप एकदम प्रकट केलें.

त्याचें बल आणि समशेरशाही.

ह्या वेळीं, महमदानें आपला मोरचा अजिबात फिर-विला, आणि सर्व लोकांस तो अगदीं जाहीरपणें असें सांगूं लागला कीं, तरवारीच्या जोरावरच इस्लामधर्माची इमारत असून, केवळ समशेरशाहीनेंच ह्या धर्माचें संगोपन व त्याची अभिवृद्धि केली पाहिजे. कारण, खड्ग हीच स्वर्गारोह-णाची किल्ली होय, असें तो प्रतिपादन करी. इतकेंच नव्हे तर धर्मकृत्यांत एक रक्ताचा बिंदु जितका कार्यभाग करील, तितका कार्यभाग शमदमादि हजार खटपटींनीं देखील होणार नाहीं, असें तो म्हणे.[1] वाहवा ! आहेत कनी आमचे राजश्री ! केवळ दयेचा सोज्ज्वळ पुतळाच ! !

शाब्बास रे महमदा ! शाबास तुझी ! अशा प्रकारचीं धर्मांचीं किंवा नीतीचीं तत्त्वें कुराणाशिवाय अन्यत्र कोठें[2] ही आढळून येणार नाहींत. सबब, तूं धन्य आहेस ! !

असो. याप्रमाणें, कोणत्याही सूक्त वा असूक्त अडच-

---

१ महमद चरित्र, पान १३५.

२ कुराण पहा. त्यांत, टिकठिकाणीं अनीतीचें माहेरघर, व मूर्तिमंत क्रूरता दृष्टिगोचर होते.

त्याचीं प्रसंग मारून नेण्याची युक्ति.

णीच्या प्रसंगीं, आपल्याला पार पडतां यावें एतदर्थ, **महमदानें** नानातऱ्हेचे भले अथवा बुरे उपाय योजिले. आणि त्याच हेतूनें **ईश्वराज्ञा** म्हणून तो पाहिजेल तें बडबडला, व हवें तसें बोलला. इतकेंच नव्हें तर, कित्येक प्रसंगीं केवळ मूढजनांस फसविण्याकारितांच, त्यानें **ईश्वराज्ञेचें** आमिष पुढें लावून, त्याच्या आड आपण अगदीं कपट भावानेंच लपला.

आतां, **इस्लामधर्माचीं** मूलतत्वें, व त्याचें **खिस्ति-धर्माशीं** साम्य, यांविषयींचा थोडासा विचार करूं.

**इस्लामधर्माचा** मूळ हेतु म्हटला म्हणजे अनेक धर्मांचें अथवा पंथांचें उन्मूलन, मूर्तिपूजेचा उच्छेद, आणि एकेश्वरी मताची संस्थापना, इत्यादि होय.

इस्लामधर्माचा प्रसार व त्याचा हेतु.

**महमदाच्या** वेळीं अनेक धर्मपंथ प्रचारांत होते. व खिस्तिधर्माचाही बराच फैलाव झाला होता. तरी, त्यांत असंख्य मतभेद असत. ज्यू लोकांचीं मतें तर या सर्वांहून अगदीं भिन्न होतीं, आणि मूर्तिपूजा व अनेक देवतांचें आवाहन, वगैरे जारीनें अमलांत होतें. तेव्हां हीं सर्व मोडून टाकून, त्यांऐवजीं एक नवीनच धर्मपंथाची स्थापना करावी, इतकाच **महमदाचा** हेतु होता. परंतु त्यांत ही महत्वाकांक्षा,

---

1 Elphinstone's History of India. vol. I. p. 501.

कीर्तिस्पृहा, उच्चपदवांछा, धनलोभ, आणि ऐश्वर्यतृष्णा, यांचा अंतर्भाव पूर्णपणें वास करीत होता, असें त्याच्या कृतीवरून व आचरणावरून चांगलें व्यक्त होतें.

इस्लामधर्माचें ख्रिस्तधर्मग्रंथांशीं साम्य.

असो. आतां फक्त इस्लाम धर्माचें ख्रिस्तधर्माशीं, अथवा विशेष उक्त ह्मटलें तर ख्रिस्तधर्मग्रंथांशीं, कितपत व कशा प्रकारचें साम्य आहे, आणि ह्या धर्माचें प्रतिबिंब त्यांत किती अंशानें दृष्टिगोचर होत आहे, याविषयीं दोन शब्द सांगून, हें महमदीय पुराण एकदाचें आटपतों.

साम्याचा प्रकार, व त्याचीं उदाहरणें.

कुराणांतील नानाप्रकारच्या आख्यायिका, सृष्टचुत्पत्तीपासूनचा पौराणिक इतिहास, त्यांतील बहुतेक विचार, आणि नानाविध कल्पना, इत्यादि ख्रिस्तधर्माशीं बऱ्याच साम्य पावतात. कित्येक ठिकाणीं हें साम्य तर हुबेहूब असून, कांहीं ठिकाणीं तें केवळ बहुतेक अंशानेंच मिळतें. सबब फक्त दिग्दर्शन होण्याकरितांच येथें कांहीं उदाहरणें मासल्यासाठीं देतों.

सृष्टवस्तूंच्या नामधेयांच्या संबंधानें बायबलांतील आणि कुराणांतील कथानक बहुतेक सारखेंच असल्याचें भासमान होतें.

१ जुना करार. मोझेसचें पहिलें पुस्तक. अध्याय २, गीत २० वें.

२ सेल्सकृत कुराण. अ. २ पान ४ थें.

२ ज्ञानवृक्षाचें फळ न चाखण्याविषयींची ईश्वराज्ञा सदरहू दोन्ही धर्मपुस्तकांत एकसारखीच असल्याचें चांगलें व्यक्त होतें.

३ पिशाचनाथानें ( सैतानानें ) आदाम आणि ईव्हला आपल्या मोहजालांत गुंतवून, त्यांजला अजिबात फसविल्याबद्दलचें कथानक, या दोन्ही धर्म पुस्तकांत एक सारखेंच आहे.

४ तसेंच कुमारिका मेरीच्या पोटीं, पुरुषसंगाशिवायच ख्रिस्त जन्मला असल्याविषयींची आख्यायिका देखील, बायबलांत आणि कुराणांत अगदीं हुबेहूब मिळती असल्याचें दिसतें.

५ पृथ्वीवरील प्रजा दुराचारी झाल्याकारणानें, ईश्वराला फार क्रोध येऊन त्यानें जलप्रलय करण्याची योजना केली, व ह्या वेळीं त्यानें फक्त नोहाला मात्र वाचविलें. परंतु हा कथाभाग ज्याप्रमाणें बायबलांत आहे त्याप्रमाणेंच कुराणांतही असून, ह्या कथानकांच्या आधारानेंच कुराणांतल्या कित्येक गोष्टी रचल्या आहेत.

---

१ जुना करार. अ. ३, गी. १, कुराण. अ. २ पान ५.

२ बायबल. जुना करार. पुस्तक पहिलें. अ. ३, कुराण. अ. २ पान, ५.

३ बायबल. नवा करार. अ. १, १८. कुराण. अ. ३, पान ३७.

४ बायबल. जुना करार. अध्याय ६।७।८।९. कुराण अध्याय ७१, पान ४२४।४२५.

याप्रमाणें प्रत्यक्ष किंवा पर्यायाचीं साम्यें अनेक दाखवितां येतील. परंतु स्थलसंकोचास्तव तसें करतां येत नाहीं. आतां, पूर्वीं सांगितल्याप्रमाणें, कित्येक ठिकाणीं हीं साम्यें अगदीं हुबेहूब भासमान होतात; आणि कांहीं जागीं तीं केवळ अप्रत्यक्ष रीतीनें, अथवा पर्यायानें मात्र नजरेस येतात. कारण, काल, देश, वर्तमान, आनुषंगिक गोष्टी, ऐतिहासिक परंपरा, आपलीं स्वतःचीं मतें, आपले सिद्धीस नेण्याचे हेतु, आणि आपला कार्यभाग, इत्यादि सर्व गोष्टींवर नजर देऊनच, **महमदानें बायबलांतल्या** कित्येक आख्यायिका आपल्या **इस्लाम** धर्मपुस्तकांत, म्हणजे **कुराणांत**, कायम ठेविल्या; कित्येकांत त्यानें थोडेंबहुत कमीजास्ती केलें; आणि कित्येकांस तर त्यानें अजिबात फांटाच दिला. तथापि, इतकी गोष्ट अगदीं निर्विवादपणें सिद्ध आहे कीं, **कुराण** हें **बायबलाच्या** मूळग्रंथांतील एक छोटेखानी नकल, किंवा तात्पर्यार्थच

---

1 Life of Mahamed. Tract and Book Society p. p. 140 and 147.

2 " Thus, the religion of the Jews is founded upon that of the Egyptians; Christianity is the result of Judaism ; and from these two last, has naturally sprung Mahamedanism. "

( Buckle's History of civilization in England. p. 21. ).

आहे. असें म्हणण्यास विशेष बाध येईल असें वाटत नाहीं.

मुसलमानांची लोकसंख्या.

असो. इस्लामधर्माची व्याप्ति बरीच असून, यूरोप, आशिया, आणि आफ्रिका, या तिन्ही खंडांत त्या धर्माचा प्रसार आहे. पृथ्वीवरील या धर्मांतील लोकांची एकंदर संख्या सरासरीनें साडेपंधरा कोट असून, भरतखंडांतील मुसलमानांची लोकसंख्या सुमारें पांच कोटी होईल, असा अजमास आहे.



1 Rhys Davids on Buddhism. p. 6.

( भारतीयसाम्राज्य. उत्तरार्ध. पुस्तक सातवें. भाग ४१ वा. पान १४४ पहा. )

# भाग ४४ वा.

## इतर धर्म व पंथ.

याप्रमाणें, ह्या विस्तीर्ण हिंदुस्थान देशांतल्या मुख्य मुख्य सर्व धर्मांचें यथावकाश विवेचन केलें. आतां, आमच्या देशांत एकंदर किती धर्म प्रचारांत आहेत, व त्यांपैकीं कितींचें विवेचन केलें, आणि कितींचा विचार करणें राहिला आहे, हें पाहूं.

भरतखंडांतील इतर धर्म व पंथ.

इ० स० १८९१ सालीं, हिंदुस्थानची जी मोठी खानेसुमारी झाली, तींत मानवी स्थितीच्या आहवालासंबंधीं बहुतेक सर्व माहिती दिलेली आहे. त्यावरून, खालीं लिहिल्याप्रमाणें या देशांतले एकंदर धर्म व पंथ असल्याचें दिसून येतें.

---

जे. ए. बेन्स. सेन्सस् कमिशनर, यांचा एतद्विषयक सन १८९३ सालीं छापलेला आहवाल ( रिपोर्ट ) पहावा. ( पान ५ आणि १५७ ते १८२ ).

( Census of India. )

(General Report by J. A. Baines. F. S. S. I. c. s, Census Commissioner for India. 1893.)

**१ अनार्यधर्म. २ ब्राह्मणधर्म. ३ बौद्धधर्म. ४ नूतनब्राह्मणधर्म**, किंवा हिंदुधर्म. **५नूतनबौद्धधर्म. ६शीकधर्म. ७ जैनधर्म. ८ ब्राह्मसमाजपंथ. ९ नूतनआर्यपंथ. १० झरथुष्ट्रधर्म. ११ हीब्र्यूधर्म. १२ इस्लामधर्म. १३ ख्रिस्तिधर्म.** आणि १४ लहानसान पोटभेद.

अनार्यधर्म.

**अनार्यधर्म** म्हणजे जो धर्म **आर्य** हिंदूंचा नव्हे, तो होय. हा धर्म जंगली जातीचे सर्व लोक पाळतात. कारण, ह्यांत बहुतेक **भुताखेतांचाच** पूजाविधि असून, रानटी स्थितींतल्या वनचरांचा त्यांजवरच भरपूर विश्वास असल्यामुळें, ते त्यांस फार मानतात, व त्यांचें भयही बाळगितात. ह्या अखिल विश्वाचा एक **चालक** असून, तोच **जगत्प्रभु** आहे, हें या अडाणी लोकांस माहीत नसतें. या कारणानें, जें जें ह्मणून भीतिप्रद दिसतें, त्याची त्याची ते पूजा करीत सुटतात.

भुताखेतांची पूजा.

**वाघापासून** भय उत्पन्न होतें, सबब त्याची प्रतिमा करून, कित्येक ठिकाणीं तर त्याच्या प्रतिमेलाच शेंदूर लावून, तिला हे लोक भजतात. कित्येक **ठिकाणीं मुंजा** अंगांत येतो, असें या जंगली लोकांस **वाटतें**. कांहीं प्रसंगीं **हाडळ** पाठीस लागलीसें त्यांजला **भासतें**. कित्येक वेळीं **जखीण** बोकांडीं बसली आहे अशी त्यांची कल्पना होते. आणि कित्येक समयीं तर **भुताची बाधा** झाली असल्याविषयीं, त्यांचेंच मन त्यांजला खाऊं

लागतें. सबब, या सर्व उपाधीपासून शान्ति व्हावी म्हणून, व सर्व प्रकारचीं विघ्नें टळावींत एतदर्थ, ते जलाशयाच्या ठिकाणीं, झाडांवर, आणि दगडांवर, शेंदूर थापतात; व तेथेंच त्यांची वस्ती समजून, त्यांजला कोंबडीं, बकरीं, व टोणगे, यांचे बळी देतात.

सुद्यःस्थितीची प्राचीन काळाशीं तुलना.

आतां, प्राचीन काळच्या राष्ट्रांकडे आपण नजर फेंकली, तरी देखील आपल्याला असेंच दिसून येईल कीं, ते पश्वादिकांची पूजा करीत, आणि भूताखेतांसही मानीत.

मिसर ( इजिप्त ) देशचे लोक पूर्वी कुत्रें, सुसर, मांजर, लांडगा, बैल, बहिरीससाणा, इत्यादिकांची पूजा करीत. आणि कार्थेज येथील लोक तर राक्षस व यक्ष यांजवर पूर्ण भरंवसा ठेवून, ते मनुष्यमात्राला संपूर्ण

1 Rollin's Ancient History. vol. I. Book. I P. 11.

2 " This treaty was concluded in the presence of Jupiter, Juno, and Apollo ; in the presence of the *demon* or *genius* of the Carthaginians, of Hercules and Jolaus ; in the presence of Mars, Triton and Neptune ; in the presence of all the Confederate Gods of the Carthaginians ; and of the Sun, the Moon, and the earth ; in the presence of the rivers, meads and waters ; in the presence of all those gods, who possess Carthage. "

( Rollins Ancient History. vol. I. Book II. P. 324.

रामानन्दपंथ.

होता. त्यामुळें, तो वारंवार असें प्रतिपादन करीत असें कीं, " **राम और रहीम सब एक है.** " याप्रमाणें, दोन्ही धर्मांचें ऐक्य करून, **हिंदु** आणि **मुसलमान** लोकांचा मिलाफ व एक जीव करून देण्याविषयीं, **कबीर** व **रामानन्द** यांचा एकसारखा प्रयत्न चालू असे.

आणि ब्राह्मसमाज, आर्यपंथ, इत्यादि सर्व, हिंदू किंवा वैदिक धर्माचें पिलूं अथवा आविष्करणच होय.

**बाबू केशव चन्द्रसेन** आणि **राम मोहनराय**, इत्यादिकांसही **वेदांचें** धर्मबंधन न आवडून, त्यांनीं **एकेश्वरी** मताचीच स्थापना केली, व **ब्राह्मसमाज** आणि **आर्यपंथ**, हे प्रचारांत आणिले. परंतु ह्या सर्वांचा अन्तर्भाव **हिंदु**-धर्मांतच झाल्याशिवाय राहत नाहीं.

बौद्धधर्मांत इतर पंथांचा समावेश.

आतां शेज ५।७ चा समावेश **बौद्धधर्मांत** होतो, आणि त्याविषयींचें दिग्दर्शन **बौद्ध**-धर्मांतच केलें आहे.

ख्रिस्तिधर्मांत हीब्र्यू किंवा इतर पंथाचा अन्तर्भाव.

त्याचप्रमाणें, **हीब्र्यू** म्हणजे **ज्यू** धर्माचें आणि **ख्रिस्ति**धर्माचें अगदीं निकट साम्य आहे. मात्र, त्यांत भेद म्हणून इतकाच कीं, **ख्रिस्ततारक** अजून यावयाचा आहे असें ज्यू लोकांचें म्हणणें असून, तो येऊन गेला असें ख्रिस्तिधर्मानुयायी प्रतिपादन करितात.

खिस्तिधर्मांचे पंथ. हल्लीं हिंदुस्थानांत खिस्तिधर्मांतले पंथ खालीं टिपेंत लिहिल्याप्रमाणें आहेत.

*Reformed Church.*

1 *A*—Church of England, with Churches of India, Ireland, America, Anglican, and Episcopalian church.

*B*—Church of Scotland, Presbyterian, United Presbyterian, Reformed Presbyterian, American or Irish Presbyterians, Irish Presbyterian mission.

*C*—Baptist.

*D*—Wesleyan, Wesleyan Methodist, Methodist, Primitive Methodist, Episcopalian Methodist, Bible Christian.

*E*—Congregationalist, London mission, Independent, Calvinist, Welsh Calvinist.

*F*—Non Conformist, Dissenter, Puritan.

*G*—Plymouth brothern, Open brothern, Swedenborgian, New Jarusalem, Catholic Apostolic, Quaker, Friend, Salvationist, Anabaptist.

*H*—Lutheran, German mission, Swedish church, Reformed Dutch, Lwinglian, German Church, Evangelicol Union, Reformed Church. Moravian.

*J*—Protestant.

OLDER CHURCHES

*K*—Church of Rome.

( पुढें चालू )

## सिंहावलोकन.

सर्व धर्मांचें दिग्दर्शन.

याप्रमाणें, **भरतखंडांतील** मुख्य धर्मांचें यथावकाश विवेचन झालें. त्यावरून प्रत्येक धर्मांतल्या मूलतत्वांचें साधारण दिग्दर्शन होण्यासारिखें आहे, असें मला वाटतें.

इतर धर्मांची हिंदुधर्मांशीं तुलना.

आतां, या भूतलावर एकंदर कोणकोणते धर्म मुख्यत्वेंकरून प्रचारांत आहेत, याविषयींही विचार केला तर आपल्याला असें दिसून येईल कीं, एवढा वेळपर्यंत आपण ज्या धर्मांचें वर्णन केलें, तेच धर्म अखिल जगांतील मुख्य होत. सबब, त्या सर्वांचें अवलोकन करून, त्यांपैकीं विशेष उज्ज्वल तेज कोणाचें आहे तें पाहूं.

हिंदुधर्मांचें मोहकत्व.

यासंबंधानें निःपक्षपातानें विचार केला तर असें दिसून येईल कीं, **हिंदुधर्मांत** जितका मोहकपणा आहे तितका अन्यधर्मांत नाहीं. आणि ही गोष्ट केवळ न्यायानेंच कोणालाही कबूल करणें भाग पडेल. कारण, **हिंदुधर्मांतील उपनिषद्** भागांत, मानसिक उन्नति जितक्या उच्च कोटी

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

*L*—Syrian church. ( Jacobite Section.)

*M*—Greek, Abyssinian, and American.

( vide Census of India. Report by J. A. Baines. Census commissioner 1893 ).

प्रत पोहोंचलेली आहे, तितकी अन्यधर्मांत कोठेंही दिसत नाहीं. तसेंच, ज्ञानी किंवा अज्ञानी, विद्वान अथवा मूढजन, योगी अगर संतमंडळ, इत्यादि सर्व प्रकारच्या लोकांस हिंदुधर्माचें स्वरूप सारखेंच भासतें, व त्यामुळें त्या सर्वांचें मन तेथें सारखेंच रिझतें.

भिन्नभिन्न दर्जाच्या लोकांस त्या पासून झालेला आनंद.

ज्ञानीजनाला तर येथें अमृताचा सागरच आहे. परंतु अज्ञानीजनाला देखील भक्तिरसामृताचा हा एक तुडुंब भरलेला डोहच असल्यामुळें, प्रभु चिन्तनांत ते अहर्निशीं दंग राहून रंग करितात, आणि आपला काळ सुखानें घालवितात.

हिंदुधर्मांतील मूर्तिपूजा व निरंजनभक्ति.

आम्हीं हिंदू मूर्तिपूजक आहोंत तरी, तत्त्वज्ञानाच्या संबंधानें आम्हीं अगदीं उच्च कोटीप्रत पोहोंचलों आहों. कारण, सगुणत्वापासूनच निर्गुणत्व प्राप्त होणारें असल्यामुळें, ईश्वतत्वाच्या अतर्क्य लीलेंत रममाण होण्यासाठीं, मूर्तिपूजा, किंवा सगुण अथवा निर्गुण उपासना, इत्यादि संबंधानें आम्ही काडीमात्र देखील भेद बाळगीत नाहीं. त्यायोगानें, हें अखिल विश्व त्या जगनियन्त्याचें विराट् स्वरूपच आहे असें मानून आम्हीं सदैव आनंदांत असतों.

ही आमची आनंदवृत्ति परधर्मसहिष्णुतेच्या संबंधानें

परधर्मीयांचें हिंदु-धर्माविषयीं प्रेम.

आम्हांस फारच उपयोगी पडली आहे. आणि त्याच कारणानें, आम्हां हिंदूंशिवाय अन्यधर्मीयांनीं आमच्या कळपांत यावें, अशी आमची कधीं देखील तिळमात्रही इच्छा उत्पन्न होत नाहीं. व आम्ही तत्संबंधीं प्रयत्न सुद्धां करीत नाहीं. तथापि, महदाश्चर्याची गोष्ट ही कीं, आमचा हिंदुधर्मसमाज हा झपाट्यानें आणि एकसारखा वाढत चालला आहे.

फार तर काय सांगावें पण, खुद्द ख्रिस्तिधर्मानुयायी

तद्विषयक शोपेनहॉयरचें अभिनन्दन,

सुद्धां, आमच्या धर्माचें मोहक स्वरूप ध्यानांत आणून, त्याचा अंगिकार करूं इच्छितात. शोपेनहॉयरसारखे तर, आमच्या उपनिषद् ग्रंथांचें अत्यन्त अभिनन्दन करितात. आणि ॲनिबिझांट बाईसारख्या विदुषी देखील, आपण केवळ हिंदूच आहोंत, असें अगदीं जगजाहीरपणें सर्वांस कळवितात.

असो. यासंबंधानें मागील भागांत बरेंच विवेचन

त्याच्या व्यापकतेविषयीं मॉनियर विलियम्सचा विस्मय.

झालेलें आहे. सबब तद्विषयक जास्त चर्चा न करितां, ख्रिस्तिधर्माभिमानी सर. मॉनियर विलियम्स् यांचाच

१ भारतीय साम्राज्य. पूर्वार्ध, पु. ४, भाग २०, पान १७ पहा.

२ भारतीय साम्राज्य, उत्तरार्ध, पुस्तक ७ वें भाग १९ वा पान १६ ते १९ वरील, त्याचें व्याख्यान पहा.

अभिप्राय कळण्यासाठीं, वाचकास जास्त तसदी न पडतां तो सुलभरीत्या पहावयास सांपडावा म्हणून, मागील पान २३३ ते २३९ यांचकडे बोट दाखवितों.

त्याबद्दलचें आनि-बिझांट्बाईचें प्रेम.

कलकत्ता येथें आनिबिझांट्बाईचें एके ठिकाणीं सन १८९४सालीं व्याख्यान झालें. त्यावेळीं ती असें म्हणाली कीं, अखिल जगांत श्रेष्ठ असा हिंदूधर्मच असून, मी देखील तद्धर्मीया पैकीं एक हिंदूच आहे, असें जगजाहीरपणें सांगण्यास मला मोठा अभिमान वाटतो.

आम्हीं प्रतिपादन केलेल्या विषयांचें पुष्टीकरण.

असो. एकंदर धर्मांचें प्रतिपादन करितांना, आम्हीं एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, हिंदुधर्म हा इतर सर्व धर्मांचेंच उत्पत्तिस्थान होय. आणि त्याच कारणानें, आम्हीं त्या धर्माचें प्रथमतः विवेचन करून, तदनंतर त्यापासून इतर धर्म कसकसे व केव्हां उद्भवले, याविषयींची प्रसंगानुसार अवश्य ती माहिती दिली.

पुढें कांहीं कालानें, आमच्या पाहण्यांत एक अपूर्व

1—Mrs. Besant in her Calcutta Lectures says;—"Do you ask, why is it that one, speaking in a foreign tongue, should speak of these Hindu scriptures with such reverence—of these ceremonies with such affection—and see in Hinduism the mightiest of the world's religions, and be proud to profess herself Hindu? Oh, why is it?"

लेख आला, व त्यांत एका पाश्चात्य गृहस्थाची आनी-बिझांट्बाईबरोबर जी मुलाखत झाली, त्यासंबंधीं हकीकत आम्हीं वाचली. त्यावरून, आमच्या धर्माविषयींचें त्या विदुषीबाईचें प्रेम चांगल्याप्रकारें व्यक्त होतें. आणि पाश्चात्य देशांत त्यांचें जन्म असून, व ख्रिस्तिधर्मांत त्यांची मूलदीक्षा असतांही, त्या आमच्या हिंदुधर्माचें श्रेष्ठत्व, केवळ निरभिमानानेंच कबूल करितात. इतकेंच नव्हे तर, सर्व धर्मांचें तेंच निगमस्थान असल्याविषयीं अखिल जगाला कळवितात. ह्यावरून, आमच्या धर्माची खरी थोरवी आणि त्याची अनन्योद्भवता, तसेंच अन्य धर्मांचें हें केवळ आश्रयस्थान, भाजन व पोषणच असल्याविषयींची तथ्यता, पौरस्त्य आणि पाश्चात्य यांच्या लक्षांत सहजीं येण्यासारखी आहे.



1 " I confined myself to the Hindu scriptures and in all cases I stated that I regarded those Scriptures and the *Hindu religion* as the *origin* of all *other scriptures* and *all other religions.* "

( The Daily Chronicle's account of the interview with Mrs. Anne Besant. Dated 7th April 1894. ).